श्री

# विज्ञापना

आपल्या देशी भाषेंतील साहित्याची अभिवृद्धि करण्याच्या सद्धेतूने विद्याभिलाषी कै. श्रीमंत सरकार महाराज साहेब सर सयाजीराव गायकवाड ( तिसरे ) सेनाखासखेल, समशेर बहादूर, जी. सी. आय. ई., एलएल. डी. यांनी कृपावत होऊन दोन लक्ष रुपयांची जी रकम निराळी ठेविली आहे, तिच्या व्याजांतून "श्रीसयाजी साहित्य मालें"त विविध विषयांवर पुस्तकें तयार करण्यांत येतात.

तदनुसार "ऐतिहासिक पोवाडे अथवा मराठ्यांचा काव्यमय इतिहास खंड २ रा" या नांवाचा ग्रंथ श्री. यशवंत नरसिंह केळकर, पुणें यांजकडून तयार करविला, तो उक्त मालेंतून २८८ वें पुष्प म्हणून प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

भाषांतर शाखा, प्राच्य-
विद्यामंदिर, बडोदें
ता. १७ माहे नोव्हेंबर
१९४२.

मा. प्र. कोठारी,
भाषांतर मदतनीस

ज्यो. मा. मेहता,
विद्याधिकारी,
राज्य बडोदें.

# हृद्गत

'ऐतिहासिक पोवाडे अथवा मराठ्यांचा काव्यमय इतिहास' या ग्रंथाचा पहिला भाग १९२८ साली प्रसिद्ध केला. त्यानंतर पधरा वर्षांनी हा दुसरा भाग प्रसिद्ध होण्याचा योग येत आहे. या दिरंगाईचें कारण हेंच कीं, असलीं पुस्तकें भराभर खपतच नाहींत. पाहिल्या भागाची प्रथमावृत्ति फक्त एक हजार प्रतींचीच काढली होती, पण ती संपूर्ण खपण्यास दहा बारा वर्षे लागलीं! अशा स्थितींत पुढील भागाचा सर्व मजकूर लिहून तयार असतांही दुसरा भाग छापण्याची कल्पना मनांत येणें शक्यच नव्हतें. शिवाय मध्यतरींच्या काळांत 'वसईची मोहीम' हा ग्रंथहि लिहून छापून काढला. तोही अगा-वरच. अर्थात् हा दुसरा भाग सध्या प्रसिद्ध होणें शक्य झालें याचें कारण बडोदें सरकारच्या सयाजी साहित्यमालेचा उदार आश्रय! पण तोहि मिळण्यास कै. वि. पां. नेने यांचेच साहाय्य प्रथम कारणीभूत झालें हें नमूद करणें माझें कर्तव्य होय. पांचसात वर्षांपासून त्यांची व माझी ओळख, त्यांनीं प्रसिद्ध केलेल्या दोन ग्रंथामुळे झाली होती. श्री. नेने हे मर्मज्ञ व वाङ्मयोपासक होते. त्यांनीं माझ्या या पुस्तकाचें हस्तलिखित पाहि-ल्यावर सयाजी साहित्यमालेची वाट मला दाखविली. हा ग्रंथ प्रसिद्ध झालेला पाहण्यास ते हयात नाहीत याचें दुःख होणें स्वाभाविक आहे.

चालू युद्धकाळांत कागद व छपाईचीं कामे यांचे दर कल्पनेबाहेर भरम-साट वाढलेले, अशा स्थितीत सयाजी साहित्यमालेने पुस्तक स्वीकृत करून आर्थिक साहाय्य देण्याचें कबूल केले तरी फिरून एक फार मोठी अडचण उभी राहिली ती कागद मिळण्याची. पण तीहि अडचण पुण्याच्या डेक्कन पेपर मिलचे एक प्रमुख चालक डॉ. रामकृष्ण हरी भडकमकर, एम. ए. एम डी. यांनीं तावडतोब दूर केली. त्या कामीं श्री. अनंत वासुदेव फडणीस यांनीं आपुलकीनें साहाय्य केलें. सबब वरील दोघा सद्गृहस्थांचा मी अत्यंत ऋणी आहे.

आता आंतील मुख्य विषयासबधीं. त्या बाबत ज्यांचें ज्यांचें साहाय्य मी घेतले ते तेथे तेथे नमूद केलेच आहे. शालिग्राम शितूतादि पहिले सग्राहक, सरस्वतीच्या दरबारांत शाहिरीवाङ्मयाला त्याच्या योग्य त्या स्थानीं स्थानापन्न करणारे कै. वि.ल.भाव्यांसारखे पहिले चिकित्सक आणि पुरस्कर्ते, आणि खरे–राजवाड्यांपासून तो श्री.शां.वि.आवळसकर, डॉ.मो.गं.दीक्षितादि उदयोन्मुख अभ्यासक इतिहास-संशोधकापर्यंत सर्वांच्याच साहाय्यामुळे पिपीलिका न्यायानें मी माहितीचे कण कण जोडले आहेत; तेव्हा या ग्रथाचें श्रेय त्या सर्वांना आहेच. वऱ्हाडातील शारदाश्रमाचे श्री. य. खु. देशपांडे आणि नागपूर मध्यप्रांत इतिहास स. मडळाचे श्री. चट्टे यांच्या साहाय्याबद्दलहि त्यांचा ऋणनिर्देश करणे कर्तव्य होय. त्याच्या प्रमाणेच इतर सशोधकांनी वा वाचकांनी अप्रसिद्ध पोवाडे मजकडे नकलून पाठविण्याची आस्था दाखविली तर पुढील तिसऱ्या भागांत त्या पोवाड्यांचा अवश्य समावेश करता येईल.

शक्यतो मजकुराखालींच त्याच्या खुलाशाच्या टीपा याव्या अशी योजना छपाईत केली होती. तथापि पुष्कळ वेळा टीपा विस्तृत झाल्यामुळे त्या टीपांचा मजकूर पुढील पानावरहि गेला आहे. पण त्याला इलाज नाहीं.

राहिलेल्या पोवाड्यांचा एक तिसरा खड काढून आपले काम सपूर्ण शेवटास न्यावें अशी मनीषा मी बाळगिली आहे. शिलकी पोवाडे सुमारे शेसवाशें असून एकदर ग्रथ सहासातशे पृष्ठांचा खास होईल. त्याच ग्रथांत एकंदर शाहीरांसबधीं मिळविलेली नवी विविध माहितीहि जोडावयाची आहे. पण तो तिसरा खड छापण्याचा योग केव्हा येईल तेव्हां खरा!

य. न. केळकर

# अनुक्रमणिका

# ऐतिहासिक पोवाडे

अथवा

# मराठ्यांचा काव्यमय

## खंड २ रा

## दत्ताजी जाधवाचा पोवाडा

शिवकालांतील पोवाडे फारच थोडे म्हणजे अवघे तीनचारच उपलब्ध आहेत. ( १ ) अज्ञानदासकृत अफझुलखानवधाचा, ( २ ) तुळशीदासकृत तानाजी मालुसऱ्याचा, ( ३ ) यमाजीकृत-बाजी पासलकराचा आणि आतां हा चवथा दत्ताजी जाधवाचा. शिवकालीन म्हणून या दत्ताजीच्या पोवाड्याचें महत्व आहेच. तथापि त्यांत प्रत्यक्ष शिवाजीचा संबंध आलेला आहे, म्हणून त्याची अपूर्वाई विशेष वाटते.

हा पोवाडा प्रथम शितूतांच्या संग्रहांत छापला गेला होता व ऐतिहासिक पोवाड्यांच्या आमच्या पहिल्या खडांतच त्याला स्थान द्यावयाचे होते. परंतु खरें बोलावयाचें म्हणजे त्यांतील वर्ण्य विषयाला अस्सल ऐतिहासिक साधनांचें प्रत्यंतर आम्हांस त्या वेळीं सांपडलें नव्हतें हे एक व पोवाडाहि अत्यंत अशुद्ध रीतीने शितूत प्रतींत छापल्यामुळे साऱ्या शब्दार्थांचीहि फोड करतां येईना. .

शितूतांच्या पुस्तकानंतर म्हणजे १९०३ सालानंतर जवळ जवळ ३५ वर्षांनी शिवचरित्रकार्यालयानें फारशी साधनांची मराठी भाषांतरें प्रसिद्ध केलीं म्हणूनच आज तो पोवाडा आम्हाला टीपा देऊन सजवून व्यवस्थित मांडतां येत आहे. ३५ वर्षांपूर्वी शितूतांना ऐतिहासिक साधनांची कांहींच अनुकूलता नव्हती. आणि त्यांचें काम त्यावेळीं मिळेल तो पोवाडा

समग्रहित करून छापून त्याचा नाश टाळणे हेंच मुख्यतः होतें. खेरीज संशोधनाचा बारकावाही त्यांजपाशीं नव्हता. यामुळे पोवाडा छापतांना सुरवातीस त्यांनी जी वर्ण्य विषयाची माहिती दिलेली आहे ती पुष्कळदां चुकीची आहे. प्रस्तुत पोवाड्याबाबत त्यांनी असें लिहिले आहे. "हा दिलेलखान मोगलांचा सरदार शिवाजीवर जी फौज औरंगजेबाने पाठविली त्यावेळीं हा जाधवराव शिकारींत असतां त्याला कोंडून समरभूमीवर मरण पावला."

यांतील शिकारीचा त्यांनी केलेला उल्लेख सामान्यतः बरोबर असला तरी पोवाड्यांत त्या शिकारीचें बिलकूल वर्णन नाही. 'शिकार खेळुनी भार आमराईत उतरला' किंवा 'निःशक भांडतो निर्वाणी वाग मोकळा सोडुनी' 'वाग धरुनी भार मारी राउताला' इत्यादी चरण सकृद्दर्शनी पोवाडा वाघाच्या शिकारीबद्दल असावा असा भ्रम उत्पन्न करतील; पण वास्तविक तसे नाहीं. पण हा पोवाडा इतिहासाचे साधन या दृष्टीने बहुमोल आहे, हें पुढे दिलेल्या साधनादिकांतील निरनिराळ्या हकिगतीवरून स्पष्ट दिसेलच.

या पोवाड्याच्या भाषेबद्दल व रचनेबद्दल थोडासा प्रपंच करणे आवश्यक आहे. अफझलखान वध पोवाडा, तानाजीचा पोवाडा, बाजी पासलकराचा पोवाडा, त्रिंबकराव दामाड्याचा पोवाडा, चंडीचा पौराणिक पोवाडा आणि हा दत्ताजी जाधवाचा पोवाडा यांच्या भाषेत व रचनेत फारच साम्य आढळते. भाषा जवळ जवळ गद्यासारखीच आहे. पोवाड्याची भाषा तशीच असली पाहिजे हा सामान्य संकेतच आहे. तथापि या पांच पोवाड्यांतील गद्यप्राय रचना दुसऱ्या पोवाड्यांत तितकी कोठेहि आढळणार नाहीं. या पोवाड्यांची भाषा गद्याला किती जवळ आहे व अडाणी शाहीर स्फूर्ति आली असतां आपल्या गद्यप्राय वाणीला न कळत पद्यरूप कसें सहज देऊ शकतो याचे एक फार सुंदर उदाहरण आम्हास पेशवे दप्तराच्या २७ व्या खडांत आढळले. त्यांतील ११ वा लेखांक म्हणजे १७४५च्या सुमारास कोणा अडाणी मराठा बातमी-

अनिक साहेबासी अरज । साहेबानी अज्ञा केली होती जी बगाल्याच वरतमान कैसा झाला तो तकीक करूनी पाठवन । तरी साहेबाची आज्ञा घेऊनी निघालो । सोळावे दिवसीं नागपुरासीं अलों । दो दिसामधीं कुल वरतमान तहकिक केला । मग तिसरे दिवसी लेहूनी पाठविला । तो साहेबासी नाही पावला । ते जासुद जोत्साजी नाविकाचे होते । त्यांच्या मागुनी भिकाजी नाविकाची जोडी पाठविली । पधरा दिवसामागूनि पाठविला । ते जोडी येऊनी दाखल झाली । पहेली जोडी मागून आली । मग नाविकानी बातमी मधीच ठेविली । साहेबांनीं आज्ञापत्र पाठविलें ते आपन्यास पावले । तेव्हा त्या जासुदांनी सांगितले जी । पहिली बातमी मधिच ठेविली । म्हणवून बगाल्याचा वरतमान थोडा मात्र आनिक लेहिला। तो काना मात्र साभाळुनी साहेबानी वाचावा । रघोजी बाबा बगाल्यासाजी गेला । जाऊनी कटकच्या ठाण्याला मोर्चे लाविले । आलाविदींचा दिवान जानकीराम । त्याचा लेक दुलबराम । कटकच्या ठाण्यात होता । तीं महिन्यात कटक घेतल । दुलबराम धरिला । ही खबर आलविदीस कळली । अनिक जानकी रामास । मग त्यानी येक पठाण पाठविला । अनिक याचा निळोपत गेला । सात लाख क्बूल केले । वितकीं रदबदल होती । पठाण यांच्या डेऱ्यात होता तो यानी दोनसे मानुस धरूनी आनिले । त्याचे नाक कान कापिले । ते त्या मोगलान देखिले । मग मोगल बोलला । मी रदबदल करितो भज देखता माणसाची नाक कापिली ही गोष्ट बरी नव्हें केली । बर असो । मीं अलाविदींला वरतमान सागतो । फिरून अनीक येतो । मग तो मोगल गेला । अलाविर्दीला भेटला । त्याना वरतमान सागितला । सात लाख क्बूल केले । परी मजदेखता दोशा मानसाची नाक कापिली । मग अलाविदी बोलला हा बाह्मन मारूनी टाका । मग दिलींचा मोगल बोलिला म्या यासी इमान दिधला । हा सोडूनी देवा । मग निळोपत सोडुनी दिधला । सला विघडला । मग निळोपत रघोजीबावाप आला । त्यान वरतमान सांगितला । जी । मोगल बधत नाही । मग मीर हबीब कटकच्या ठान्यांत ठेविला । मग तेथुनी कूच केला । बडदवनावर अला । तेथ सात लाख खजिना निघाला । मग तेथुनी कूच केला । गयापरूनी सोनभद्रावर अला । तो इकुनी अलाविदी अला । पहिल जुध सोनभद्रावर झाल ।

तेथ गोळी जिवाळी लागली। येक दात पडला रघोजीबावाचा। मग सोनभद्रन्याकडून मोंगल पठन्यांत गेला। यांनी भवता येढा दिधला। परि तेथ लाग नाही चालला। मग सडे फडजेसी रघोजीबावा निघाला। बुनग टाकिल माग। रात दिवस चालून भगसुजाबाजवर गेला। अरध्या रात्रीं पावले। बाहेरील पुरे लुटले। तो हिवुनी भागिरथीच्या-कडन पांहाट मोगल दाखल झाला। मग दुसर जुध तेथ झाल। मग राघोजीबाबा तेथूनी निघाला। बडदवनावर अला। मग अलाम्रिदी किलसरमस्तसा फऊज घेऊनी अला। तिसर जुध जाल। रघोजीबावास पिटनी काढिल। तेथ मस्तुभाखानाजीचा लोक भेटला। मग देसा येत होते। ज्या वारीत अपुन लुठल तेथे दाडग्यानी अरध बुनग लुठिल। मग नागपुरासी अले। हा वरतमाना मागच पहिल्यान पाठविला। परि साहेबासी नाही पावला। आनिकही किंतीक मजकूर होता तो साहेबासी ना पावला। म्हनउनी थोडबहुत अनिक लेहिला.

## ऐतिहासिक माहिती

( १ ) या पोवाड्याला चांगला मुकाबला पाडणारी हकीकत आलमगीरनाम्यांत आलेली आहे. आलमगीरनाम्याचा लेखक औरंगजेबाच्या पदरचा व त्याने खुद्द औरंगजेबाच्या सांगण्यावरून आलमगीरनामा लिहिला आहे. " त्यासाठीं दप्तरखान्यांतील आवश्यक ते सर्व कागद दाखविण्याबद्दल आज्ञा झाली आणि जरूर तेथें इतर अधिकाऱ्यांस व खुद्द बादशहासहि माहिती विचारण्याची परवानगी मिळाली; तसेंच लिहिलेली हकीकत *बादशहास दाखवून तीत बादशहानें सुचविलेल्या दुरुस्त्या समाविष्ट करण्याचा हुकूम झाला.* "

जयसिंगानें पुरदर व रुद्रमाळ घेण्याच्या इच्छेनें १५ मार्च १६६५ रोजीं कूच केलें. त्याच्या लोकांनीं १२ एप्रिल १६६५ रोजीं रुद्रमाळचा गड हल्ला करून जिंकला. पुरदरचा वेढा त्याचबरोबर अतिशय सक्त झाला. तेव्हां शिवाजीने जयसिंगाकडे पंडित नांवाच्या एका ब्राह्मण वकिलामार्फत बोलणें सुरू केले व जयसिंगाच्या म्हणण्याप्रमाणे त्याला भेटण्यासाठीं तो ११ जून १६६५ रोजीं राजगडाहून निघाला. पुढे जयसिंग शिवाजीची भेट झाली व शिवाजीने आपला माणूस देऊन पुरदर गडकऱ्यांस किल्ला खाली करून देण्यास सांगितले. त्याप्रमाणे दुसरे दिवशीं किल्ल्यातले चार

हजार लढाऊ माणूस बाहेर पडले. व मोंगलांनी किल्ल्यावर आपले स्वतःचे ठाणे घातले. नंतर तह वगैरे ठरून जयसिंग व शिवाजी यांची विजापूरवर मोहीम निघाली.

मोगली लष्कर ५ डिसेंबर १६६५ रोजीं फलटणच्या कोटाहून दहा कोसांवर कूच करून गेल्यावर ते ठाणे जिंकण्यास नेताजी पालकरास पाठविण्यांत आले.त्यानें तो कोट जिंकला. ९ डिसेंबर रोजीं मोगली लष्कराचा तळ नीरेवर पडला. तेथे फलटणकर बजाजी निंबाळकर, जयसिंगास येऊन भेटला. नतर शिवाजीच्या लोकांनी मंगळवेढे, तायवडा व खटाव हीं ठाणीं जिंकलीं. १९ तारखेस मंगळवेढे जिंकल्याचे कळल्यावर जयसिंगाने त्या ठाण्यांत उदितसिंगास ठाणेदार केले व किल्ल्याबाहेरच्या प्रदेशाची फौजदारी सरफराजखानास सांगितली. यानंतर विजापूरकरांच्या सरदारांनीं गनिमी काव्याने मोगलांच्या सैन्याची फारच धावाधाव उडवून देऊन त्यांची नुकसानी केली. मगळवेढ्याचे ठाणे विजापूरकरांनी पुन्हा छापा घालून जिंकले. राजा जयसिंगानें दूरदर्शीपणाने मंगळवेढ्याचा फौजदार सरफराजखान यास ताकीद दिली होती कीं, शत्रूची मोठी फौज त्या तर्फेस आली तर तुजपाशीं थोडी फौज असल्याने तूं तिजशीं न लढतां किल्ल्यांत शीर. पण त्याने हा सल्ला न ऐकतां आपल्या तोकड्या सैन्यासह शत्रूवर हल्ला चढविला. लढाई निकराची झाली पण शेवटीं तो स्वतः व त्याचे कांहीं लोक पडले आणि कांहीं जखमी झाले. हत्तींनाही जखमा लागल्या. ही चकमक झडल्यावर त्याचे मुलगे, बाकीचे शिपाई व हत्ती घेऊन किल्ल्यांत गेले. शत्रु किल्ल्याच्या दरवाजापर्यंत आला. पण बुरूज व तट यांजवरून मारा सुरू झाला यामुळे त्याचे काही लोक मेले व तो किल्ल्यापासून दूर निघून गेला. ता. १५ मार्च १६६६ रोजीं त्याने किल्ले नळदुर्गापासून तीन कोसांवर मुक्काम केला. दुसरे दिवशी तेथून किल्ले गुंजोटीच्या बाजूस प्रयाण केलें. यापूर्वीच मिर्झाराजाने पतंगरावाला एका टोळीसह गुंजोटी घेण्यास पाठविले होते. त्याप्रमाणे वातमी आली की तो तेथें पोंचला असतां किल्ला व कसबा यांत असलेल्या टोळीने पुढे येऊन लढाईस तोंड पाडिले. तींत दोन्ही बाजूंचे कांही लोक जखमी होऊन पतंगरावाच्या हातास एक बाण लागला. पण रात्रीं शत्रू पसार झाला. आणि कसबा व किल्ला बादशाही ताब्यांत

आला. ता. १७ मार्च १६६६ रोजीं बादशाही लष्कर गुंजोटीस पोंचलें, तेव्हां मिर्झा राजानें हुकूम केला कीं, तो किल्ला जमीनदोस्त करावा. नतर दुसरे दिवशीं जरीबी ७॥ कोस अतर तोडून निलग्यापासून एक कोसावर ( येथें एक मातीची गढी होती व येथून कल्याणी साडेसहा कोस व अवसा दहा कोस होता ) मुक्काम झाला. तेथून राजाने घालीबखान, दत्ताजी, खेलोजी, राघोजी-व इतर कित्येक यांना आतिशखान व थोडा तोफखाना यासह निलग किल्ला घेण्यास पाठविले. पण कांही दिवस लष्कराचा तेथेंच मुक्काम झाला. पाठविलेले लोक किल्ल्यापाशीं पोंचतांच तेथील लोकांना आपले रक्षण होणें कठिण वाटून त्यानीं अमान मागितले, व किल्ला बादशाही लोकांच्या ताब्यांत दिला. राजाने सुलेमान विजापुरीला घोडा व पोषाक देऊन किल्ल्याच्या रक्षणावर नेमिले.

जयसिंगाने आतांपर्यन्त नेताजीस बादशाही चाकर बनवून त्यास उत्साहित करण्यांत पुढाकार घेतला होता. आतां तो स्वतः शत्रूच्या स्वारांपासून वेगळा झाला व बादशाही लष्करांत येऊन राजास भेटला. शिवाजीची निष्ठा दाखविण्याची इच्छा असल्यामुळे राजानें त्या बाबतींत दरबारास लिहून कळविलें होते. बादशहाने त्याची विनंति मान्य करून त्यास हुकूम पाठविला कीं, तू सदा दर्शनास ये. तेव्हा या वेळीं तो आपला मुलगा संभाजी व आपले थोडे नोकर यासह राजाचा निरोप घेऊन दरबाराकडे रवाना झाला. नतर राजाने आघाडीवरील दत्ताजी व त्याचे साथीदार आणि इल्तमशपैकीं कांही लोक, इतर थोडे व तुर्कताजखान यांस रात्रीच्या पाहऱ्यासाठी नेमिले पैकीं दत्ताजी निलग्यापासून दोन कोस पुढें जाऊन कहीच्या रक्षणासाठीं उभा राहिला असतां शर्झा महदवीन शत्रुसैन्यासह (हा जवळच होता) एक फौज तुर्कताझखानाच्या मुकाबल्यास पाठविली. खानानें त्या फौजेशीं सामना दिला. पण त्यांत त्याचे कांही लोक जखमी झाले. शर्झा तीन-चार हजार स्वारांसह दत्ताजीवर चालून आला. आणि त्याच्या लोकानी चोहो बाजूंनीं त्यावर हल्ला करून लढण्यास सुरुवात केली. बादशाही वीर आपली कठिण अवस्था पाहून घोड्यावरून खाली उतरून लढू लागले. दत्ताजी व त्याचे लोक यांनीं करतां येईल तितके शौर्य प्रगट केले. शेवटीं अतिशय जखमा होऊन दत्ताजी पडला. रुस्तुमराव जखमी झाला. तेव्हा शत्रूचे लोक त्यास घेऊन

*गेले. सिदी रैहान स्वर्गास गेला.* दत्ताजीचे *मुलगे बसवतराव व राघोजी* यांस फार जखमा झाल्या होत्या. ते आपल्या थोड्या साथीदारांसह एका बाजूस झाले आणि परत मुख्य लष्करांत गेले. तेथे बसवंतराव झालेल्या *जखमांमुळे मरण पावला. याच दिवशीं कुबादखानाचा मुलगा अब्दुल कासीम* हरावलीच्या नात्याने तळापासून पुढे आला असता शत्रूची एक टोळी प्रकट झाली व त्यावर घसरली. त्याजपाशीं शत्रूस शिकस्त देण्याइतकें सैन्य नसल्याने *गनिमी पद्धतीने तो वागू लागला. दिवसाच्या शेवटीं ही गोष्ट दिलेरखानास* समजली तेव्हा तो हरावलीच्या फौजेसह त्या बाजूस रवाना झाला व लढाईच्या जागीं आला. त्याने रात्र तेथेच काढली व लढाईत पडलेल्या जवळ *जवळ दीडशे हिंदू मुसलमान वीरांच्या* उत्तर कार्यांची व्यवस्था लाविली. राजा रायसिंगही जयसिंगाच्या हुकुमावरून रात्रीच्या अखेरीस निघून त्याच्यापाशीं पोहोचला. दुसरे दिवशीं खान रणभूमीपासून तीन कोसांवर थांबलेल्या शत्रूस दफे करण्यासाठी रवाना झाला. पण ही खबर पोंचताच शत्रूचे लोक पळून गेले.

[ आलमगीरनामा पृष्ठांक ५३, ५४, ५५ शिवचरित्रवृत्तसंग्रह ३ रा खंड, फार्सी विभाग. ]

२ ( *शिवचरित्रवृत्तसंग्रह २ रा खंड फारसी विभाग* ) यांतील *अली*-नाम्यांत या विजापुरावरील मोहिमेसंबंधीं पुष्कळच तपशीलवार हकीकत दिलेली सांपडते. त्यापैकीं प्रस्तुत पोवाड्यास उपयुक्त तेवढी पुढीलप्रमाणे—

*जयसिंगाने शिवाजीवर मोठी स्वारी केली. शेवटीं शिवाजीने त्याच्याशीं* तह केला व दोघांनीं मिळून विजापुरकरांवर मोहीम काढली. तिकडे विजापूरच्या अदिलशहानेहि विजापूरच्या किल्ल्याचा पक्का बंदोबस्त करून *महमदखान, एकलासखान, अबदुल महमदखान, सर्जाखान, अबदुल करीम,* बहलोलखान या मुसलमान सरदारांस व व्यंकोजी भोसले, घाडगे, बांदल, घोरपडे, जगताप, खडागळे, जाधव इत्यादि मराठे सरदारांस जमाविले. मुख्य सेनापतीपद सर्जाखानास देण्यांत आले. मोगल सैन्याने विजापुरकरांच्या सरहद्दीवरील *मंगळवेढ्याचा* कोट होता तो घेऊन तेथे *त्या* ठाण्यांत सरफराजखानाची नेमणूक केली. तेथून मोंगलांचे सैन्य कूच करून चार नाले उतरून येत आहे असें पाहून विजापुरी सेनापति सर्जाखानाने अचा-

नक दौड करून मगळवेढ्यावरच चढाई केली. तेथे तुंबळ युद्ध झालें. खुद्द सर्जाखान व सरफराजखान यांचीच गांठ पडून सरफराजखान घायाळ होऊन घोड्याखाली आला. तो मेला किंवा केवळ जखमी झाला हे निश्चित नाही. तथापि सरफराजखानाचा पुरा मोड होऊन सरजाखानाने फार लूट मिळविली. इतक्यांत जयसिंगाच्या सैन्याची एक मोठी टोळी विजापुराकडे सख्त हल्ला करण्याच्या इरायाने निघाल्याची बातमी लागतांच सर्जाखान तावडतोब विजापुराकडे परत फिरला. लवकरच मोठे तुंबळ युद्ध झालें व त्यांत मोगलाचा पराभव झाला. पण पुनः यानंतरहि जयसिंगाने आणखी एकदां लढाई घेतली, पण त्यातहि त्याचाच परभव झाला. फिरूनहि एकदां मोगलांनी चढाई केली, त्यातहि तोच प्रकार झाला. मात्र त्यांत सर्जाखान ठार झाला.

( ३ ) कॉस्मे–द–गार्डा याने लिहिलेल्या शिवाजीच्या चरित्रांत पुढीलप्रमाणे उपयुक्त माहिती आहे.

मोगलांचें लष्कर पुरंदराहून कूच करून विजापुराकडे गेल्यानंतर मोगली सैन्याला दाणा, वैरण वगैरेंची अडचण भासू लागली. जयसिंगाने यासाठी निरनिराळ्या ठाण्यांत फौजा ठेवून सैन्याला धान्य पुरविणाऱ्या वणजाऱ्यांचे पठारे ज्या त्या मुक्कामापर्यंत सुखरूप पोंचले जावे अशी तजवीज केली होती. मोगली सैन्य याप्रमाणे बदोबस्ताने कूच करीत असता विजापूरकराच्या तीस हजार फौजेने अकस्मात् त्यांच्या पिछाडीवर येऊन हल्ले केले. आसपासचा मुलूख उध्वस्त केला व धान्याचा पठारा निभावून नेणारा १५०० मोगली शिपायांचा बदरका असलेला असा ८००० वणजाऱ्यांचा हजारो बैलांचा पठारा त्यांनी लुटला. त्या वेळी फार निकराची लढाई झाली. ती सकाळपासून तिसरे प्रहरपर्यंत होत होती. या लढाईत एकूण एक मोगल शिपाई मारला गेला. अनेक वणजारीहि मारले गेले. नतर लढाईच्या धुमाकुळाचा फायदा घेऊन सुमार २००० वणजारी ३० लक्ष (!) बैलांचा पठारा घेऊन तो हांकून नेऊन मुख्य मोगली सैन्यास मिळण्यास निघाले होते त्यावर विजापुरी सरदार निघाले पण ते वणजारी त्या वेळीं त्यांच्या हातीं लागले नाहीत. पुढे गनिमी काव्यानें विजापुरी फौजेनें मोगली सैन्यास अगदीं दमवून सोडले.

(४) सर जदुनाथ सरकार यांच्या 'शिवाजी-चरित्रांत' पुढीलप्रमाणे हकीकत आहे—

पुरंदराला मोगलांनी वेढा दिल्यावर प्रथम त्यांनी शेजारच्या रुद्रमाळ ऊर्फ वज्रगड किल्ल्यावर तोफा लाविल्या. मोगलांच्या सरदारांची नांवे—जयसिंग, दिलेरखान, हरिभान व उदयभान गौर, तुर्कताजखान, किरतसिंग, राजा नरसिंग गौर, कर्ण राठोर, जगतसिंग, सय्यद मकबुल अलम, दाऊदखान, राजा रायसिंग, महमद सलिहतखान, रामसिंग, शेरसिंग राठोड, राजसिंह गौर, रसूल बेग, चतुर्भुज चव्हाण, मित्रसेन, आणि इन्द्रमण बुंदेला. १३ एप्रिल १६६५ रोजीं मोगलांनी रुद्रमाळेवर पहिला हल्ला चढविला व दुसरे दिवशीं किल्ला काबीज केला. नंतर मोगली लष्करांनी निरनिराळ्या टोळ्या करून शिवाजीच्या सर्व मुलखांत धामधूम आरंभिली. इकडे मोगल एप्रिलच्या मध्यास पुरंदराच्या माचीपर्यंत जाऊन पोचले. मे महिन्यांत मुरारबाजी पडला, मग निरुपाय जाणून शिवाजीनें जयसिंगाशीं तहाचें बोलणें लाविलें. १२ जून रोजीं पुरंदरावरून मराठे उतरले व मोंगली झेंडे वर चढले. ठरलेल्या तहाप्रमाणें अनेक किल्ले मोगलास देऊन शिवाजी स्वतःला मोगलांचा ताबेदार सरदार म्हणवू लागला. नंतर मोंगलांनीं विजापुरकरांवर स्वारी काढली. त्यांतहि शिवाजी त्यांचेबरोबर होता. प्रथम मोगलांनी ७ डिसेंबर १६६५ रोजीं फलटण

आहे तिच्यांत या पोवाड्यांतील नायक दत्ताजी जाधव यासंबंधी माहिती सांपडते. तीवरून हा दत्ताजी जाधव सुप्रसिद्ध लुकजी किंवा लखूजी जाधवरावाचा वंशज ठरतो. थोडक्यांत हकीकत अशी आहे.

निजामशहाने लुकजी व त्याचा मुलगा अचलोजी यांना दौलताबादेचे किल्ल्यांत दग्याने कैद करून ठार मारलें. ( १६२९ ) त्यानंतर लुकजीची बायको म्हाळसाबाई ही आपला नातू संताजी व सून यांना घेऊन आपला दीर जगदेवराव याच्याकडे जाऊन राहिली. पुढे जगदेवरावानें दिल्लीकर मोगलांना मिळून त्यांजकडून ५००० स्वारांची मनसब मिळविली. नंतर शहाजहानाने निजामशाहीवर स्वारी करून ती रसातळास नेली. त्या कामगिरींत या जगदेवरावाने फार मोठा वांटा उचलला होता. सबब त्याच्या बहादुरीबद्दल त्याला रुस्तुमखान हा किताब देण्यांत आला. जगदेवराव जाधवराव सन १६५० चे सुमारास वारला. त्याचा मुलगा बहादुरजी मनसबदार झाला. बहादुरजीचा मुलगा दत्ताजीराव. त्याला तिघे मुलगे. थोरला राघोजीराव नतर यशवंतराव आणि जगदेवराव. राघोजीराव व यशवंतराव यांस संतती झाली नाही. फक्त जगदेवरावासच चार मुलगे झाले. ते अनुक्रमें—( १ ) मानसिंग ( २ ) रघूजीराव ( ३ ) यशवंतराव ( ४ ) दत्ताजीराव.




या वशवेलावरून पोवाड्याचा नायक दत्ताजीराव हा प्रसिद्ध लुकजी

जाधवरावाचा नातू होय पोवाड्यांत रुस्तुमराव हा किताब आला आहे तो या दत्ताजीचा थोरला मुलगा जो रघुजीराव त्याचा

( ६ ) पुणे भारत-इतिहाससंशोधक मंडळानें प्रसिद्ध केलेल्या शिवचरित्र वृत्तसंग्रह दुसरा खंड फारसी विभाग या पुस्तकात तारीख-ई-अली या पर्शियन इतिहासात जयसिंगाच्या विदापूर उर्फ विजापूरवरील स्वारीचें तपशीलवार वर्णन आले आहे त्यातील माहिती प्रस्तुत पोवाड्यातील तपशील उलगडण्यास बरीच उपयोगी आहे सबब पोवाड्याच्या अनुरोधाने उपयुक्त तेवढी माहिती उतरून घेत आहो, ती अशी—

शिवाजीचा निरुपाय होऊन त्याने आपले कित्येक किल्ले जयसिंगाच्या स्वाधीन केले, मग विजापूरही जिंकण्याची महत्त्वाकांक्षा जयसिंगास उत्पन्न झाली तेव्हा विजापूरच्या बादशहानेंही उत्तम तयारी करून एकलासखान, सरजाखान, बहलोलखान, रुस्तुम जमान, शिद्दी मसऊद, सिद्दी अबदुल अजीझ व व्यंकोजी राजा इत्यादि सरदारास तयार राहण्याचा हुकूम केला लवकरच सरजाखानास अशी बातमी लागली कीं, जयसिंगाच्या एका टोळीनें विजापुरकराचा मगळवेढ्याचा किल्ला जिंकला असून तो राखण्याचे काम ५००० स्वाराच्या टोळीनिशीं सरफराजखानाकडे सोंपविण्यात आलें आहे सरफराज तिकडे जात असता सरजाखानानें त्यास गांठलें तेव्हां एक लढाई होऊन त्यात सरजाखानान, सरफराजखान, त्याचा मुलगा व जावई या सर्वांस ठार मारिलें यानतर विजापुरी सरदारांनी जयसिंगाचे अनेक ठिकाणीं पराभव केले पुढे सलाबतखान हा ५००० स्वारासह जयसिंगाच्या मदतीस येत आहे असे कळल्यावरून सरजाखानानें त्यासहि गांठून ठार मारलें यानतर जयसिंगानें पुन मोठी तयारी करून १०,००० स्वार, पचहजारी उमराव जाधवराव ( दत्ताजी जाधवराव ) व केसरीसिंग यास रसद व लढाईचें सामान आणण्यासाठी रवाना केले पण विजापुरी सरदार खवासखान व सरजाखान याना बातमी लागून त्यांनी जाधवरावादिकावर तुटून पडून संपूर्ण पराभव करून त्यांची वाताहत केली

( ७ ) दत्ताजी जाधवासबधीं कै श्री यादव माधव काळे याच्या व-हाडच्या इतिहासात कांहीं अधिक माहिती आली आहे ती त्यानीं देऊळगावकर

शक्य नाही, काय करावें ते कळवा ! " असा तांतडीचा निरोप शिवाजीमहाराजांकडे पाठविला. जासुदानें गडाची सर्व खबर त्यांस कळवून सांगितलें कीं, " यापुढे सल्याचें बोलणें घातलें नाहीं तर मोंगल सैन्य हटकून किल्यावर चढल्याशिवाय राहात नाहीं. व मग त्या कत्तलींत आपलीं माणसें मात्र फुकट मारलीं जातील." जासुदाची मुखजबानी ऐकल्यावर महाराजांना प्रथम थोडे इशिम म्हणजे त्वेषच आला. ते उद्गारले " आजपर्यंत मीं मोंगलाशी दावा लाऊन त्यांची हट्टी नरम केली नाहीं काय ! शास्ताखानाची शास्ती केली आणि मागाहून जसवंतसिंग येऊन त्यानें सिंहगडास वेढा दिला; तेथेंहि त्याचा पराभव करून त्यांस परत पिट्टून लाविले. असें असतां आता पुरंदर हातचा मोंगल छिनावून घेतात काय ! " परंतु पहिला आवेशाचा भर ओसरल्यानंतर विचारें पाहतां त्यांना खरी वस्तुस्थिति उमगली व मुलूखभर पसरलेल्या एवढ्या प्रचंड मोंगली फौजेशी या वेळी आपणास सामना देता येणार नाहीं हें ओळखून त्यांनीं राजा जयसिंगामार्फत तहाचें बोलणें लाविलें. जयसिंगानेंहि मी 'रजपूत, तूंहि मराठा, रजपूतच' असा दिलासा देऊन शपथप्रमाण दिल्यावर त्याचा तह ठरला, " भिऊ नको मराठ्या, शिवाजी ! कौल राखण तुला " असें पक्कें आश्वासन मिळाल्यावर महाराज म्हणाले, " मिलकर जाना रजपुताला".

नंतर महाराजांनी किल्ला मोंगलांच्या हवालीं केला व त्यावर मोंगली निशाण चढलें. तहाप्रमाणें इतरहि किल्ले बादशहाच्या हवालीं करून महाराज पातशाही चाकर झाले.

ही शिवाजी महाराजावरील मोहीम उरकल्यानंतर पातशाही हुकमाप्रमाणें मोंगलांनी विजापुरावर मोहीम काढली. तींत ८०,००० घोडदळ होतें आघाडीस दिलेरखान चालला तो करकमभोशाला गेला व तेथून मंगळवेढ्यास जाऊन तेथल्या कोटाला मोगलांनी वेढा दिला. त्यांनी कोट जिंकला. परंतु आंतला विजापुरी सरदार सरफरासखान पळून गेला होता. मग मोंगली फौज निलंगे येथे गेली व तेथें छावणी करून राहिली. उलट विजापुरी लोकांनी गनिमी काव्यानें मुलुखाची नासधूस करून तो उध्वस्त करून मोगलांची रसद मारण्याचा सपाटा लाविला. त्यांनी त्यांच्या वणजाऱ्यांचे हजारो बैल लुटले. "लुटिल कावाड। वाणी

जाधवाच्या संग्रहीं असलेल्या एका जुनाट बखरीवरून घेतली असल्यामुळे महत्वाची आहे आपल्या उपयोगापुरती त्यातील माहिती पुढीलप्रमाणे—

लुखजी जाधवाचा चकमकीत काळ झाल्यानतर त्याची बायको आपला दीर भेतोजी ऊर्फ जगदेवराव याकडे गेली. जगदेवरावाला मोंग लानी ५००० स्वाराची मनसब दिली मुलगा बहादुरजी व नात मानसिंग यासहि मनसबा दिल्या तसेच जगदेवरावास रुस्तुमराव हा किताब दिला. जगदेवराव १६३५ त दिल्लीस वारला. त्याने लुखजींचा तिसरा मुलगा बहादुरजी यास दत्तक घेतल होतं.

मूळ लुखजी जाधवाबरोबर त्याचा जो मुलगा अचलोजी मारला गेला होता त्याचा अज्ञान मुलगा सताजी यास व अचलोजीचे बायकोस घेऊन सुप्रसिद्ध जिजाबाई भोसलेची आई म्हाळसाबाई ही पुणे प्रांतीं गेली.

लुखजींचा सर्वांत कनिष्ट मुलगा राघोजी त्याच्या शाखेतील दुसरा पुरुष दत्ताजी तोच या पोवाड्याचा नायक मोंगलातर्फे लढताना तो कर्नाटकात १६६४ त पडला असे काळे लिहितात. कर्नाटक म्हणजे विजापुराकडील भाग हाच अर्थ त्याना अभिप्रेत असावा.

## पोवाड्यांतील हकीकत

निव्वळ पोवाड्यावरून निघणारी माहिती पुढीलप्रमाणे आहे. औरंगजेबान दक्षिणेवर स्वारी करण्याचा हुकूम देऊन शिवाजीचे किल्ले काबीज करण्यास सांगितल त्याने पाठविलेल्या सैन्यात पुढील सरदार होते मुख्य सेनापती दिलेरखान नतर दाऊदखान, सरफराजखान, कुरतुबखान, लोदी मुशाफिरखान, हे मोगल, रोहिले व पठाण जातीचे त्याचे जोडीस दक्षिणी च रजपूत सरदार होते ते पुढीलप्रमाणे. रावरभा निंबाळकर, बाबाजी भोसले, जगजीवन जाधवराव, माणकोजी काळ (ब्राम्हण), दस्वतसिंग व भावसिंग, राजाकर्ण, मिर्झाराजा जयसिंग

या लष्कराने येऊन पुरदरास वेढा दिला व पुरदराजवळील अगदी नजिकचा वज्रगड उर्फ रुद्रमाळ नावाचा किल्ला होता त्यावर तोफाचा मारा धरिला. बरेच दिवस किल्ला जोरान भाडला तथापि तो शत्रुसैन्यपुढ राखता येण यापुढे मुष्कील आहे अस समजून गडकऱ्यानीं "यापुढ किल्ला लढविण

शक्य नाहीं, काय करावें ते कळवा ।" असा तानडींचा निरोप शिवाजीमहाराजाकडे पाठविला. जासुदानें गडाची सर्व खबर त्यांस कळवून सांगितलें की, "यापुढे सल्याचें बोलणें घातलें नाहीं तर मोंगल सैन्य हटवून किल्यावर चढल्याशिवाय राहात नाहीं. व मग त्या कत्तलींत आपलीं माणसें मात्र फुकट मारलीं जातील." जासुदाची मुखजबानी ऐकल्यावर महाराजांना प्रथम थोडें इशिम म्हणजे त्वेषच आला. ते उद्गारले "आजपर्यंत मी मोगलाशी दावा लाऊन त्यांची दृष्टी नरम केली नाहीं काय? शास्ताखानाची शास्ती केली आणि मागाहून जसवतसिंग येऊन त्यानें सिंहगडास वेढा दिला; तेथेंही त्याचा पराभव करून त्यांस परत पिटून लाविलें. असें असतां आतां पुरंदर हातचा मोगल छिनावून घेतात काय!" परंतु पहिला आवेशाचा भर ओसरल्यानंतर विचारें पाहता त्याना खरी वस्तुस्थिति उमगली व मुलुखभर पसरलेल्या एवढ्या प्रचंड मोंगली फौजेशीं या वेळीं आपणास सामना देता येणार नाहीं हें ओळखून त्यानीं राजा जयसिंगामार्फत तहाचें बोलणें लाविलें. जयसिंगानेहि मी 'रजपूत, तूंहि मराठा, रजपूतच' असा दिलासा देऊन शपथप्रमाण दिल्यावर त्याचा तह ठरला, "भिऊ नको मराठ्या, शिवाजी! कौल राखण तुला" असें पक्कें अश्वासन मिळाल्यावर महाराज म्हणाले, "मिलकर जाना रजपुताला".

नंतर महाराजांनी किल्ला मोगलांच्या हवालीं केला व त्यावर मोंगली निशाण चढलें. तहाप्रमाणे इतरहि किल्ले बादशहाच्या हवालीं करून महाराज पातशाही चाकर झाले.

ही शिवाजी महाराजावरील मोहीम उरकल्यानंतर पातशाही हुकमाप्रमाणे मोगलांनी विजापुरावर मोहीम काढली. तींत ८०,००० घोडदळ होतें. आघाडीस दिलेरखान चालला तो वरक्मभोशाला गेला व तेथून मगळवेढ्यास जाऊन तेथल्या कोटाला मोगलांनी वेढा दिला. त्यांनीं कोट जिंकला. परंतु आंतला विजापुरी सरदार सरफरासखान पळून गेला होता. मग मोगली फौज निलंग येथें गेली व तेथें छावणी करून राहिली. उलट विजापुरी लोकांनीं गनिमी काव्यानें मुलुखाची नासधूस करून तो उध्वस्त करून मोगलांची रसद मारण्याचा सपाटा लाविला. त्यांनीं त्याच्या वणजाऱ्यांचे हजारो बैल लुटले. "लुटिल वाबाड। याणी

बहुत नागविला." नतर मोगलांनीं दत्ताजीराव जाधवाला छापे घालणाऱ्या विजापुरी फौजावर जाण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणे तो आपली फौज घेऊन निलगाच्या रोखानेच निघाला. कूचमुकामातच एक दिवस तो सहज शिकारीसहि गेला. होणारा सारखी बुद्धी माणसाला अकस्मात् होते तसे झालें शिकार वगैरे झाली व मग भर दोन प्रहरी ती टोळी एका आंब राईत विसाव्यास उतरली. लोकानी आपली पागोटीं उतरली, कमरबद सैल केले, घोड्यावरची जिने उतरलीं. दत्ताजीहि आराम करीत हुक्का ओढीत किंवा पान चघळीत बसला. असे ते बेसावध होते. तोच दैवयोगाने विजापुरी सरदार सरजाखानाची टोळी तलाव्यास तिकडेच आली होती, तिने जाधवरावाचे निशाण ओळखलें व त्याची फौज येथे उतरली आहे ती सहजात घ्यावी असे तिने ठरविलें म्हणून सरजाखानाने हेजीब पाठवून दत्ताजीला असा निरोप पाठविला कीं आम्ही मोठ्या फौजेसह आलों आहोत, आम्हाशीं सामना देणे तुम्हास केवळ अशक्य आहे, "भाडता पुरेना तुम्हाला निघुन जावें ये वेळेला". पण या अपमानास्पद निरोपाने दत्ताजीची आग आग झाली व त्याने आपला पेशवा रखमाजी नावाचा होता त्यास बोलवून खलबत केलें आणि सांगितले कीं "आपण पायरव काढला म्हणजे पळून गेलो तर आपली दुष्कीर्ती होईल. काय वाटेल ते झालें तरी आपण शत्रूशीं लढाईला उभे राहाणार "भांडेन सर्तीनसी न आइकेनेटले या बोला" अखेर दत्ताजीने सरजाखानाच्या हेजिबाला उलट अपमानास्पद निरोप देऊन पिटून लाविला मग थोड्याच वेळात सरजाखानाच्या फौजेनें येऊन दत्ताजीच्या तळाला घेरा घातला आणि उभयपक्षी निकराचे रण सुरू झालें. सरजाखानाच्या राउतानी फळी फोडून दत्ताजीरावास जिवत पकडण्याची शर्थ केली त्या वेळी यशवतराव सरदार त्वेषाने तुटून पडला, तो मारीत मारीत सरजाखानाच्या निशाणापर्यंत गेला त्याच ते अचाट शौर्य पाहून खासा सरजाखानानेहि "खूब किये समशेर" म्हणून मान डोलावली! यशवतरावाला चागला आत येऊ देऊन "मारित पुढे येऊ दिला" आणि मग लगेच "साता पाचानी मेळविला." त्या हाणा हाणींत यशवतरावास अनेक जखमा होऊन तो ठार झाला दत्ताजीचा दुसरा पुत्र रघोजी रुस्तुमराव यानेहि अचाट पराक्रम केला. त्याला

एकवीस कहरी जखमा झाल्या. येसाजी पंचहत्यारी, संताजी, दावजी कमळजी, येसाजी सूर्याजी, आणि हंसाजी यांनीहि निकराचे झुंज दिलें. हंसाजीचे मनगट तुटून डोक्यावर जखम झाली. खासा दत्ताजी तर सारखा लढतच होता. त्यानें हातांत बरची घेऊन अनेक मुडदे पाडले. इतक्यांत शत्रूच्या कोणा शिपायानें पाठीमागून अनवळता वार केला. त्यामुळे दत्ताजीच्या हातांतील बरची उडून गेली. तेव्हा तो कमरेचा गुर्दा घेऊन लढूं लागला, पण लवकरच तो गुर्दाही शत्रूच्या शिपायांनीं उडविला. अखेर नाइलाजानें दत्ताजी पायउतारा आला आणि लगर घेऊन लढाई करूं लागला. त्याला अनेक जखमा चढल्या व अखेर डोळ्याला चकी लागून तो घायाळ मरणोन्मुख होऊन रणांत पडला. त्या बरोबर शत्रूनें तेथें एकच गोलमाल करून त्याचा मुडदा त्याच्या लोकांना काढूं दिला नाहीं. खासा सरजाखान आला व दत्ताजीचें शीर तोडून घेऊन जयघोष करीत निघून गेला.

दत्ताजी पडल्यावर लढाई संपली. रात्र झाली होती. तरी वार्ता कळतांच खासा दिलेरखान चवरडोलांत बसून दिवट्यामशाली लाऊन जाधवरावाचा मुडदा शोधण्यास रणभूमीवर आला. धड तेवढें मिळालें ते उचलून पालखींत घालून मोठ्या सन्मानानें तळावर आणलें. दत्ताजीचें प्रेत मोगल छावणींत येतांच त्याची बायको बहिणाबाई हिनें आकांत केला, त्याला सीमाच नव्हती.

रघोजी रुस्तुमराव जखमी तेथेच होता, त्यालाहि दुःखाचा 'कळंब आला.' "बहिणाबाईने आकांत केला। कळंब राघोजीला आला। रोदनाकारितां दिन उदया पातला।" दुसरे दिवशीं प्रातःकाळींच बहिणाबाईने सती जाण्याचा निश्चय जाहीर केला. मुडदा होता पण शीर नव्हतें ते मिळवून "शिराउंडाचीं" भेट केल्याखेरीज धर्माप्रमाणें अग्निसंस्कार होणें शक्य नसल्यामुळे बहिणाबाईने सरजाखानाकडे माणूस पाठवून मोठ्या मिनतवारीनें दत्ताजीच्या शिराची मागणी केली. सरजाखान मस्तींतच होता त्याला ते शीर विजापुरी बादशहाकडे पाठवून स्वतःचा मुजरा करून घ्यावयाचा होता. म्हणून तो शीर देईना व म्हणूं लागला कीं, "उमरावका शीर मैं भेजुगा दरबारला" असा मोठा पेंच येऊन पडला. पण याच वेळीं स्वजातीचे

खानदान माणूस उपयोगी पडते ! सरजाखानाच्या लष्करांत बाबाजी घाडगा हा एक मातबर मराठा सरदार होता. त्यानें सक्त रदबदल केल्यामुळे सरजाखानास अखेर शीर द्यावे लागले. शाहीर म्हणतो. " घाडग्यांनी बोल ( कीर्ति ) केला । आपला स्वहितधर्म ( स्वयातिधर्म ) राखिला । " मग यथाविधी शीर व धड जोडून चिता रचण्यांत आली. सर्व सौभाग्यालंकार घालून चंदनाची उटी लावून हत्तीवर बसून बहिणाबाई वाजत गाजत चितेजवळ आली. तिने त्या वेळीं अपार दानधर्म केला. अखेर यथाविधी चितेचे पूजन करून " रुद्रा योगिणी " सारख्या सतीत्वाच्या उग्र तेजानें तळपणाऱ्या त्या साध्वीनें राम म्हणत चितेंत उडी घेतली!

# दत्ताजी जाधवाचा पोवाडा

## १

( शाहीर—अज्ञान यमाजी )

नमीन मंगलमूर्ती ॥ म्यां नमिली सरस्वती ॥ विनवी कर जोडुनी मात हुदा दे मजप्रती ॥ रणामध्ये रणशूर म्हणविती ॥ प्राण त्यजुनि त्याग करिती ॥ मरणा हाक जीवना आकरसें साराच्या गती ॥ १

जाहाली पादशाही हुकमती ॥ वजीर विजापुरावरी जाती ॥ झगडला दत्ताजी मर्द थोर केली ख्याती ॥ गाजीवली समशेर बावीस उमराव जाणती ॥ २

वजीर होते कोण कोण ॥ सरलष्कर दलीलखान ॥ दलीलखान दाउदखान सरफरास कुरतुबखान ॥ रोहिले जोरावार पठाण ॥ चालले वजीर ॥ सगाते लोदी मुशापीरखान ॥ ऐका दखनचे वजीर ॥ ३

राव रभाजी निंबाळकर ॥ भोसल्या बाबाजींचे सगे जाधवराव वजीर ॥ जाधवराव जगर्जीवन ॥ माको बल्लाळ बिरामण ॥ रजपुताचा भार ॥ दसवंतसिंग राजा कर्ण ॥ ऐका रजपुती वजीर ॥ जेसिंग राजा ज्याचा सर ॥ भावसिंग चाले बरोबर ॥ रजपुताचे भार ॥ ४

---

मात हुदा दे मजप्रती—माते! हुदा दे मजप्रती; हुद्दा—काम, अधिकार.

मरणा हाक जीवना आकरसें साराच्या गती—मर (मरे) णाहाक (नाहक) जीव नाआक (नाहक) सेसाराच्या (संसाराच्या) गती; असें असावे. पण अशी फोड केली तरी समाधान होण्यासारखा अर्थ जुळत नाही.

बावीस उमराव जाणती—बावीस हा शब्द 'सर्व' या अर्थी वापरला आहे. सरलष्कर—सर्व लष्कराचा प्रमुख सेनापति. हुकमती—हुकूम. वजीर—सरदार. दलीलखान—दिलेरखान. जोरावार—गर्विष्ठ किंवा तम असणारे. माको—माणको असावे. बिरामण—ब्राह्मण भार—समुदाय. दसवंतसिंग—यशवंतसिंग. जेसिंग राजा ज्याचा सर—सर-मुख्य अधिकारी. ज्याचा जयसिंग हा मुख्य अधिकारी होता असें रजपूत सरदारांचे सैन्य.

ऐ....२

भीडता दलीलका लष्कर ॥ गड घेरिला पुनेधर ॥ रुद्रम्हालावर मार होतो थोरथोर ॥ पुनधरी झगडा झाला थोर ॥ झगडतां मावळला दिनकर ॥ झाली असे रात्र ॥ फिरले उमरावाचा भार ॥ ५

गड भांडता झाला जेर ॥ गडकरी केलासे विचार ॥ शिवाजी सर्जा-प्रति ज्यानी पाठविली खबर ॥ बला आलास हुजीर ॥ सांगे गडाची खबर ॥ चढतील मोंगल माणूस ॥ जाया होईल फार ॥ ६

---

पुनेघर–पुरदर. रुद्रम्हाळ–रुद्रमाळ ऊर्फ वज्रगड. फिरले–फिरला. गडकरी केलासे विचार—पुरदर गडकऱ्यांनी विचार केला.

सर्जा—सिंह. अफझलखान–वधाच्या पोवाड्यातही शिवाजीचा सर्जा या पदवीनें उल्लेख केलेला आहे.

वेला—बला आलासे हुजिर–'बला' ही मोडी वाचनाची चूक असावी. मूळ शब्द बक असा पाहिजे. बक म्हणजे चौकी. येथे अर्थ "तो जासूद हुजूर चौकीपाशीं म्हणजे खास शिवाजीमहाराजाच्या देवडीपाशीं आला.' 'म्यान बक' असाहि शब्द जुन्या कागदपत्रात येतो म्यानमुलुख तसा म्यानबंक म्यान म्हणजे स्वत चा, खास दिमतीचा असा अर्थ. बक किंवा बका म्हणजे राजाच्या किंवा सरदाराच्या देवडीजवळचे खास चौकीपहारे किंवा पहारेकरी

पुरदरे दप्तर भा ३ मधील खेडेबारे देशपाड्यांच्या करीण्यात हा शब्द आला आहे "राजेश्री साहेबाकडे (शिवाजीमहाराजाकडे) वाडियात गेलों. बकी गोमाजी नाईक (पानसवळ) व कृष्णाजी नाईक सोगटी खेळत बसले होते, त्यापाशी उभयेता बैसला 'ओसरीवरी राजेश्री साहेब (शिवाजी) व पेशवे व बावाजी नाईक, रघुनाथपत कोरडे व त्रिंबकपत डबीर, आबई यैसी बैसले होते. बंकांस व वोसरीस पांच–सहा हात अतर होतें" या वर्णनावरून बक किंवा म्यानबक म्हणजे राजाचा किंवा सरदाराचा खास शरीरसरक्षक म्हणजेच एडिकँप होय

रामदास–रामदासी मासिकाने छापलेल्या चौल येथील अधिकारी सम्प्रदायैकी ६३व्या लेखाकात म्यानबक शब्द आला आहे. "तदनतर माहाराज छत्रपति निर्गमिलीयावर राजेश्री सभाजी राजे याचा अमल जाहाला. त्याच्या अमलात पिलाजी तबीब याचा मूल, त्याचा मर्तब्रा रायेगडाहून परवाने

राजा बोले सर्दाराला ॥ म्यां मोगलासी दावा केला ॥ लुटली सुरत शास्तीखाना केल्या हल्ला ॥ मागून दसवतसिंग आला ॥ गड कोंढाणा भांडला ॥ भिऊ नको म्हराच्या शिवाजी कौल राखण तुला ॥ राजेच बोलले मिलकर ॥ ज्याणा रजपुताला ॥ ७

राज मोगल एक जाहाला ॥ गड मोगलाचे हातीं दिला ॥ पातशायाच झेंड तोफखाना चढविला ॥ गड पातशाया खालसा केले ॥ गडावर

---

येत. त्यामध्ये राजश्री बजाजी माहाले म्यानबक हुजरात, ते उन्मत्त होऊन माहाराजाजवल कबुलायत केली की हबसी याची उदेरी घेऊन देतो "

तसेच—"शके १७०७ सवसरी हबसी येण्हे चेऊल मारिले. मारावयास कारण सिवाजीराजे याचे नीरणाम्र वेधा होती. ते समई जागा जागाहून तबीब नेले. उपाये न चले. ते समई पिलाजी तबीब न्हाम्ही चेउलास होता त्यास नेऊन त्याचे हातोन गुण जाहाला म्हणौन त्याची नवाजीस करोन पालखी देऊन चेउलास पाठविला. तेण्हे मर्यादेनें वर्तणूक केली. त्या मागोन त्याचा पुत्र बजाजी माहाला रा सभाजी राजे याचे अमलात हुजरून मने चेउलास येत. राजश्री बजाजी माहाले म्यानबक हुजुरांत याचे मालुमातीने अमलदार जमीदार न्याये मनसुबी करावी" ( रामदासरामदासी मासिक वर्ष २०, अंक २४०, चौल येथील अधिकारी दसर.)

शास्तीखाना केल्या हल्ला—शाहिस्तेखानावर हल्ले केले. हल्ला हा शब्द जुन्या वाळीं स्त्रीलिंगी वापरीत असत. येथे हल्ला हा अनेकवचनी शब्द आहे.

*कौल राखण तुला*—तुला कौल देता, तुझे रक्षण करतो.

राजेच बोलले मिलकर ज्याणा रजपुताला—शिवाजीमहाराज म्हणाले कीं, " रजपुताला मिलकर जाना " म्हणजे रजपुताशीं ( जयसिंगाशीं ) सख्य किंवा तह करावा ( २ ) राजा जयसिंग म्हणाला " मी रजपूत आहे. माझा विश्वास धर व ' मिलकर जाना ' म्हणजे माझ्याशीं तह कर. जयसिंगाला ' मिर्झाराजा ' असा किताब होता. राजमोगल—राजा आणि मोगल म्हणजे शिवाजी व मोगल. झेंड—झेंड, झेंडे. गड पादशाया खालसा केले—निरनिराळे गड

चतुर सुभेदार ठेविले ॥ पातशाई चाकर झाले ॥ म्हणे शिवाजी राजा बोले ॥ बावीस उमराव मिळाले ॥ चवदा महाल वऱ्हाडात दिले ॥ हुकूम पाच्छायाचा जोड दिली आगराच आला ॥ ८

बाजा नगारा वाजिले ॥ पातशाही हेजीब आले ॥ विजापुरावरी मोहीम ऐसी हजार घोडा चाले ॥ खान म्हणे चालला तेथुनी ॥ आवघा कटकबद करूनी ॥ दिलीलखाना मोहोरे पठाण चाल केदारफणी ॥ ९

भारामागे भार खान कुरकुमभोरा गेला ॥ फौजेमोहोर फौज मोगल मगळवेढ्या गेला ॥ मगळवेढ्या जाऊन सरफरासखान वेढिला ॥ मारिला कोट खासा नाहीं सांपडला ॥ तेथून कूच केले कटकाला ॥ मोगल निलग

---

पादशहाच्या हवालीं केले म्हणे—या पोवाड्यात बऱ्याच ठिकाणीं 'म्हणे' असा शब्द आला आहे तो निरर्थक आहे उदाहरणार्थ, "म्हणे शिवाजी राजा बोले" "घोड्या घाला जीन म्हणे दत्ता जीराव बोले" किंवा "खान म्हणे चालला तेथुनि" आपण "तो म्हणे जाणार आहे" "काय म्हणे, त्याने चोरीच केली" इत्यादि वाक्प्रचारांत जसा म्हणे या शब्दाचा निरर्थक उपयोग करतो तसाच येथे शाहीराने केला आहे शाहीर पोवाडा म्हणताना गद्यासारखाच मध्यतरी पुष्कळदा म्हणतो व खुलाशादाखल गद्य वाक्येहि, कीर्तनात पद चालू असताना कथेकरी बोलतो त्याप्रमाणे बोलतो यापुढे याच पोवाड्याची राजवाडेप्रत छापली आहे ती पाहिली असता सर्व खुलासा आहेच जोड—जोडा, जासूदजोडा दिली—आगराच—दिल्ली आग्र्याचा दिल्ली-आग्र्याहून बादशहाचा जासूदजोडा हुकूम घेऊन आला बाजिले—वाजविले हेजीब—वकील, निरोप्या कटक बद करणें—सैन्याचा आवळाबावळा करणे, स्वारीवर निघण्यासाठीं सैन्याची तयारी तरतूद करणे कूच केले कटकाला—कटकाचे कूच करविले कटक सैन्य मोंगल रतुडेर दिला—मोडीवाचनाची चूक "मोगलाच डेरे दिला" असा मूळ पाठ असावा राजवाडेप्रतींत 'रखतडेर' असे शब्द आहेत त्यावरून कदाचित् 'रक्तडेरे' म्ह लाल तबू दिले, उभारले असहि म्हणता येईल निलगावर मोगलानी आपले डेरे दिले निलग हे ठाण नळदुर्गाच्या

पावला ॥ निलगे मैदानीं मोंगल रतुडेर दिला ॥ लष्करांनी मल्हपाणी ॥ वजीर करत्यार्ती धांवणी ॥ मोंगल आले वहु दुरूनी ॥ विद्लशाही केली खचर्णी ॥ १०

उमराव पाठविले शिरपाव देऊनी ॥ दाउदखान दलेलखान बसले मजालस करूनी ॥ हावसी बलूलखान बसला मजालस करूनी ॥ हिंदूराव केदारफणी ॥ घाटगा झुजारराव चालिला ॥ ११

नाईकजी पाडरा कुल वजीराचा मेळा जाहाला ॥ बोले सर्जाखान

---

उत्तरेस सुमारे २३ मैलांवर आहे. मल्हपाणी—मोडीवाचनाची चूक. 'फलटणी' असे पाहिजे. मोंगली सैन्याने फलटणावर चाल केली.

विद्लशाही—आदिलशाही मुलुख "विद्लशाही केली खचर्णी" म्ह. आदिलशाही मुलूख मारण्यास सुरुवात केली. शिरपाव—शिरोलकार. मजालस करून बसणे—दरबार भरविणें, मसलतीकरिता एकत्र बसणे. "-जाऊळीच्या मैदानीं बैसले शिपाई मजलशी। मिळून बारा शिपाई कधी न येती जाऊळीसी ॥ (पासलकर पोवाडा.) हिंदूराव केदारफणी—हिंदूराव घोरपडे याचाच केदारफणी किताब की काय कळत नाही. शिवभारतात घोरपडे याचे "घोरफटः" असे संस्कृतीकरण केलेले आहे तशासारखे हे काही आहे की काय कळत नाही. फणी म्ह. नागाची फटा किंवा फडा. परंतु केदार याचा अर्थ नाग किंवा साप असा कोठे आढळत नाही यामुळे संशय वाटतो. नवव्या चौकात केदारफणी शब्द आला आहेच. केदारफणी म्हणजे घोरपडे नसेल आणि अर्थच बसावावयाचा तर, 'कदारखानी' किंवा 'कंवरख्यानी' असे शब्द असावेत असें गृहीत धरले पाहिजे. कमरगा म्हणजे सैन्याच्या आघाडी-पिछाडीमधील कमर किंवा मध्यभाग. तो शब्द घेतला तर दिलेरखान गोट आवळून त्यास सैन्याच्या मध्यमार्गी घालून चालला असा अर्थ बसविता येईल. (२) दिलेरखानाच्या पुढे खदारखानी म्हणजे कंदहारी पठाणाची फौज निघाली. कुल—सर्व दबडा केला—दौड केली, दौड करून छापा घातला. वणजारी—वणजारी लोक. हे लोक सैन्यात

दवडा केला ॥ सातशे वणजारा लुटला ॥ लुटिले फाबाडवाणी बहुत नागविला ॥ १२

हुल पडली कुल कटकाला ॥ गोट मारूनियां नेला ॥ मारिलास गोट सर्जाखान निघून गेला ॥ कागद दर्वारीच आला ॥ मर्द कबरबस्त केले ॥ घोड्या घाला जीन म्हणे ॥ दत्ताजीराव बोल ॥ १३

---

धान्य पुरविण्याची कामगिरी करीत असत. येथे ७०० वणजारा लुटला म्हणजे सातशें वणजाऱ्याचे लादलेले हजारो बैल लुटले. कॉस्मे द गार्डा हा आपल्या शिवचरित्रात लिहितो—'या वणजाऱ्यांना घरदार नाहीच. त्यांचे जन्ममृत्यु संसार सर्व काही प्रवासात व्हावयाचे. हे लोक शेकडो हजारो बैल ठेवून त्यावर धान्याच्या गोण्या लादून सैन्याला धान्यपुरवठ्याचें काम करीत. लढाईच्या वेळीं सैन्यास धान्यपुरवठा करण्याचें काम असते तेव्हा वणजारी लोक दहावारा हजारपर्यंत जमून लक्षावधि बैलांचे कळप लादून नेतात. अर्थात् त्याचे एक स्वतंत्र सैन्यच तयार होतें. संरक्षणासाठी हे लोक धनुष्य-बाण किंवा बंदूक घेऊन चांगले लढतातहि.' वणजाऱ्यांची, लढणाऱ्या उभय पक्षाना नेहमीच जरूर भासणारी असल्यामुळे त्यांना होतां होईल तों न मारण्याचा संकेत सार्वत्रिकच होता ज्याप्रमाणे युद्ध्यमान राष्ट्रांच्या वकिलाना अभय असतें तीच स्थिति वणजाऱ्यांची; तथापि लढायांच्या हंगामांत हे संकेत पाळले जातच असं नाही. खुद्द याच पोवाड्यांत तसा प्रकार वर्णिला आहेच. वणजारी आणि त्यांचे बैलांचे तांडे म्हणजे एक फिरतें शहरच कसे असे व ते वणजारी मुक्कामाच्या जागीं कशी व्यवस्थित लढाऊ ठाण्यासारखी रचना करीत याची वर्णनें हेवरच्या "नॅरेटिव्ह ऑफ ए जर्नी थ्रू अप्पर प्रॉव्हिन्सेस ऑफ इंडिया" या ग्रंथात किंवा मार्क्विस ऑफ हेस्टिंगज याच्या 'प्रायव्हेट जर्नल'-मध्यें आलेलीं आहेत. तूर्त जिज्ञासूनी चिंतामणराव वैद्यांच्या कृष्णचरित्रांतील सुरुवातीचे फिरस्त्या यादव गोपालांच्या तळाचें वर्णन पाहावें. ते थेट वणजाऱ्यासारखेच असलेलें आढळून येईल.

फाबाड—ओझें, लांकूड फाटा. हुल पडणें—आवाई होणें, बोंबाबोंब होणें. मारिलास—मारिलासे—मारिला असे. गोट मारणें—गोट लुटणें. दर्वारीच—ही मोडीवाचनाची चूक आहे.

हुजुराती म्हालदार आला ॥ मर्दतगटी यवकेल ॥ बाहीर निघतां जैसा सुबान प्रकाशला ॥ अग्निचा गलोला दत्ताजीराव जाधव चालिला ॥ बाजा नगारा बाजीला ॥ भार निलग दाविला ॥ १४

भारामध्ये धूर लक्षण शोभ दत्ताजीला ॥ शिकारीचा छंद ज्याला ॥ इसारत देतो शिपायाला ॥ रखमाजी पेशवा यशवंतराव मोहोर जाला ॥ रघोजी रुस्तुमराव भार कडाक्याने चालिला ॥ १५

शिकार खेळुनि भार आमराईत उतरला ॥ दुनदारी मौजा त्याला हुका बारदार भरिला ॥ मुकमंडण विडा पानाचा घेतला ॥ दुनदारी मौजा

---

" खबरीचा " या मोडी शब्दाचे " दर्बारीच " हें अशुद्ध वाचन झालें. त्यामुळे हा गोंधळ. कागद खबरीचा आला म्हणजे गोट लुटून नेल्याचें पत्र आलें असा अर्थ. मर्द—मर्दें, मर्दानें. कंवरबस्त केले—कंबरा बांधल्या, तयार झाले. बोल–बोले. हुजुराती म्हालदार आला— हुजूरचा भालदार आला. मर्द तगटी यवकेल—येथे तर कहर झाला आहे. ही मूळ पोवाडा म्हणून दाखविणाऱ्या गोंधळयाच्या पाठांतराची चूक किंवा गोंधळ्याचे शब्द मोडींत लिहून घेणाऱ्या लेखकाची चूक, कांहीं कळत नाहीं. तथापि मूळ शुद्ध पाठ "मदत करी ये येळेला" असाच असला पाहिजे हे अशुद्ध पाठाचे सूक्ष्म दृष्टीने मनन केल्यानंतर लक्षांत येईल. हुजूरचा भालदार आला व त्यानें 'शत्रूने गोट लुटून नेला आहे सबब मदतीस जा' असा हुकूम सांगितला. सुबान—सूर्य. गलोला—गोळा, बिंब. भार निलग दाविला—निलंगाच्या रोखानें भार म्हणजे भारानें म्हणजे सैन्यानें रोख दाखविला म्हणजे कूच केलें. भारामध्ये धूर लक्षण शोभ दत्ताजीला—धूर लक्षण म्हणजे 'दुर्लक्षण' तर नव्हे! दुर्लक्षण म्हणजे वाईट डोहाळे, अशीं घातक ठरणारी इच्छा असाहि अर्थ घेतां येईल. सैन्यांत असतां या वेळीं दत्ताजीला शिकारीची इच्छा उत्पन्न झाली हें दुर्लक्षणच नव्हे तर काय? कारण शेवटीं त्यापायींच त्याला मृत्यु आलेला आहे. ज्याला—त्याला. दुनदारी— दुनदारी हा शब्द मुळांत दुनपारीं ( म्ह. दोनप्रहरीं ) असा असला पाहिजे. मोडीवाचनांत 'दा' व 'पा' चा घोटाळा होऊं शकतो. दुनपारीं म्हणजे दुपारीं असा पाठ घेतला म्हणजेच आमराईशीं त्याचा उत्तम मेळ बसतो.

ज्याला ॥ हुका वारदार भरिला ॥ उडती पागार कटीतग जीन भिडती त्यातें ज्याला ॥ १६

गमत करितां वेळ जाहला ॥ वाजा नगारा वाजिला ॥ पधरा हजार घोडा सर्जाखान दौड आला ॥ जाधवराई निशाण भार आमराईंत वळखिला ॥ सर्जाखानी हेजिब आला ॥ काय बोले दत्ताजीला ॥ १७

भांडतां पुरवेना निघून जावें हे वेळेला ॥ जाब जिन्हारीं लागला ॥ पेशव्या रखमाजीस बोलला ॥ काटखा काढितां नामवस जाईल आपुला ॥ भाडन सर्तीनसी नाईक नटले या बोला ॥ १८

---

मौजा त्याला—'पानौत्याला' असा मूळ पाठ असावा. पानौत्याला म्ह. पार्णौव्याला म्ह. पाणवठ्याला मोडीवाचनाची चूक. दुमदारी–मौजा हुका वारदार भरिला—दोनप्रहरीं वारदारानें भरून दिलेले हुके ओढीत मौजा करीत आराम घेत बसले असा भावार्थ. मुकमडण—तोंड रंगविणारा, रंगदार, पानतंबाकू.

उडती पागार कटीतंग जीन भिडतें त्यातें ज्याला—" उडती पागा रकटीतग जीन भिडविला " असाही एक पाठ शितूत देतात. तथापि त्याचाही अर्थ लावण्याची मुष्कील आहे. मूळ पाठ ' उडती किंवा झडती नगार कटितग जीन भिडती त्यातें ज्याला ' असा असावा. दत्ताजी वगैरे लोक विसावा घेत बसले आहेत तोंच शत्रूचे नगारे टंकारे ऐकू आले. त्या-वरोवर दत्ताजीच्या लोकानी खडबडून जागे होऊन कमरा आवळून व घोड्यावर जिनें घालून सज्ज होण्यास लागले असा अर्थ दिसतो. जाधवराई निशाण भार आमराईंत वळखिला—जाधवरावाच्या निशाणा-वरून त्याचें सैन्य आमराईंत उतरलें आहे असें सर्जाखानानें ओळखलें. सर्जाखानी—सर्जाखानाचा. हेजीब—वकील, बोलणेकरी. भांडतां पुरवेना इत्यादि—तुम्हास आम्हाशीं टक्कर देणें अशक्य आहे. तुम्ही तावड-तोब येथून निघून जावें. काटखा काढितां—काटखा ही मोडीवाचनाची चूक असावी. पायरवा असा शब्द मुळांत असेल. पायरव करणें म्हणजे पळून जाणें. पायरव काढतां आपला नामोश म्हणजे अब्रू जाईल. नामवस=नामोश, अब्रू. भांडन सर्तीनसी–भांडेन शर्तीनशीं. निकरानें लढेन. शर्त–पराक्रम. नाईक—नाइके, न आइके. नटले या बोला—नेटले या बोला असें पाहिजे.

सर्जाखानी हेजीब फिरविला ॥ निश्चय झगड्याचा मांडिला ॥ बाणांनी बंदुका वर्षाव एक जाहला ॥ दत्ताजी अवसंधा सापडला ॥ घेरा रावताचा पडला ॥ एक म्हणती जीत धरा दत्ताजीला ॥ १९

दत्ताजीराव बोले वचन ॥ आली निर्वाणीची वेळा ॥ हे इतुके ऐकुनी यशवंतराव बोले राजाला ॥ राव रजा द्यावी मला ॥ घोडली समशेर मारीत भारावरी लोटला ॥ २०

भैरी हातचा सुटला ॥ मारीत भारावरी लोटला ॥ मारी कर्डा हात दुर्धड करी रावताला ॥ राव निशाणीसी भांडला ॥ सर्जाखान मानावला खुब किये समशेर म्हणती हिंदुजान भला ॥ २१

मारीत पुढे येवू दिला ॥ सातापांचांनी मेळविला ॥ सन्मुख चढल्या जखमा ॥ यशवंतराव पुरा केला ॥ दत्ताजीराव बोले वचनीं ॥ यशवंतराव पडला रणी ॥ निर्वाणीची वेळ बाजू राखाया नाही कोणी ॥ २२

---

म्हणजे नेटाने असे उत्तर दिले अवसंधा—अवसात ( Poetry अवस्तु ) Suddenly unawares (मोल्स) 'अवसुती' असा मराठीत त्याचाच अपभ्रंश सध्या रूढ आहे. जसें, ' त्याला अवसुती मार लागला', सारांश, मूळ शब्द अवसथा असा असावा. दत्ताजी अवसंधा सांपडला—दत्ताजी अचानक अडचणींत सापडला. एक म्हणती—कोणी ओरडले. रजा द्यावी—परवानगी द्यावी रजा—परवानगी अर्थात् हल्ला करून जाण्यास. घोडली—उपसली भैरी हातचा सुटला—बहिरीससाणा जसा शिकार दिसतांच मनगटावरून ताडकन उडून जातो, तसा यशवंतराव धावून गेला. कर्डा हात मारणें—उत्तम प्रकारे तलवार चालविणे. ' लहान पराई होऊन शुराने कडा हात केला ' (निंबकराव दाभाडे पोवाडा) निशाणीसी भांडला—(१) सर्जेखानाच्या निशाणापर्यंत मारीत आत शिरला, (२) नाव होण्यासारखे लढला. सर्जाखान मानावला—सर्जाखानानेही मान डोलाविली कीं, "खुब किये समशेर". म्हणती हिंदुजान भला—हिंदु जन 'भला भला' म्हणजे शाबास शाबास अशी त्याच्या शौर्याची तारीफ करू लागले. सन्मुख—छातीवर व तोंडावर. पुरा केला—ठार केला. बोले वचनी—उद्गारला. करणी—पराक्रम. झगडा खेळे झोट धरणी—

रघुरायाची करणी ॥ झगडा खेळे झोट धरणी ॥ पुरबाणाची वर बर्च्यांची शिंपणी ॥ सारी सराईत मर्दाला ॥ मरणाचें भय नाही त्याला ॥ वाग धरूनि मारामारी रावुताला ॥ २३

निःशक भाडतो निर्वाणी ॥ वाग मोकळ्या सोडुनि ॥ एकवीस जखमा आल्या रावराघोजी लागुनि ॥ राघोजीनें झगडा दिला झोतर जिवानिशी वाचला ॥ गळा घातली शिगण ॥ रुस्तुमराव पाडाव केला ॥ २४

येसाजी पचहत्यारा निवडला ॥ मारीत मारावरी लोटला ॥ मारी कर्डा हात दाणादाणी रावताला ॥ कर्डा सताजीने झगडा दिला ॥ दावजी कमळजी लोटला ॥ २५

येसाजी सूर्याजी आपले भांडतील विभिला ॥ येक करतील पायस्वारी येक राखतील खाशाला ॥ मतगट तोडुनी शिरीं जखम हसाजीला ॥ दत्ताजी चालला तेथुनी ॥ तेथ झाली खणाखणी ॥ २६

---

रघोजीनेहि प्रत्यक्ष केशाकेशीसारखी शत्रूस भिडून लढाई चालविली झोटधरणी—हातघाई, केशाकेशी पुरबाणाची वर बर्चांची शिंपणी—बाणाचा पूर आणि बर्चीचा वर पाऊस सारी सराईत मर्दाला—बाणाचा आणि बर्चीचा पाऊस पडत होता तरी तो अनेक लढाया लढलेला लढवय्या अस ल्यामुळे त्याला त्याचा सरावच होता त्याला त्याचे कांहींच भय वाटले नाही

वाग धरुनी—वाट धरून, वाट रोखून, टिपण धरून वाग रस्ता किंवा वाट मारामारी—मारमारी अस पाहिजे गळा घातली शिगण—"गळा घातलीसे कमान" हाच पाठ बरोबर. कमान म्ह—धनुष्य शत्रूला पकडून नेताना त्याच्या गळ्यात धनुष्य अडकवून नेण्याची पद्धत पुराणांतरी प्रसिद्धच आहे मात्र राघोजी रुस्तुमराव वरीलप्रमाणे शत्रूने पाडाव करून नेला नव्हता हे सुरवातीची ऐतिहासिक माहिती पाहिली असता कळून येईल शिवाय याच पोवाड्यात बत्तिसाव्या चौकात राघोजी रुस्तुमराव हा जखमी होऊन मोगली तळावर परत आलेला होता असे सांगितल आहे अनवळता—अचानक न कळता. नेमून—नेम धरून, टिपट साधून गुर्दा—खंजीरासारखे किंवा गदेसारखे हत्यार हंगर देउनियां बैसला—लढायात हत्ती सैरावैरा धावू लागून त्यामुळे

मुडामुड पाडुनि येका चढीत येक दारुण ॥ ठीक दाविती तेजाला ॥ मार भरितो बर्शाला ॥ मारी आनवळता हात बर्शा हातचा उडाला ॥ कमरेच्या गुर्दा हात केला ॥ २७

नेमून उमराव पाडिला जाहला असे ठणका ॥ गुर्दा हातचा उडाला ॥ दत्ताजी पायउतारा आला ॥ लगर देऊनिया बैसला ॥ २८

येला घनचक्कर हात दाविती खाशाला ॥ दत्ताजी होता भवदुःखित ॥ मग रावतांनी मेळविला ॥ सन्मुख चढल्या जखमा ॥ चक्री लागली डोळ्याला ॥ दत्ताजी पडलासें ऐकिला ॥ सर्जाखान चालून आला ॥ २९

कापले शीरकमळ लगर हातचा काढिला ॥ रण हुबतसे धरणीला ॥ सर्जाखान निघून गेला ॥ दत्ताजी पडलासे ऐकिला ॥ मग लोधीनें भार केला ॥ खासा दलीलखान चवरडोलांत बैसला ॥ ३०

दिवटीच्या हिलालें खान रणामध्ये आला ॥ जाधवराई मुरदा उचलून पालखीत घातला ॥ वाजत मिरवत मुरदा डेऱ्यास आणिला ॥ आग्रुद्ध भरले रुड बहिणाई आळवी हृदयाला ॥ ३१

जाधवराया मागें नांव होतें दत्ताजीला ॥ बहिणाईनें आकांत केला ॥ कळव राघोजीला आला ॥ रोदना करिता दीन उदया पातला ॥ तेव्हां बहिणाईनें शीर मागावयास बदा पाठविला ॥ ३२

---

लढाई बिघडतेशी वाटली तर हत्तींचे चारी पाय साखळदंडाने बांधून घालीत त्या साखळदंडाला लगर अशी संज्ञा आहे. आणि त्यावरनच मारूं किंवा मरूं या निश्चयाने जागच्या जागी गाडून लढणाऱ्या शिपायाला तो लगर देऊन बसला असें म्हणतात. भवदुःखित—मूळ भव दुःखित. पण येथे भावार्थ—बेभान, बेहोष, जखमांमुळें. चक्री—एक प्रकारचें फेकून मारण्याचें हत्यार असावें. लंगर हातचा काढला—An anchor. टिकाबासारखें किंवा बोटीच्या नांगरासारखें हत्यार; पण येथें लगर म्हणजे दत्ताजीच्या हातातील सोन्याचें कडें किंवा तोडा. सर्जाखानानें दत्ताजीचें शीर कापून घेतलें व हातांतील तोडा काढून बरोबर नेला खूण पटविण्यासाठी. चवरडोल—अंबारी. दिवटीच्या हिलालें—दिवट्या-हिलाल लावून.

बदा आलासे हुजूर ॥ काय सांगे त्या खानाला ॥ यावें शिरकमळ सर्जाखानास बोलला ॥ बदा हुजुराती देखिला ॥ खान दापूनिया बोलला ॥ उमराव का शार मैं भेजुगा दरबाराला ॥ ३३

घाटका बाबाजी बोलला ॥ अशी वेळ घडती मर्दाला ॥ द्याव शिर कमळ सर्जाखानास बोलला ॥ घाटगा बाबाजीच बोलला ॥ जाव खानाच्या मना आला ॥ तेव्हा सर्जाखान बदा नजिक बोलविला ॥ ३४

घाडग्यानीं बोल केला ॥ आपला स्वहितधम राखला ॥ शीर घेतलें मागून बदा वाटेसी लावला ॥ शिररुडा भेट केली ॥ मग रचल सरण वहि-णाईचे आगीं आल सतीचें फुरण ॥ ३५

उटी घेऊन चदनाची दिसे रुद्रा यौगिण ॥ हत्तावर बैसुनी दिसते स्वर्गीच विमान ॥ फोडूनिया भाडार द्रव्य वाटती भाटाला ॥ वाजत मिरवत आली सरणाजवळी ॥ ३६

वहिणाबाईनें उडी टाकिली ॥ रामराम स्मरूनि ॥ खान माघारा फिरला ॥ आपल्या मुलखास चालला ॥ पधरा हजार घोडा सजाखान दुमाला केला ॥ काकरळ्या तळ्यापें मद कठक बद केला ॥ ३७

---

जाधवराई मुर्दा —जाधवरावाचा मुदा आशुद्ध-अशुद्धें, रक्तान रुड-मुडके कळव—उभडा, हुदका कढ रोदना करिता इ. शोक करता करता दिवस उजाडला बदा—नोकर अशी वेळ घडती मर्दाला—असा प्रसग मदालाच घडतो, म्हणजे रणागणात शिरकमळ जाण्याचा बोल केला—बोलबाला केला, कीर्ति मिळविली स्वहितधर्म—स्वयातिधम असा शब्द शाहिरास अभिप्रेत आहे विजापुरी लष्करातील मराठा सरदारानें शत्रुपक्षाच्या मराठा सरदाराच शव व शिरकमल त्याच्या आतेष्टांच्या हवाली करून त्याच उत्तरकार्य सपादण्यास मदत करण हा यातिधम किंवा जातिधम भाऊसाहेब पेशवा व परशुरामभाऊ पटवधन याच्या दहनासवधींची पत्र पाहा शिरारुडा भेट केली—वास्तविक शिरा धडा असे पाहिजे कारण रुड म्हणजेच शिर सतीचें फुरण—सती जाण्याचें स्फुरण हत्तीवर बैसुनी दिसतें स्वर्गाचें विमान—हत्ती वर बसून चितेकडे निघाली

हत्तीवर जोडल्या हातनाळा ॥ उटावर जोडिले जबूर ॥ बाणाच्या सर्वे जूल्या राजा मिर्जा मोहोर झाला ॥ पधरा हजार सर्जा एकागी भाडला ॥ जबुन्याच्या गोळ्या सर्जाखान पुरा केला ॥ ३८

सर्जाखान पडलासे ऐकिला ॥ दलेलखान चालून आला ॥ कापलें शीरकमळ लगर हातचा काढिला ॥ रण हुबतसे धरणीला ॥ दलीलखान निघून गेला ॥ ३९

झगडा झाला थोर दत्ताजी जाधवराव पडिला ॥ अज्ञान यमाजी भगवताची सेवा त्याला ॥ हृदयी लक्ष लावुनी ज्यानी विरमाल गाईला ॥ सव्वा शेर सोन्याचा तोडर घोडा बक्षीस केला ॥ ४०

---

भाटाला—ठाकराला महाराष्ट्रीय भाटाना ठाकूर किंवा ठाकर म्हणत "पूर्वी मराठ्याच्या बायका सती जात तेव्हा ठाकराचा हात धरून चितेला प्रदक्षिणा घालीत. नतर अग्नि प्रवेश करीत "म्हणजे कुलगुरुत्व ठाकराकडे असे" (भारत इतिहाससशोधक मडळ त्रैमासिक अक ४ वर्ष ९ पृष्ठ ८) दुमाला केला—पाठलाग केला दुमाला घेणे असा शब्द बखरीत येतो—तळ्यापें—तळ्यापाशी मर्द कटक बद केला—मदान कटकाचा मुक्काम केला किंवा गोट आवळून बसला हातनाला—हस्तनाला, हत्ती वरच्या तोफा. जबूर—उटावरची तोफ जूल्या—जुडगा (आगी च्या बाणाचा) सर्जा—मनायान एकागी भाडणें—अप्रतिम पराक्रम करण, अफझलखान वधाच्या पोवाड्यात हा शब्द आला आहेच गोळ्या—गोळ्यान विरमाळ—पोवाडा वीरकाव्य तोडर—तोडा

# दत्ताजी जाधवाचा पोवाडा

## २

### ( राजवाडेमत )

कै. इतिहासाचार्य राजवाडे यांच्या संग्रहीं दत्ताजी जाधवाच्या पोवाड्याची एक नक्कल केलेली होती. राजवाड्यांच्या मृत्यूनंतर कन्हाडचे श्री. वा. दा. मुडले यानी आपल्या ब्राह्मण मासिकाचा खास राजवाडे–स्मृति अंक काढला होता. त्यांत धुळ्याचे श्री. भा. वा. भट यांनी दत्ताजीच्या पोवाड्याची ती नक्कल शोधून छापली. रा. भट यांनी जी नक्कल छापली तीवर राजवाड्यांनी पोवाडा कोणाच्या संग्रहांतील मोडी वा बाळबोध बाडावरून उतरून घेतला किंवा एखाद्या गोंधळ्यास तोंडी म्हणावयास सांगून लिहून घेतला हें काहीएक लिहिलेले नाही. तथापि राजवाड्यांच्या पोवाड्यांत ठिकठिकाणी गोंधळी पोवाडा प्रत्यक्ष म्हणत असतां खुलाशादाखल किंवा पादपूरणार्थक म्हणून जीं गद्यवाक्ये उच्चारतो तीं कंसांत दिलेलीं आहेत. त्यावरून राजवाड्यांनीं पोवाडा कोणा गोंधळ्यास म्हणावयास सांगून उतरून घेतला असावा असाच तर्क होतो.

श्री. शितूत यांनीं आपल्या पुस्तकांत जो पोवाडा छापला तो हुपरी येथील गुंडु गोंधळ्याच्या लेखी बाडावरून. शितूत यांना या पोवाड्याच्या आणखीही दोन प्रति अनुक्रमे माणगांव येथील बाबाजी गोंधळ्याच्या व कोल्हापूर येथील पाडू गोंधळ्याच्या दप्तरांत आढळल्या. हुपरी येथील पोवाड्याची जी संहिता शितूत यांनीं मुख्य धरून छापली ती मोडींत लिहिलेली होती असें पान १६ वरील त्याच्या ११ नंबरच्या टीपेवरून स्पष्ट होतें. बाकीच्या दोन प्रति कोणत्या लिपींत होत्या याचा त्यांनीं निर्देश केलेला नाहीं.

राजवाडेप्रतींत घनचक्करराव नांवाच्या शिपायानें हा पोवाडा केला असें म्हटले आहे; पण तें बरोबर दिसत नाही. शितूत प्रतींतील पोवाडा शाहिरानें शेवटीं स्वत:चे नांव गोऊन पुरा केला आहे. त्या अर्थी अज्ञान यमाजी हाच त्या पोवाड्याचा शाहीर होय.

असो. शितूतप्रत व राजवाडेप्रत ताडून पाहतां त्यांत बरीच तफावत आढळली. दोनही प्रति अशुद्धच आहेत. मात्र एका प्रतींत जी चूक केली

आहे ती दुसरींत नाही. उलट दुसरींत जी चूक आढळते, ती पहिलींत नाहीं. प्रथम पाठभेदांचा सविस्तर तक्ताच तयार केला होता; परंतु त्यायोगें वाचकाचा अधिक गोंधळच होईल असे पाहून तसा तक्ता देण्याऐवजीं राजवाड्यांचा पोवाडाच स्वतंत्रपणें सगळा निराळा दिला आहे तो असा—

१

माझे मन नमन मंगलमूर्ति म्यां नामिली सारसती।
इनवी कर जोडुनी भवानी हुई धावी मती।
रणामधि रणशुर म्हणविती प्रांत जिल्हा करिती।
मरणाखर उद्राखर संसाराच्या गती।
झाल्या बादशाही हुकमती वजिर बिजापुरास जाती।
झगडला दत्ताजी, मर्दा, थोर केली ख्याती।
ख्याद मी गाईनरे जाधवरायाची करणी। (चाल)
झगडला न्याइाळिवला त्या निलेंगे मैदानीं।
तमाम उमरावाच्या भाल्याच्या शिपणीं।
यशवंतरायानें, मारिली पहिली बिनी॥

२

सरलष्कर दल्लेलखान वजिर होते कोण कोण।
दाउदखान उल्लेलखान शेख फरासी कुत्तमखान।
तर लिहिले जोरावर पठाण संगत लोदी मुशाफरखान।
चालले वजिर यावर बिनी दल्लेलखान॥

३

आयका दख्खनचे वजिर राव रंभाजी निंबाळकर।
भोसल्या बोवाजी संगत जाधवराव वजिर।
जाधवराव जगजीवन, माणकु वऱ्हाळ ब्राम्हण।
चालले वजिर यावर बिनी दल्लेलखान॥
(घोडा ८०,००० दिल्लीहून निघाला)

४

पुणंधरीं झगडा झाला थोर झगडतां मावळला दिनकर।
झाली आसे रात्र फिरले उमरावाचे भार।

मारले कबाडे वाणी बहुत नागविला ।
सर्जाखानी दवडा दिला ।
सातशें वजारा लुटला ।
कापलासे गोट सर्जाखान निघून गेला ॥

८

दत्ताजी बाहीरच निघाला सूर्य सुभान प्रकाशला ।
भारामधिं धूर रे रक्षण दत्ताजीला ठीक मग दावितो तेजिला ।
मार तो मरीतो वर्शिला ।
शिकारीचा छद विशारत देतो लष्कराला ( तर तो ) ।
खेळलासे शिकार जाऊन आमराईत उतरला ।
पधरा हजार घोडा सर्जाखान जोर आला ॥

९

( बडे मछिमे झाट सिंगा )
सर्जाखानी भालदार आला काय बोले दत्ताजीला ।
राव मग झगडता पूरवला निघून जावे या वेळेला ।
यावर शिवाजीच बोलला देश दुनया जाणे मला ।
झगडेन मी सल्लेशीं नायकू न टळे आपल्या बोला ॥

१०

सर्जाखानीं भालदार आला ( नि ) ।
निच्छय झगड्याचा मांडला ।
बाणा-वदुकांचा रे वर्षाव एक झाला ।

( जाधवराव, त्याचे लेक रघुराव, यशवतराव,रुस्तुमराव आणि सहा-जण शिपाई गठच्या गठ बसला. )

११

यशवतराय बोले रायाला राव रजा यावी मला ।
त्यानें योढली समशेर जाऊन भारावर लोटला ( तर तो ) ।
ऐ...३

उमराव आले बहु दुरूनी बिद्दलशाही केली ससनी।
पाठविले वाजिरराव शिरपाव देऊनी।
भांडतां गड जाला असे जार, गडकऱ्यांनी केला विचार।
शिवाजी महाराजाला हो त्यांनी पाठविली खबर।
हेजीब गेलासे हुजूर' सागरे गडाची खबर।
गड चढतील मोगुल।
माणुस जाया होईल फार। यावर शिवाजीच बोलला (चाल)।
म्यां मोगलाशीं दावा केला।
मारिले सुराईत शास्त्रखाना केली हल्ला।
मागून दसवसिंग आला।
गड तो कोंडाणा भांडला।
शिवाजी बोलला आता भेटूं रजपूताला (गड स्वाधीन केला)।

५

आवघा कटबध करून।
मोगुल चालला तिथूनी।
चालति विर्‍यीयेनी मोगला पढरपूरा गेले।
घेतले मगळवेढे, खासे नाहीं सांपडले (आहो)।
निलगे मैदानी मोगली रखत डेरे दिले॥

६

सर लष्कर सर्जाखान।
वजिर होते कोन कोन।
हिंदुळराव, केदारफणी, घाडगे झुझारराव चालले (तर ते)।
पाटरे नाईकजी कुळवत्राचा मेळा झाला।
बलुलखान पठाण बहार तो कडाक्याने चालला (तर तो)।
पधरा हजार घोडा सर्जाखान जोर आला॥

मारले कबाडे वाणी बहुत नागविला ।
सर्जाखानी दवडा दिला ।
सातशें वजारा लुटला ।
कापलासे गोट सर्जाखान निघून गेला ॥

८

दत्ताजी बाहीरच निघाला सूर्य सुमान प्रकाशला ।
भारामधिं धूर रे रक्षण दत्ताजीला ठीक मग दावितो तेजिला ।
मार तो भरीतो बर्शिला ।
शिकारीचा छद विशारत देतो लष्कराला ( तर तो ) ।
खेळलासे शिकार जाऊन आमराईत उतरला ।
पधरा हजार घोडा सर्जाखान जोर झाला ॥

९

( बडे मछिमे झाट झिंगा )

सर्जाखानी भालदार आला काय बोले दत्ताजीला ।
राव मग झगडता पूरवला निघून जावे या वेळेला ।
यावर शिवाजीच बोलला देश दुनया जाणे मला ।
झगडेन मी सखेशीं नायकु न टळे आपल्या बोला ॥

१०

सर्जाखानीं भालदार आला ( नि ) ।
निन्छय झगड्याचा माडला ।
बाणा-बदुकांचा रे वर्षाव एक झाला ।

( जाधवराव, त्याचे लेक रघुराव, यशवतराव,रुस्तुमराव आणि सहाजण शिपाई गठच्या गठ बसला. )

११

यशवतराय बोले रायाला राव रजा द्यावी मला ।
त्यान वोढली समशेर जाऊन भारावर लोटला ( तर तो ) ।

मारी कर्डा हात दाणादाण राऊताला ।
( की ) पधरा हजार घोडा, फळी फोडून पल्याड गेला ॥

१२

( सर्जाखानाचा मेव्हणा काशिमखान मुड्या हौद्यात ) ।
( उपटु बाण बाबा जाऊ दे प्राण यशवतराव मेला ) ।
जाधवराव बोले वचनीं, यशवतराव पडले रणीं ।
आणि आज बाजु राखायला निर्वाणी नाही कुणी ॥

१३

मग रघुरायाची करणी झगडा खेळे झोट धरणीं ।
भाडतो निर्वाणी वाघ मोकळे सोडूनी ( तर ते ) ।
*बाणाचे पूर वर बर्शीच्या शिपणी ।*
की येका आगळ एकवीस जखमा रघूजी लागूनी ।
रघूजीने झगडा केला हा तर जिवानिशी वाचला ।
गळा घातली कमान रुस्तुमराव पाडाव केला ॥

१५

(जाधवरावांचे तीन मुलगे व सहा शिपाई पडले)।
जाधवराव चालला निर्वाणी तिथ झाली खणाखणी।
मुडामुड पाडिले एका चढी एक दारुणी॥

१६

जाधवराव आवखदा सापडला घेरा रावताचा पडला।
(कीं) *एक एक म्हणती जितम धरा दत्ताजीला।*
(तर) *पिळ्या भागाचा मारिला।*
हात रे त्याने जोराने टाकिला।
झाला असे ठणका हातचा गुर्दा उडून गेला॥

१७

(*कासिमखान समोर आला*) (*त्याला जाधवाने मारला*) जाधवरावाची जोख्याची अणी हत्तीच्या पायात गेली. सन्मुख लागली जखम, चक्री लागली डोळ्याला, जाधवराव पुरा झाला

१८

जाधवराव पडला म्हणून ऐकीला।
सर्जाखान धावून आला।
कापिल शिरकबळ लगर (कडें सोन्याचें) हातचा काढिला (तर त्या)।
निलगे मैदानीं सर्जाखान यशवत झाला॥

१९

[ जाधवरावाची बायको वहिणाबाई ] ( तिचा भाऊ झुजारराव )।
बदा शिर मागाया गेला।
सर्जाखाना सलाम केला ( आहो )।
चद्या याहो शिर, सर्जाखानाशीं बोलला।
सर्जाखाना कुध आला।
बदा दाणून बोला।
उमरावका शिर मैं भेजुंगा दरबारला॥

२०

घाडग्यानीं बोल केला आपला सोयरेधर्म राखिला ।
शिर घेतले मागून बदा वाटेस लाविला ।
( तर ती ) शिरा रोडा भेट केली रचिलें सरण ।
बहिणाईच्या आगीं जैसा चर्चरिला चंदन ।
( तर ती ) लेवून बरवी कास दिसे रुद्रयवगीण ।
हत्तीवर बसून दिसे स्वर्गीचें इमान ।
( दह्लेलखान सतीच्या तेथे आला ) ॥

दिल्लीच्या बादशहानें देणग्या दिल्या त्यांत घनचक्करराव शिपाई होता त्यानें हा पोवाडा केला

---

# सेखोजी आंग्र्याचा पोवाडा

प्रस्तुत पोवाडा आम्हास आमचे स्नेही अलीबाग येथील शिक्षक रा. शां. वि. आवळसकर यांच्याकडून मिळाला. ते स्वतः इतिहासाभ्यासी असून अलीकडे त्यांनी प्रत्यक्ष संशोधनाचेही कार्य सुरू केलें आहे व गेल्या दीड वर्षांत त्यांनी कांही दप्तरें तपासून त्यांतील महत्वाचे लेख भारत इतिहास संशोधक मंडळाच्या सभांतून प्रसिद्धहि केले आहेत. हा पोवाडा त्यांना कोंकणांतील एका नेने दप्तरांत सांपडला. तो त्यांनी मूळ वहींतून नकलून आमच्याकडे पाठविला. यद्यपि त्यांनी तो कांटेकोरपणे लाऊन जुळवून असा सुवाच्य लिहून पाठविला तरी मुळांतच ती वही अत्यंत जीर्ण झालेली व तींत पोवाडा उतरून ठेवणारा मूळ लेखकहि अडाणी असल्यामुळे त्याच्या नकलेवरून पोवाड्याचा अर्थ लावतांना व खरा पाठ उन्नीत करतांना फारच कष्ट झाले.

या पोवाड्याचा कर्ता कोणी तरी चांगला संस्कृतविद्यासंपन्न ब्राह्मण गृहस्थ होता हे पोवाड्यांतील भाषेवरून व उपमांवरून सहजच दिसून येईल. राजश्री आवळसकर यांनी नेने दप्तरांतून संशोधून काढलेले 'नवरत्नमाला' नामक सेखोजी आंग्र्याच्या स्तुतीपर असे एक काव्य भारत इतिहास संशोधक मंडळ त्रैमासिक वर्ष २२ अंक १ मध्ये छापले आहे. त्याचा कर्ता मयूरेश शैव हा आहे. प्रस्तुत पोवाडाहि त्याच मयूरेश शैवाचा असावा असें वाटतें. शैव मयूरेशाचें घराणें आंग्र्यांच्या पदरचेंच होतें. सन १७९३ मध्ये राघोजी आंग्रे मरण पावला; आणि मानाजी आंग्रे गादी-नशीन झाला. त्या वेळीं कुलाबा संस्थानचे व्यवस्थेसाठी पेशव्यांनी माधवराव हरी नांवाचा माणूस पाठविला होता. "मानाजी व माधवराव हरी या उभयतांत जीऽआंग्रे संस्थानाच्या व्यवस्थेविषयीं ठरावांची यादी झाली त्या यादींत वे. रामभट शैव यांचे बंधू धोंडभट शैव तुम्ही अटकेत ठेवले आहेत त्यांस पोथ्या पुस्तकें व वस्तभावसुद्धा सोडून यावे" असें एक कलम आहे. व ते पेशव्यांकडून म्हणजे माधवराव हरी यांजकडून संमत होऊन "करार" झाले आहे. त्या कलमांवरून आंग्रे यांच्या पदरीं शास्त्रीपंडित म्हणून हे शैव घराणे होते अशी शोधपूर्वक माहिती त्रैमासिकांत दिली आहे. नवरत्नमालेचा कर्ता शैव मयूरेश यानेच "पंतप्रधानाख्यानम्" नांवाचे दुसरेहि एक काव्य केले होते ते भारत इतिहास संशोधन मंडळ द्वितीय संमेलन वृत्तांतांत प्रो. पोतदार यांनी छापले

आहे. आमच्या मतें प्रस्तुत मराठी पोवाडा त्याच मयूरेश शैवाने लिहिलेला असावा या कवीच्या एका विशिष्ट लकबीचा मंडळनैमासिकात उल्लेख केला आहे तो असा. "सकल्पित श्लोकसंख्या सपल्यावर आणखी श्लोक सुचावयाचे व तेहि त्यापुढेच जोडावयाचे असे नवरत्नमालेप्रमाणेंच पतप्रधानाख्यानम् यातहि घडले आहे" प्रस्तुत मराठी पोवाड्यातहि तसेंच घडलें आहे. उदाहरणार्थ, आठव्या चौकापर्यंत लढाईच वर्णन संपूर्ण झालले आहे किंबहुना इंग्रज आरमारी सेनापतीस कैद करून पकडून नेत्यापर्यंतहि हकीकत सांगितली आहे परंतु पुन्हा नवव्या व दहाव्या चौकात काही लढाईचें वर्णन जोडलेंच आहे या गोष्टीवरूनहि हा मराठी पोवाडा मयूरेश शैवानेच लिहिलेला असावा असे वाटतें

प्रस्तुत पोवाड्यात सेखोजी आंग्र्याने चौलाजवळ इंग्रज आरमाराचा जो पराभव केला त्याचें वर्णन आहे आवळसकर यानी दीड वर्षापूर्वी पोवाडा नक्कलून पाठविला तेव्हां त्यानी त्याला घेरियाच्या लढाईचा पोवाडा असें नांव दिले होतें परंतु परवापर्यंत जी जी इंग्रजी वा मराठी साधनें आंग्र्यासबंधी उपलब्ध होती त्यात कोठेहि या पोवाड्यात वर्णन केलेली माहिती आढळली नाही यामुळे पोवाड्यातील वर्णन केलेली लढाई कोणची याचा काहीच निर्णय करता येइना तेव्हा आवळसकरानी तर्किल्या प्रमाणे ती घेरियाचीच लढाई असावी असेच धरून चालून गोळाबेरीज कसे तरी अर्थ बसविण्याचा प्रयत्न चालविला पण मनाचें समाधान होईना अखेर पुस्तकाची प्रेस कॉपीहि तयार झाली तेव्हा हा पोवाडा शेवटीं याव याचा व "याचा अर्थ आज चांगलासा उकलत नसला तरी पुढें मागं याला ऐतिहासिक कागदाच प्रत्यतर सापडण्याचा संभव आहे" असे म्हणावयाचें असे मनाशी ठरविलें परंतु गेल्या ता ७ जून १९४३ रोजी काही निमित्ताने संग्रह केलेले 'रामदास–रामदासी' मासिकाचे अक चाळीत असता सहज एके ठिकाणी अक उघडला आणि योगायोग असा कीं, त्याच पानाचे सुरुवातीस प्रस्तुत पोवाड्यात वर्णन केलेल्या प्रसगाचा तिथीमित्तीसुद्धा काल मिळाला एवढेच नव्हे तर त्या ल्ढाईचें पोवाड्याशीं पूर्ण जुळत असें थोडे वर्णनहि आढळले। एखाद उदाहरण पुष्कळ दिवसपर्यंत सुटू नये, परंतु ते सोडविण्याची रीत एकादे दिवशीं अकस्मात सुचून उदाहरण

सुटावे म्हणजे जसा अनिर्वचनीय आनंद होतो तसाच आनद रामदास-रामदासी मासिकांतील ऐतिहासिक पत्राचे प्रस्तर मिळाल्याने झाला यात शका नाहीं.

आमच्या ऐतिहासिक पोवाड्याच्या पहिल्या खडाच्या प्रस्तावनेत आम्ही असे म्हटले होते. "कोंकणपट्टींतल्या पोवाड्यासबधी तर अजून नीट शोधच झालेला नाही कान्होजीराव आग्र्यापासून कृष्णराव धुळपापर्यंत मराठ्यांचें आरमार शाबूत होतें. त्या शे पाऊणशें वर्षांच्या काळात आग्र्यानी व धुळपानी पुष्कळ लढाया घेतल्या. 'धुळप याच इग्रज टोपी काढून करिती आदर' परतु धुळपापेक्षा आंग्र्यांनींच इग्रजावर काय किंवा परकी आमारावर काय असा वचक बसविला होता व इतक्या वेळा त्यांचा भराभव केला होता की, आग्र्याचें नाव निघतांच 'जशी चित्याला पाहून हरणी दबकत हरली हिंमत' अशी त्यांची स्थिती होऊन जात असे त्या आग्र्यांच्या पराक्रमाचे किती तरी पोवाडे कोकणपट्टींत झाले असतील व त्यांपैकीं अजूनहि पुष्कळ हयात असतील, पण ते मिळविण्याचा प्रयत्न झालेला नाही नागपूरच्या भोसल्याच्या पोवाड्यासबधी हेच म्हणता येईल धनाजी जाधवाचा एक पोवाडा कोंकणपट्टींत जिवत आहे, कोळयाच्या पठणात आहे अशी विश्वसनीय माहिती मिळते, परतु त्याचा कोणी उतरून घेऊन अजून सग्रह केला नाही ते असो, पण कोकणपट्टींतील आरमारविषयक पोवाडे मिळतील तर मराठी भाषेच्या दृष्टीने व इतिहासाच्या दृष्टीने एक नवच दालन उघडल्यासारखें होणार आहे "

या खडात आग्र्याचा एक तरी चागला विश्वसनीय पोवाडा, आज-पर्यंत अप्रसिद्ध असलेला असा छापण्यास मिळत आहे, ही फार आनदाची गोष्ट वाटते. धुळपाचा सरदार डामाजी नाईक यानें इग्रजाशीं घेतलेल्या आरमारी लढाईचाहि पोवाडा तसाच नवीन सापडला, तोहि महत्त्वाचा आहे यापूर्वी शितूत व दळवी यानी आपापल्या पुस्तकात धुळपाचे दोन तीन अपूर्ण व अशुद्ध पोवाडे सग्रहित केले होते; परतु सेखोजी आग्र्याचा व डामाजी नाइकाचा पोवाडा हे नि सशय अधिक चागले व ऐतिहासिक माहितींत भर घालणारे असे आहेत

हा पोवाडा कान्होजी आंग्र्याचा मुलगा सेखोजी आंग्रे याच्या पराक्रमाविषयी आहे. कान्होजी आंग्रे १७२९ साली वारला. त्यानंतर थोरला मुलगा सेखोजी सरखेल झाला. त्याला सरखेलीचीं वस्त्रें ७ ऑगस्ट १७२९ रोजीं छत्रपतींकडून मिळालीं. कान्होजी व बाळाजी विश्वनाथ यांचा स्नेह सख्या भावासारखा आमरणात होता. इतका कीं, बाजीराव व चिमाजी अप्पा हे कान्होजीला आपल्या पत्रात कान्होजी काका म्हणून संबोधित असत. तसेच कान्होजींचे मुलगेहि बाजीराव व चिमाजी अप्पा यास वडील बंधु समजून पत्रांत त्यास दाजी असे संबोधीत असत. सेखोजीच्या कारकीर्दीअखेर आंग्र्यानी पेशव्याशी अकृत्रिम निष्ठा राखिली. १७३३ ते १७३६ या तीन सालांत जजिऱ्याची जी मोहीम बाजीराव, चिमाजी अप्पानी केली ती, सुरुवातीस सेखोजीच्या साहाय्यामुळे उत्तम तऱ्हेने चालली. सेखोजीने आरमारी बाजू चांगली सांभाळली; तसेच राजकोट, थळ, रेवास इत्यादि ठाणीं जिंकली. दुर्दैवाने मोहिमेच्या पहिल्याच वर्षांत सेखोजी आंग्रे अकस्मात् २८ आगस्ट १७३३ रोजी (श्रावण बहुल ३० भौमवार) वारला आणि त्यानंतर संभाजी आंग्रे वगैरे लोक, आंग्र्यान्च्या घरातील कलहामुळे, अगोदरच पेशव्यानी सेखोजीची बाजू घेतलेली असल्यामुळे, बेदिल होते ते बहकले; किंबहुना आतून शत्रूसहि सामील झाले. ते स्वतत्र राजासारखेच स्वतःस मानू लागले खुद्द छत्रपतींसहि ते विचारीनात मग पेशव्यास कोठून विचारणार? तथापि पेशव्यानी मानाजीस लगामी लावून घेऊन मोहिमेचे कार्य पार पाडलें.

## ऐतिहासिक माहिती

ऐतिहासिक साधनाचा प्रस्तर पुरावा देण्याआधी मूळ पोवाड्यावरून निघणारी माहिती सकलित करून सागणें बरें ती अशी—इंग्रज फार मोठे आरमार घेऊन चौलाजवळ आला व नागरवाडा करून राहिला त्यामुळे आंग्र्याच्या व इतर व्यापारी गलबताची येजा थांबली. इंग्रज हा आंग्र्याशीं दोन हात करण्यासाठीच आला होता. नुकताच कान्होजी आंग्रे वारला होता. तेव्हा आता हीं संधी बरी आहे असें इंग्रजाना वाटले; पण कान्होजीचा मुलगा सेखोजी याने फार जवामर्दी करून इंग्रज आरमारावर आपले आरमार घालून त्याचा दोन चार प्रहराच्या

निकराच्या लढाईत पराभव केला. इग्रजाचे दोन चारशे आरमारी लोक मारले. जहाजें व त्यावरील कप्तानहि कैद करून नेला यावेळीं स्वत. जातीने सेखोजीने व त्याचे भाऊ मानाजी उदाजी व धोंडोजी यानी फार पराक्रम केला. लढाई चालू असताना किनाऱ्यावरील रेवदडेकर, उदेरीकर, व अष्टागरकर हे ते युद्ध पहात होते. तो समर-प्रसग पाहून त्या सर्वांस सेखोजी आग्र्याच्या पराक्रमाबद्दल धन्य वाटली

कान्होजी आग्र्याच्या कारकीर्दीत इग्रजाशीं तीन लढाया झाल्या. पहिली खादेरीवर, दुसरी विजयदुर्गावर, तिसरी हिराकोटावर आणि त्यानतर सेखोजीच्या कारकीर्दीत ही चौलाजवळ. या चारी लढायात इग्रजाचाच सपूर्ण पराभव झाला.

रामदास-रामदासी मासिक वर्ष २० अक २४० मध्ये चौल येथील अधिकारी याच्या दप्तरातील एक कागद ६६ व्या लेखाकात छापला आहे. त्यांत या चौलजवळील लढाईचे वर्णन पुढीलप्रमाणे आहे.

" सरखेल कान्होजी याच्या मागोन राजश्री सेखोजी आगरे राज्ये चालवीत असता इगरेज जलमार्गे जोरावर छेडाछेडी करीत असता त्याची ग्याली रेवदडे थेरवडे याचे बारेयावर नागरवाडा होती त्याजवर सेकोजी आगरे सेके ५२ कार्तिक वदे येकादसी सवत्सरी ( ता. २४-११-१७३० ) श्रता आरमार घेऊन जाऊन त्याचा मोकाबला करून युध्ये अनिवार अग्नीचा कल्होळ जाहला. ते समयी रेवदडे नागावे बदर किनारा लोक पहावयास गेले ते थक्ति होऊन राहिले। अशी गोस्टी टोपकराखेरीज मन्हास्टाम मध्ये जाहाल्या ऐसे आइकोन अथवा देखोन आल्या नाही ! त्यास ते ग्याली सिकस्ता करोन पागेस बाधोन कुलाबेयास आणिली येण्हे करून मुबेस वाहात खचोन राहिली हे सलाबत टोपकर व शामलास कलोन राहिली "

प्रस्तुत पोवाड्यात सेखोजीच्या पोषाक पेहरावाचें जें शब्दचित्र काढले आहे तें त्याची तत्कालीन तसबीर उपलब्ध नसल्यामुळे महत्त्वाचे वाटते त्यावरून सेखोजी हा शिवोपासक होता, कपाळीं भस्म चर्चित असे, चिरा म्हणजे मदील बाधून त्यावर लाल बाधीत असे असे दिसते, शैवमयूराच्या सस्कृत नवरत्नमालेत सेखोजीचें स्वरूपवर्णन आहे. परतु

तें संस्कृत धर्तीचे अतिशयोक्त म्हणून अविश्वसनीय वाटतें 'प्रवालाधरो' म्हणजे पोवळ्यासारखे लाल ओठ असलेला, किंवा 'स्वरूपेण मारः' म्हणजे मदनासारखा सुदर इत्यादि वर्णन विश्वसनीय वाटत नाही. प्रवालाधर हे विशेषण विडा खाण्यामुळे रंगलेल्या ओठाना लावलें तर कदाचित् शोभेल इतकेंच. पोवाड्यांत पुढील चरण आहे "जवळ शामसुदर। डोबा वलयधर (?) ॥ पाचसात कुदर। तमासा हा दाविला ॥" यातील शामसुदर हे कदाचित् सेखोजीच्या आवडत्या बसावयाच्या घोड्याचे नाव असेल. 'पाचसात कुदर' म्हणजे पाचसात हत्ती नवरत्नमालेत सेखोजीचे "कदा हस्तीयायी कदा वाजीयायी" असें वर्णन केलं आहे. हे त्याच्या स्वारीचे हत्ती घोडे असावेत

# सेखोजी आंग्र्याचा पोवाडा

## ३

आजि इंग्रजाचा गर्व । केला खर्व तो अखर्व ॥
पाहताहीं लोक सर्व । पर्व पर्वतास लाग × ॥
मोठे होतां घनचक्र । पाहूं निघे एकचक्र ॥
स्वर्गी कान्होजी व शक्र । मनांत उल्हासला ॥
इकडे रेवदंडेकर उंदेरी । व अष्टागर पृथ्वी आणि
हा सागर पाहाया विकास ...... (इ) पं मायें
साधारण कर्म (न) हे असाधारण । रणीं रोउनि
चारण । सेखोजी विलासला ॥

आंगे घालुनिया कास । नमुनि जगनिवास ।
भस्म लाउनि भाळास । बाळ काळसा ठसे ॥
चिरा बांधुनि शिरास । लाल लाउनि तयास ॥
हातीं घेउनि खर्गास । कोठे नसेसा नसे ॥

---

गर्व—ठेंगणा किंवा खुजा. गर्व खर्व करणें म्हणजे गर्वाचे घर खालीं करणे, नक्षा उतरणे. इंग्रजांना आपल्या आरमारी शक्तीचा फार गर्व चढला होता तो त्यांचा आरमारी युद्धांत पराभव करून उतरवून टाकिला. पाहताहीं—'पाहती हे' असा मूळ पाठ असावा. घनचक्र—घनचक्कर युद्ध. एकचक्र—? स्वर्गी कान्होजी—आदल्याच वर्षी कान्होजी स्वर्गवासी झाला होता. शक्र—इंद्र. रणीं रोउनि चारण—रणी रोउनि चरण असें तर नसेल ? २ किंवा कदाचित् रणीं होउनि वारण असेहि असेल. हत्ती ज्याप्रमाणे शत्रुसैन्याची दाणादाण उडवितो त्याप्रमाणे सेखोजीनें उडविली असा भावार्थ

बाळ काळसा—यमाच्या छोट्या आकृतीसारखा; ठसे—शोभे; चिरा—मंदिल, फेटा, रुमाल. लाल—माणकासारखें एक रत्न; राजे लोक पागोट्यावर हिऱ्याचा किंवा रत्नाचा अलंकार बांधतात तसा अलंकार; खर्गास—खड्गास. कोठें नसेसा नसे—कोठे नाही असा

लोटुनिया अमारास । हाके हाकित लोकास ।
फिरुनिया आसपास । आत बहारीसा धसे ॥
देव सारथी जयास । काय तयास आयास ।
केला इंग्रेजाचा नास । नेला काळाच्या भसे ॥ २

फार घेउनि जमाव । मोठा करुनि उठाव ।
घेत पुढ पुढ ठाव । बेटा पाहुनि घुरे ॥
बद जाला येव जाव । पडे लोकास दबाव ।
कोणा न सागत भाव । राव मनात झुरे ॥
आजि जाणुनिया दाव । भरुनि वीरासि आव ।
देउनि मिशास ताव । आपण मागे वधुरे ॥
बहुता दिसाचा हा डाव । घ्यावयाला घेत धाव ।
घेऊन ते ग्याली नाव । केले इंग्रेज पुरे ॥ ३

---

नाहीं म्हणजे त्याचा सचार सवत्र आहे, हाके—मुळात धाक असा शब्द असण्याचा सभव आहे बहिरी—ससाणा 'लोटुनिया' पासून 'धसे' येथपर्यंतचा भावाथ असा की, सेखोजा आपल आरमार घेऊन शत्रभोवती घिरट्या घालतो व एखादा वहिरी ससाणा ज्याप्रमाणे भक्ष्य नजरत येताच एकदम त्यावर झडप घालतो त्याप्रमाण सेखोजी शत्रूवर हल्ला चढवितो

धसे—घुसे धस या शब्दाचा अथ जोराची मुसडी असा हि आहे धस मारण म्हणजे हल्ला चढविणें आयास—श्रम, कष्ट

भस—याचा अथ लागत नाही महाराष्ट्र शब्दकोशात भस नपुसकलिंगी शब्दाचा अथ जेवण असा दिलेला आहे तो पाहता भिशी शब्द आठवतो भिशी-खाणावळ तो लक्षात घेऊन सेखोजीने इंग्रजाना मारून त्याची काळाच्या ताटात रवानगी केली असा अथ बसविता येईल बेटा—कान्होजाचा बेटा सेखोजी येवजाव—येजा दबाव—दरारा, भीति कोणा न सागत भाव—मनातला विचार बाहेर दशवित नाही राव—सेखोजीराव दाव—दावा, वैर दाव जाणून-वैर स्मरून आव भरणें—ईर्षा आणण वधुरें—' घेत धाव—धाव घालतो, तडाखा हाणता डाव घेणें—वैर उगवण ग्याली—

नाळ नाळे मागे नाळ । शर्त सोडींत जजाळ ।
जाणों आगिया वेताळ । असा बेटा भाडला ॥
चहूकडे आळमाळ । ज्वाळ माळा ये भभाळ ।
मोठा धरुनि. . साळ । साळ थेट ( बेट ? ) फार माडला ॥
लोक बोलत हा काळ । परि त्याला महाकाळ ।
कान्होजीचा शेख् बाळ । खराउनि तांडला ।
स्मरुनिया चद्रभाळ । घेउनिया करवाळ ।
पाहतां हे चौदा चाळ । इंगरेज खांडला ॥ ४

पहिली नाळाची ते मार । मागें जबू ( ब ? ) रे हजार ।
रेजगारी बेशुमार । त्या मागे कडाडली ।

---

गलबताचा एक प्रकार. नाळ—गलबताचा पुढचा भाग, तोंड. पण येथे नाळ म्हणजे तोफ हाच अर्थ जुळतो. नाळ नाळे मागें नाळ—तोफा-मागून तोफा सुरू लागल्या. जजाळ—हा जेजाल या अर्थी वापरला आहे. जेजाल—एक तन्हेची तोफ. आगिया वेताळ—आग्यावेताळ. म्हणजे एक भयकर पिशाच. त्याच्या नावानें मन्त्र म्हटला कीं, ज्यावर तो मन्त्र घातला तो जळू लागतो. बेटा—सेखोजी. आळमाळ—अळमाळ—अल्प. परतु तो अर्थ येथें जुळत नाही. महाकाळ—इंग्रज हा काळा-सारखा भयकर आहे अशी त्याची लोकांत यथार्थ ख्याती; परतु सेखोजी हा त्याला महाकाळच भेटला म्हणजे इग्रज शेराला सेखोजी सव्वाशेर भेटला. खराउनि तांडला—सरइन काढला. चंद्रभाळ—भालचद्र, शकर. करवाळ—तलवार. चाळ—पट्टी. 'चौदा चाळ कोकण ।' (मुआदि २६-२८ महाराष्ट्र शब्दकोश भाग ३) यावरून येथें चवदा चाळ म्हणजे सपूर्ण कोंकण प्रांत असा अर्थ दिसतो. "चौदा चाळ कोंकणाचा धनी तो आहे देवली त्याचा भक्तराज शिरोमणी सहस्रायु चिरजीव बाजीराव प्रधान तथा आपा व नाना यासी आज्ञा केली यैसीजे." ( ब्रह्मेंद्र-स्वामींचे चिमाजीअप्पास पत्र पेशवे दप्तर भाग ३ ) पाहता हे—पाह-ताहे—पाहत आहे. जंबुरा—एक प्रकारची तोफ. रेजगारी—रेजगि रेजगी—Fragments of stones or small stones

तेथे धरुनि करार । मोठा केलासे सहार ।
शभरेक लोक ठार । धाडसी धडाडली ।
तिकडे जरार जरार । इकडे सर्दार सर्दार ।
अडावितां आर्मार । भवानि भडाडली ॥
चढुनियां येलगार । झडे आंतही हलार ।
भगुनि इंग्रेज मार । ( हत्या करुनियां फार !) झागड गडाडली ॥ ५

धीर धरित धीरास । वार मारित... ।
शिरास शिरीं सिंधु दाटला ॥
किती भावले नीरास । किति लागले तीरास ।
किति धाडले बहुताची मीरास । जसा घाणा घाटला ।
शेखीं लागला करास । धरुनि आणिला घरास ॥
चौऱ्यासीही बदरास । धाक मोठा वाटला ॥

---

बेशुमार—बेसुमार. धाडसी धडाडली— ? जरार—हा जराल या शब्दाचा अपभ्रंश दिसतो. जराल-जनराल जराल हा शब्द पोर्तुगीज आहे. पेशवे दप्तराच्या तिसऱ्या व तेहतिसाव्या खंडातून हा शब्द आलेला आहे. भावार्थ, तिकडल्या जनरलांशी इकडचे सरदार भिडले. पर्शियन भाषेतहि जरार शब्द आहे त्याचा अर्थ 'शूर'. ( मुधोळकर घोरपडे घराण्याचा इतिहास. फारशी शब्दकोश. ) भवानि—तोफेचे नाव येलगार—एलगार-हल्ला. झांगड—किती एक वाद्यांचा मतत वाजल्याचा शब्द ( शास्त्रीकोश ), एक प्रकारचे वाद्य, झगट. "झागड नौबत व जती धडाघड" ऐ. पो. ११८ महाराष्ट्र शब्दकोश शिरास शिरीं सिंधु द.ट. —लढाईत इतकी शिरे तुटलीं कीं, त्याच्या दाटीनें समुद्राचा पृष्ठभाग झाकून गेला. किती मावले नीरास—किता एक लोक समुद्रांत बुडाले. नीर—पाणी. मीरास— ? घाणा घाटणें—पिळून टाकणें, नि सत्त्व करणें. भावार्थ, सर्व इंग्रजांना रगडून काढले शेखीं—शेवटीं, अखेरीस. लागला करास—हातीं सांपडला. चौऱ्याशीं बंदरें—हिंदुस्थानांतील सर्व बदरे, लक्षणेने समुद्र किनारा. चिमाजी

करण ऐसे शकरास । भयद भयकरास ॥
शिखोजीच्या किंकरास । किंकर दुमाटला ॥ ६

काचे घेऊनि अवर । नाहि बाधिली कबर ।
नाही व रत्नराडवर (?) । शेखोजीने भाविला ॥
खाल केवळ वर । वरते मोकळ अबर ।
चित्ती एक चिदबर । भावेचि सभाविला ॥
जवळ शामह सुदर । डोबा वलयधर (?)
पाच सात कुदर । तमासा हा दाविला ।

---

अप्पाने वसई घेतल्यानतर, शाहू महाराजास त्यानी ज पत्र पाठविल त्यात हा शब्द आलेला आहे "फिरगियाचा जागा वसई हस्तगत जाहलियामुळ समुद्रात सर्वांस दहशत प्राप्त होऊन चौऱ्याशी-बदरातरी महाराजाची सलाबत गालीब जाली" (वसईची मोहीम पृष्ट २०६) किंकर दुमाटला—? अबर—वस्त्र काचे—खाकेत शामह सुदर—हत्तीचें नाव असावे डोबा—? वलयधर—? कुदर—कुजर, हत्ती तमासा—तमाशा—पराक्रम मदर—मादार कलदर—येथे पराक्रम असा अथ दिसतो एरव्ही कोशातून कलदर–बधनातीत, साधु किंवा बेपर्वा मनुष्य असा अथ दिलेला आहे नसट–नश्रुड किंवा नस्रड— A term for a feeble puny yet forward fellow (मोल्स) नस्रड हा शब्द तुच्छतादशक किंवा निंदाव्यजक म्हणून शिद्दी किंवा इग्रज किंवा फिरगे यांसाठी वापरलेला जुन्या ऐतिहासिक कागदपत्रातून सापडतो शिद्द्याना शामल, निशेडा, कृष्णमुख इत्यादी पर्याय शब्द रूढ होते तसा नस्रड किंवा नश्रुड हा शब्द प्रस्तुत पोवाड्यात इग्रजासाठी वापरलेला आहे खुद्द सेखोजी आंग्र्याच एक पत्र पेशवे दप्तर भाग ३३ मध्ये ६५ नबराला छापलं आहे त्यांत इग्रजास नश्रुड म्हटल आहे "परतु हे गोष्टी तत्वता जाहाली तरी मोठासा शह आहे श्रीचे सुदर्शन सव्य अपसव्ये फिरत आहे मुबैकरास हें बुद्धी जाहाली असेल तरी त्याचेही अगाध आहे ऐसे नाही सामेकरून विचार जाहला तरा उत्तमच

राव सुमेरु मंदर । शोभे जसा पुरंदर ॥
करुनिया कल्दर । नस्ट बिच्छावला ॥ ७

मानाजी तो राजपूत । दुजा उदाजी सपूत ।
धाडोजी तो भांबडभूत । जातीचे हे आगरे ॥
गुराबा लडावणार लडुनि । अडावणार अडुनि ।
झगडणार भगिले ते भागरे ॥
किती गोळ्याहि उडेत । किती सागरी बुडेत ।
किती घार्यी आतुडेत । फुललेसे पागरे ॥
गायल्या ग्यालीचा गीत । पालवाला फार भीत
( तो फजित मेला )
उरला खटारा ओढीत । दूर बेटा नागरे ॥ ८

---

जाहाले प्रसगच प्राप्त जाहाला तरी नथुडास नतीजा धनियाचे पुण्यप्रतापे देतच आहो " बिछावला—जमीनदोस्त केला, खलास केला, चीत केला, मूळशब्द बिछावणी त्याचा अर्थ जमीनीवर पसरण, आथरण मानाजी—कान्होजी आग्रयाच्या दुसऱ्या स्त्रीचा मुलगा लक्ष्मीबाइचा म्हणजे सेखोजीचा सावत्र भाऊ राजपूत—राजपुत्र उदाजी—? धोंडोजी—कान्होजीची तिसरी स्त्री गहिनाबाइ तिचा मुलगा सपूत—सुपुत्र. भांबडभूत—A term for a slovenly, disorderly, and idiotic looking person (Molesworth) भांबभूत, भांबरभूत, भांबर भुसका–वेडसर, मूख, पिसाट, भ्रमिष्ट ( मनुष्य ) "सभेमध्ये साभिमाने । भांबडभूत दशानन । बैसलाहे ।" मध्व ३७ ( महाराष्ट्र शब्दकोश, विभाग पाचवा ) पिशाचासारखा बेभान होऊन लढणारा भागरे— ? उडेत बुडेत—उडाले, बुडाले फुललेसे पागरे—पागाऱ्याचा वृक्ष फुलला म्हणजे त्याची तांबडी लाल फुले शोभतात त्याप्रमाणे हे वीर आपल्या रक्त वाहाणाऱ्या जखमांमुळे शोभत होते पालवाला—पाल–एक तऱ्हेच लढाऊ जहाज त्या पालाचा इंग्रज कप्तान खटारा—एक तऱ्हेचें लढाईत उपयोगात आणले जाणार गलबत, यातून सैन्य किंवा माल नेत असावेत हा शब्द जजिरा मोहीमतील पत्रातून अनेक

... ... ... ... ... ...ळजे गर्जना।
मदमारांची घ... ... ...घन जाळहि ॥
गोळांची गरनाळांची । गोळियांची झडी वर्षे ।
पडत पिंपरेसे वीर । विकराळही ॥
वायूपम शेखोजी । हा फिरत चौंतर्फा तेथे ।
जालासे नीललोहित । सागर विशाळही ॥
जगा तो उदंड होती । परि तासाची सुलतानी ।
हे दोनसे मेले वीर । उरले घायाळही ॥ ९

---

वेळेला आलेला आहे. उदाहरणार्थ पहा: १८-६-१७३३ चें सेखोजी आंग्र्याचे बाजीरावास पत्र " तसेच दर्यावर्दीचा विचार उकलून लिहिला अथवा सांगितला तथापि चित्ती येणे नाहीं. कदाचित कळावयास अगाध काय म्हणून आपण म्हणतील तरी या मृग आर्द्राचे नक्षत्रांमध्ये समुद्राचे तारुण्यबल. नौका मार्ग कैंचा चालेल! हे पर्याय अनुभवावांचून प्रत्ययास येणेच नाही! आपले वचनावरून गलबते रवाना करावी, खटारियांची आशा न धरावी हे उचित; परंतु गलबते जाया जाली याचे सुरा दुःख नाही; दोन तीनशे माणूस विनाकार्य आपले आपले हातीं हातपाय बांधोन बुडवावे आणि स्वामिकार्यही नाही. अन्यथा खटारियांचा हिसाब काय होता! चार खटारे जाया होते तरी दाहा नवे केले जाते. अरमारी माणून गेल्यास तसे मिळतां सायास." (पेशवे दप्तर भाग ३३ पत्र नंबर २९१) गरनाळा—एक तऱ्हेची तोफ. कुलपी गोळ्यांची तोफ: हिचा आकार लाकडी उखळीसारखा असतो (महाराष्ट्र शब्द कोश). झडी—पर्जन्य. पडत पिंपरें—मोठ्या पावसाने ज्याप्रमाणे वड पिंपळादिकांची फळे पटापट गळून पडतात त्याप्रमाणे बंदुकांच्या वा तोफांच्या माराने वीर लोक पटापट मरू लागले. नीललोहित—गर्द तांबडा. लाल भडक. (१) सर्व समुद्र रक्ताने लालभडक झाला. (२) नील-लोहित याचा अर्थ शंकर असाही आहे. भावार्थ-समुद्रांत पडलेल्या शत्रूंच्या मुंडक्यांमुळे तो समुद्र नररुंड माळधर शंकरासारखा दिसू लागला. जंगा—जंग पाहिजे, जग—लढाई. सुलतानी—राज्यक्रांतीसारखा संहार.

पाच सात वर्षे श्री सरखेला पाहुनि हा मुवयीचा ॥
ससतक जेथे तेथे मोडिला ॥

---

भावार्थ, आजपर्यंत लढाया उदंड झाल्या परतु इतक्या थोड्या वेळात एवढा सहार झालेली हीच लढाई　　ससमक—शत्रू!　पहिले तो सांदेरिसी इत्यादी—पोवाड्यात म्हटल्याप्रमाणे चारी लढायाचे उल्लेख बरोबर आहेत परतु अनुक्रम थोडा चुकला आहे, कारण विजयदुर्गावरील १७१६ सालचा इग्रजाचा हल्ला पहिला असून खादेरीवरील हल्ला नतरचा आहे. "त्यानतर इ स १७१६ मध्ये इग्रजानी कान्होजीच्या घेरिया किल्यावर स्वारी केली　पण त्याने इग्रजाचा हल्ला निकरान परत विला　या हल्ल्यात इग्रजानी ३० ते ४० तोफा असलेली मोठी लढाऊ जहाज ‿ ।न्यांविरुद्ध घेरियास नेली होती　परतु इग्रजाचा पराजय झाला व या सर्व लढाऊ जहाजाना निराश होऊन मुबईस परत यावं लागले　याप्रमाण समुद्रावरील अजिंक्य सत्ताधारी म्हणून कान्होजी चमकले" (कुलाबकर आग्रे सरखेल पृ ७२)

सन १७१८ ‧ ध्यें इग्रजानी खादेरिवर दुसऱ्यादा हल्ला केला　त्यातहि कान्होजीने इग्रजाचा पराभव केला　त्याची नुकताच सन १९४१ साली प्रसिद्ध झालेल्या डॉ सुरेन्द्रनाथ सेन याच्या 'Early Careeı of Kanhojı Angrıa and Other papers' या पुस्तकात अगदी नवीन व विश्वसनीय अशी हकिकत समकालीन इंग्लिश कागदपत्रावरून दिली आहे　ती अशी—

१७१३ साली इग्रजानी कान्होजीशीं तह करून घेतला　पण पुन्हा लवकरच भाडण सुरू झाले　आणि त खरोखर कायमचे थावणे शक्यच नव्हते कारण समुद्रावरील मुख्य सत्ता कोणाची हाच वादाचा प्रश्न होता　कान्होजीचे म्हणणे असे होते की, मुबईकर इग्रजाच्या ताब्या तील देशी गलबतानीं इग्रजाप्रमाणे माझेही दस्तक घेतलेच पाहिजे. तस नसेल　ते गलबत मी जरूर पागेस लाऊन नेणार! हे कान्होजीचे वर्तन १७१३ च्या तहाला सोडून आहे असें इग्रज म्हणत　तर उलट कान्होजी म्हणे की, त्या तहात अशी काही एक अट नाही. कान्होजीने इग्रजी जहाज

पहिले तो खांदेरीसी । दुसऱ्याने विजयीदुर्गी ।
तिसऱ्याने हिराकोटी । फोडुनियां तोडिला ॥

भराभर जिंकण्याचा सपाटा चालविला. त्याने सक्सेस, रॉबर्ट ही गलबतें पकडली. नंतर ऑटर नांवाचेही एक जहाज पकडलें. शेवटी मुंबईस चार्लस बून नांवाचा नवा गव्हर्नर नेमून आलेला होता त्याने खांदेरी बेटावर स्वारी करण्याचे ठरविले. खादेरी बेट प्रथम सन १६७९ साली घेऊन शिवाजीने त्यावर किल्ला बांधिला. पुढे सन १७१३ साली शाहूमहाराजांनी तो कान्होजीच्या स्वाधीन केला. खांदेरी बेट मुंबईपासून अगदी नजीक असल्यामुळे मराठ्यांनी मुद्दामच त्यावर किल्ला वसविला. आणि ते ओळखूनच किल्ला बांधीत असतांच मुंबईकर इंग्रजांनी त्यावर तोफांचा भडिमार करून पाहिला होता. पण मराठ्यांनी दाद दिली नाही. आणि आता तर तो किल्ला कान्होजीसारख्या इंग्रजांच्या हाडवैऱ्याच्या ताब्यांत गेलेला. म्हणून तो जिंकून मुंबई निर्वेध करावी असे इंग्रजांनी ठरविले.

या वेळीं खासा गव्हर्नर सेनापति होऊन आला. त्याने बरोबर प्रचंड आरमार घेतले होते. त्यांत ॲडिसन, डार्टमाऊथ, व्हिक्टोरिया, रिव्हेंज आणि डिफायन्स अशा पांच गुराबा, 'फेम्' नावाची कच्छी, शिवाय दोन बॉम्बकच्छा आणि खेरीज ४८ गलबतें असा सरंजाम होता. ३ नोव्हेंबर १७१८ रोजीं त्या आरमाराने खांदेरीवर मार धरिला. दुपारी दोन वाजल्यानंतर कान्होजी आपले आरमार घेऊन बाहेर पडला. इंग्रजांचे कांहीं चालेना. शेवटी त्यांनी खांदेरी बेटाच्या पूर्वकिनाऱ्यावर उतरण्याचा धाडसी प्रयत्न करून पाहिला. ज्या वेळीं पूर्वेकडे उतरण्याची हल करावयाची त्याच वेळीं कॅप्टन माउत्सच्या

चौथ्याने चेउलाच्या चौबारां । शेखोजीने पाडाव केला ।
आधा अधमेला सोडिला ॥

---

इग्रजाचा तिसरा पराभव हिराकोटचा. तो १७२२ साली झाला. त्याची हकीकत सुप्रसिद्धच आहे. त्या वेळी इग्रज, पोर्तुगीज एक होऊन त्यांनी हल्ला केला. त्याबाबत बरीच तपशीलवार माहिती डॉ. सेन याच्या पुस्तकांत, पारसनिसाच्या इतिहाससग्रहांत व 'कुलाबकर आंग्रे सरखेल' या ग्रथांत मिळते. परतु त्यांत दिलेली माहिती मुख्यतः इग्रजी कागदपत्रातून घेतलेली आहे. उलट आम्ही पुढे उतारा देत आहो त्यांतील माहिती पेशवाईंतच *आग्र्याच्या पदरच्या कोणा माहितगार माणसाने लिहून* ठेवली आहे. ती फार बारीक व विश्वसनीय असा नवा तपशील देते.

"त्याजवर अन्तोन कडदीन मोकाम रेवदंडे व सरखेल याचा दावा अर्तीसये असतां, मोजे खानु सागरगडानजिक आहे, ते गांवी सरखेल येही मोकासबाब पाहुणे कुमकी लोक येऊन गाव आबाद केला होता खासगत समजोन अतोन कडदिन रात्रसमई खासा लोक घेऊन गाव मारावयास आला. ते बातमी सरखेलास अगोदर रेवदंडाहून पावली. लोक पाठवून दबा दिधला होता (फिरगी) गाव मारावयास आला. त्याचा याचा मोकाबला जाहाला आगोट पाउसाला जाणोन त्याचे बदुकी त्यास प्रतिकूल होऊन फिरगी ते ठिकाणाहून मारित मारित बाग सराई सोमेश्वराचे खिंडीत क्षिती केली ! सिराचे पार बाधिले आहेत ते अद्याप वर आहेत!! राहिले लोक पलत पलत राजकोटाचे आश्रये गेले (व) बचयाव होत नाही; तेव्हां मौगलाने परकोटा दरवाजे उघडोन आत घेतले. तेव्हा कुलाब्याची श्वारी हुजूर आली.

त्याजवर शके ४३ सन इसने इसरीन सवत्सरी अतोन कडदिन पूर्तकालास जाऊन तेथून राजे याची वोडदी गोवेयास आज्ञा आणोन खासा विजुरले व आरमार व तोफखाना व चालता कोट व सिपाई लोक घेऊन प्रथम रेवदडा उतरोन तेथून आरमार जलमार्गे वरसोली किनारा नेले लोक पायमार्गे आले. त्यामध्ये इगरेज होता त्याण्हे खुदस्ती अलीबागास येऊन हिराकोटास सिड्या लाविल्या. इतकीयात

कान्होजी·································· ॥ १०

ते प्रसगी रा पिलाजी जाधवराव व राजश्री मानाजी बावा येही इगरेजाची धिती केली ! हे खबर महाराजा छत्रपतीस जाहीर झाली तेसमई राजश्री बाजीराव पेशवे व रा खडोजी दाभाडे सेनापती व माणकोजी बावसे वगैरा लस्कर फौज कुमकेस पाठविली. ते येऊन तो खाडाले तल देऊन राहिले. फिरगी येण्हे वरसवलीस तल देऊन भवतां लकडकोट लाऊन राहिला होता. त्याचे पूर्व दिसेस घाटावरील लोक त्यासवे वेढा देऊन सुरगात माती खणोन पुढील जमीन कावीज करीत चालले. फिरगी लोकास कोंडवाड जाहाली. येजीज जाहाला. त्याजवर रावसाहेव व सरखेल येही समत केले कीं रात्रीं जाऊन छापा घालोन फिरगी मारावा. त्याजवर जाधवराव येही उत्तर केले कीं, 'रात्र समई त्याचे पाचसें पडतील तर तुमचे सेदोनसे पडतील या कारणास्तव शास्त्रार्थे आर्धी सिस्टाई करावी. मान्ये नाही तेव्हां युध्ये प्रसग करावा.' हे गोस्ट सर्वांचे विचारास येऊन त्यास सांगो (न)पाठविले कीं तुम्ही भले माणुस मातवर आम्हा नजिक पाठवावे. तुमचा मतलब काये आहे तो दुतर्फा मनास आणिला जाईल. त्याजवर तेही अतोन कडदिन वगैरा भले माणस लष्करात पाठविले. सुल्याचा विचार होऊन उठोन जावे असे मान्ये केले. त्याजवर विजुरेल कुलावा गोलेयाने भरोन काढीन म्हणौन अभिमाने करून सर्व साहित्यानसी आला होता त्यास अपेश जाणून विष भक्षून मेला ! फिरगी लस्कर-समेत गोवेयास गेला. त्याजवर पतप्रधान व सरखेल राजदर्शनास गेले."

( चौल अधिकारी दप्तर, ले. ६६. )

# सेखोजी आंग्र्याचा पोवाडा

## ४

हाही पोवाडा अलीबागचे श्रीयुत आवळसकर याजकडून आम्हास मिळाला तोहि अपूणच आहे त्यात वर्णन केलेल्या दाभोळच्या आरमारी लढाईला समकालीन लेखाच प्रत्यतर आम्हाला तूर्त मिळालेल नाही, तथापि पुढेमागे मिळण्याचा नक्की सभव वाटतो या पोवाड्याचा कवि पूर्वीच्या पोवाड्याचाच कवि शैवमयूरेश हा असला पाहिजे ह दोन्हा पोवाडे ताडून पाहिले असता तेव्हाच कळेल किंबहुना असेही वाटत की, हा त्रुटित पोवाडा म्हणजे मागच्या पोवाड्यातील काही भाग असावा पण तस म्हणण्यास तत नका खेरीज दुसर साधन नसल्यामुळे तो स्वतन्त्र म्हणूनच छापला आहे

सेखोजी सहोदरात आला।
या ( विजयी ) दुगा गेला। मग विजयी।
जाले बधु समजावुनि॥ धृ.॥

दोघे मग गुराब भारे निघता।
इगरेज आला साला। ( आला ! ) परि।
दस्त जाला विलयाला पाउनि।
स्वर्गा श्री ( कान्ह ) गेल्या जजिरे दुश्चित्त होते सुचित्त
ते लोक केले देउनि बुझाउनि।
सवाइ सरखेल गाजी किताब हा तुजला।
माज प्रताप हा बदर बदर जातच बजाउनी॥ १

घेउनि गुराब भार विजयदुर्गाचा मुवार।
टाकुनिया जो विस्तार दोभोळेचा पावला॥

---

सहोदरातें आला—सख्खा भाऊ सभाजी आंग्रे याजकडे गेला समजावुनि—त्या दोघात कलह होता तो मिटला, परस्पराची समजूत झाली गुराब भारे—गुराबाचा भार म्हणजे समुदाय, म्हणजे आरमार घेऊन दस्त करणें—पकडण दुश्चित्त सुचित्त इ —कान्होजी आंग्रे मेल्या नतर जे कोणी आंग्र्याचे सरदार किंवा गडकरी दुदील किंवा दुश्चित झाले

तेथे वेढा जोरावार इंग्रेज बेशुमार ।
पाहिली जाणुनि शिकार सरखेल उठावला ॥
देहीकडे मारामारी देहीकडे धुवाधार ।
दोघा बधूंसा करार एकमेकां फावला ॥
वार वारामागे वार होत हजारो हजार ।
अडाउनि आर्मार नसुड बिछावला ॥ २

मोठा करुनि करार बाप शेखोजी उदार ।
दुजा संभाजी झुजार मिळूनि उठावले ॥
पहली बोहली ( णीं ! ) उभार याचा करुनि निर्धार ।
आंगे ( सांग ) होउनि सर्दार मारीतच धावले ॥
जशी प... ... .. ... ... ...॥



# टिपूवरील स्वारीचा पोवाडा

## ऐतिहासिक माहिती

ही स्वारी १७९० नतर इग्रज मराठे व निजाम या त्रिवर्गांनी टिपूवर केली.

मगलोरच्या तहामुळे टिपूकडून आधीं आगळीक होईपर्यंत इग्रजांना त्याशी बिघाड करता येत नव्हता. पण १७८९ च्या अखेरीस टिपूने इग्रजाचा दोस्त जो त्रावणकोरचा किरिटी रामराजा त्यावर चाल केली. तेव्हा इग्रजाचा मार्ग खुला झाला. यापूर्वी १७८६-१७८७साली मराठे मोगलांनी टिपूवर स्वारी केली होती पण ती यशस्वी झाली नव्हती. अर्थात् इग्रजांच्या बरोबर मराठे व मोगल यांची दरबारे पुन. टिपूवर मोहीम नेण्यास उत्सुक होती. शेवटी इग्रज मराठे व मोगल याच्यांत आपसात जुटीचा एक तह ठरला. त्यांतील कलमे अशी होती. ( १ ) पावसाळ्यापूर्वी व त्यानंतर मराठे व मोगल यांनी टिपूच्या उत्तरसरहद्दीवर प्रत्येकीं २५००० फौजेनिशी स्वारी करून साधेल तितका मुलूख ताब्यात घ्यावा. ( २ ) पावसाळ्यानतरही मराठेमोगलानी मोहिमेचे काम नेटाने चालवावे. ( ३ ) कॉर्नवालीस मागेल त्या वेळी एक महिन्याच्या मुदतींत मराठे—मोगलानीं प्रत्येकी दहा हजार स्वार इग्रजाच्या कुमकेस पाठवावे. ( ४ ) टिपूचा जितका मुलूख काबीज होईल तितका तिघानीं सारखा वाटून घ्यावा. वरील तहावर पेशव्यांतर्फे १ जून १७९० रोजी व निजामातर्फे ४ जुलै १७९० रोजीं सह्या झाल्या

तहाप्रमाणे प्रथम मराठ्यातर्फे कामगिरी झाली ती अशी—मराठ्याचे सेनापति परशुरामभाऊ पटवर्धन व हरिपत फडके हे होते. परशुरामपत ऑगस्टातच कूच करून पुढे गेला, व थोडयाच दिवसात त्याने टिपूच्या मुलुखात हगामा सुरू करून धारवाडच्या किल्ल्याला वेढा बसविला तसेच आसपासची हुबळी, जाडरहुबळी, दोडवाड, मिश्रीकोट, जडेअनवटी, लक्ष्मेश्वर, सोंधे गर्जेद्रगड, हारपनहळ्ळी, उचगीदुर्ग इत्यादि ठाणीं व किल्ले काबीज केले. हा सर्व प्रकार ऑक्टोबर१७९०पासून फेब्रुवारी१७९१ पर्यंत घडला धारवाडास वेढा बसला होता तो सुमारें १४ सप्टेंबरपासून पक्का झाला. भाऊनें शत्रूची दाणावैरण बद करून व तोफा चालवून किल्लेकऱ्यास सतावले.

१३ डिसेंबर १७९० रोजीं मराठी फौजेने धारवाडच्या पेठेवर हल्ला करून ती जिंकली व मग खुद्द किल्ल्याच्या तटास पक्की मोर्चेबंदी केली. शेवटीं ता. ५ एप्रिल १७९१ रोजी किल्लेदार बदरीजमालखान शरण आला. सारांश, तुंगभद्रेअलीकडील टिपूचा सर्व मुलूख काबीज झाला. दरम्यान तिकडे इंग्रज व हरिपंतानीं पट्टणास वेढा घातला होता. अिंग्रजांचीं पत्रावर पत्रे येऊं लागल्यामुळे परशुरामभाऊ श्रीरंगपट्टणाकडे अिंग्रजांस सामील होण्याकरिता त्वरेने निघाला.

इंग्रजांची कामगिरी अशी. टिपूवरील मोहीम ठरल्यावर १७९० च्या सप्टेंबरांत इंग्रजांनीं कोइमतूरकडे टिपूस चांगलाच ताण दिला.

नंतर कॉर्नवालीसने बंगलोरचा किल्ला मोठ्या धाडसाने जिंकला. जो किल्ला घेण्यास वर्षसहा महिने सहज लागतील असा मराठे-मोगलाचा अदमास होता पण तो अवघ्या १७ दिवसांत इंग्रजांनीं जिंकला ! किल्ल्याला दिल्ली दरवाजा व म्हैसूर दरवाजा अशा दोन वेशी असून, उत्तरेकडच्या म्हणजे दिल्ली दरवाजाच्या वेशीच्या बाजूस पेठ म्हणजे बंगलोर शहर वसलेलें होतें. पेठेलाहि अर्थात् बळकट तट होता; शिवाय भोवतीं खंदक व निवडुंगाची दाट लागण होती. इंग्रजांनी हल्ला करून पेठ जिंकली व मग ते किल्ल्यास लागले. २१ तारखेस इंग्रजांनी किल्ल्याच्या बुरुजास खिंडार पाडले पण ते लहान होतें म्हणून मोठें करण्यासाठीं गोळे टाकण्याकरितां त्यांनी मोर्चा उभा केला. तेव्हां टिपूनेहि तटावर तोफा आणल्या. टिपूने इंग्रज सैन्याभोंवतालचा मुलूख जाळूनपोळून वेचिराख केला होता. टिपूचे वेदडे इंग्रजी लष्कराचे रात्रीं बेरात्रीं लचके तोडीत असत. शिवाय या वेळेपर्यंत इंग्रजांस मराठे-मोगलांची

शत्रून घेतल्यावर आता तेथे राहण्यात अर्थ नाही असे पाहून तो श्रीरंगपट्टणास गेला

बंगलोर घेतल्यानंतर कॉर्नवालीस श्रीरंगपट्टणावर चालून जाऊ लागला पण टिपून त्यास अत्यंत त्रास दिला इंग्रजांच्या मागोमागून दहापंधरा कोसांपर्यंतचा मुलूख त्यानें जाळून बेचिराख केला आणि त्या टापूतील रयत व गुरेंढोरें दूरच्या प्रांतात घालवून दिलीं ! त्यानें धान्याचा व वैरणीचा नाश करून टाकला इतकेच नाहीं, तर वैरणीऐवजीं झाडपाल्याचा शत्रूस उपयोग होईल म्हणून झाडेसुद्धा तोडलीं !! रात्रंदिवस त्यानें इंग्रजांच्या लष्करा भोवतीं घिरट्या घालीत बसावें, वारंवार हल्ला करण्याचा रोख दाखवावा, तोफा माराव्या, बाण सोडावे, दाणावैरण मिळविण्यासाठीं एखादी टोळी बाहेर पडलीच तर तिचा फन्ना पाडावा, ही त्याची मेहनत एकसारखी चालू होती व तिचा परिणाम इंग्रजांच्या लष्करास फारच अपायकारक झाला तथापि इतक्याही संकटांस न जुमानता नेटानें चाल करून इंग्रज श्रीरंगपट्टणाजवळ आले, तेव्हां टिपूने ता १५ मे रोजीं अरिकेरा येथे त्याशी फारच निकराची लढाई केली, पण त्या लढाईंत त्याचा पराजय झाला मग तो श्रीरंगपट्टणास जाऊन आपल्या राजधानीचें संरक्षण करण्याच्या उद्योगास लागला ता १९ मे रोजीं कॉर्नवालीस श्रीरंगपट्टणाच्या पश्चिमेस कनिंयामवाडी येथे जाऊन उतरला

पण सैन्याची विलक्षण उपासमार सुरू झाली 'पांच रुपयास शेर तांदूळ, नाचण्याचें पीठ ३ रु स १ शेर, वैरण लाकूड अगदीं नाहीं तोफखान्याचे बैल झाडून मेले गोटाबाहेर माणूस व गुरें गेलीं असतां त्यास तोडावे लुटावे याप्रमाणे टिपूकडील वैदानी केले तेव्हां धारणीचा मजकूर लिहावयाचा काय ?' शिपाई व सोजीर यास दोन दोन दिवस फाके पडावे तेव्हां एखाद्या वेळीं अन्नाचा घास दृष्टीस पडावा ! स्वाराच्या घोड्यास तृणाचें दर्शन होत नसल्यामुळें घोडदळाचें आपोआप पायदळ बनत चाललें होतें ! अशा स्थितींत टिपूची खोडकी जिरविण्याची गोष्ट तर दूरच राहू द्या, पण आपण जिवंत येथून परत कसे जातों अशी कॉर्नवालीस यास चिंता पडली व तो मोठ्या कष्टानें आपलें सैन्य घेऊन बंगरूळाकडे परत निघाला त्यानें आपल्या तोफा फोडून टाकल्या, दारुगोळ्याचा

नाश केला व सर्व अवजड सामान मोडूनतोडून टाकलें. कॉर्नवालीसन २६ मे १७९१रोजीं बंगलोरकडे कूच केले. पण त्याच दिवशीं परशुरामभाऊ व हरिपंत यांचीं लष्करें निरनिराळ्या मार्गांनीं येऊन मेलकोट्यास एकत्र झाली होतीं

हरिपंत फडके पुण्याहून परशुराभाऊच्या मागून निघाला होता प्रथम त्याने पानगलानजीक निजामाची भेट घेतली. त्या भेटींत टिपूविरुद्ध इंग्रजांना प्रत्यक्ष लढाईत मदत केली, तरी टिपूला सपशेल बुडवावयाचा नाहीं हें धोरण निश्चित करण्यात आले त्यानंतर पुढे मेलकोट्यानजीक ते पटवर्धनास मिळाले मग मराठ्यांनी इंग्रजांस दाणावैरण अन्नसामुग्री भरपूर पुरीवली व त्यांचा पुनर्जन्म केला ! यानंतर पावसाळ्यासाठीं तीं तीनहि सैन्ये अलग अलग छावण्या करून राहिलीं दसरा झाल्यावर परशुरामभाऊने बिदनूर प्रांतातील टिपूचीं ठाणीं घेतली इकडे कार्नवालीस हरिपंत व निजाम यानी श्रीरंगपट्टणावर चाल केली त्रिवर्गांचे मिळून प्रत्यक्ष लढाऊ सैन्य ६०००० पर्यंत होतें.

" श्रीरंगपट्टणचा किल्ला कावेरी नदीच्या दोन फाट्यांनीं बनलेला एका खडकाळ बेटावर बांधलेला होता त्याच्या उत्तरेस टिपूच्या सैन्याचा तळ पडला असून तळाचे तोंड आग्नेयीस होत. दोस्तांची सैन्ये व टिपूचे सैन्य यामध्ये लुक्णी नदी वहात होती शिवाय एका जबरदस्त काटेरी कुंपणाचा आश्रय आतील सैन्यास होता. हे कुंपण बाबूची दाट बेटे व निवडुंगाची लागवड यामुळे चांगलेच अभेद्य बनले होते. निदान साध्या घोडेस्वाराचा तरी त्यातून शिरकाव होणे अशक्य होत अशा रीतीने एका अंगाने हे काटेरा कुंपण व दुसऱ्या अंगाने कावेरी नदी याच्या दरम्यानच्या या पटांगणाची लांबी तीन मैल व रुंदी पाऊण मैल होता. पर्का पूर्वेकडचा प्रदेश सखल असून त्यात आसपासचे लोक आश्रयासाठीं येऊन राहिले होते आणि पटांगणाचा पश्चिम भाग खडकाळ व उंच असून तेथे टिपून सहा बुरूज बांधन तोफांची मांडणी केली होती त्यांचा मारा दूरवर होण्याजोगा होता या तोफांची संख्या शंभरापर्यंत असून या किल्ल्यावरील सर्व सैन्य व तोफा सय्यद हमीद व सय्यद गफूर नांवाच्या दोन विश्वासू सरदाराच्या हुकमतीखालीं देण्यांत आल्या होत्या शिवाय व्हिजी नावाच्या फ्रेंच अधिकाऱ्याने तयार केलेली गोऱ्या लोकांची तुकडीदेखील याच ठिकाणीं होती.

पटांगणाच्या उजव्या म्हणजे पूर्वेकडील बाजूस देखील लुकणी नदी व एक कालवा यांचा आसरा असून त्यापलीकडे उच्च टेकड्या होत्या व त्यावर तोफा असून शेख अनसर नांवाच्या अनुभविक योद्धयाची तेथे नेमणूक झाली होती. स्वतः टिपूने मध्यभागाची व्यवस्था आपणाकडे घेतली असून, त्याचा तंबू सुलतान बुरुजाशेजारी ठोकलेला होता. ''

७ फेब्रुवारी १७९२ रोजीं इंग्रजांनी पट्टणाच्या गोटाबाहेर टिपूवर हल्ला केला. '' इंग्रजानी छ १३ जमादिलाखरी पट्टणाहून तीन कोसांवर मुक्काम होता तेथून पधरा पलटणे सर्डी घेऊन रात्रीस निघाले ते टिपूचा गोट पट्टणेचे उत्तरेस होता तेथे जाऊन पोचले. एक शिलक केली. टिपू सावध झाला. त्याच्या तोफांच्या व बाणांच्या व गारद्यांच्या शिलका होऊ लागल्या. इंग्रजांनीं तोफा नेल्या नव्हत्या. फक्त पलटणांची शिलक करीत. टिपू तळावरून उधळला तो कावेरीपलीकडे दक्षिणतीरास गेला. उलटपक्षीं लढाई अवशीचे चौदा घटका रात्रीस सुरू झाली. ती दुसऱ्या दिवशीं प्रहर दिवसपर्यंत होत होती. लढाई भारी झाली. इंग्रजांनी करीघटाची टेकडी घेऊन लालबाग व शहरगज येथे जाऊन पोचुन जागा कायम केली. इंग्रजांच्या जुवामर्दीची शर्त झाली !'' वास्तविक इंग्रजानीं मराठ्यास मुद्दाम वगळून हा हल्ला केला. पण पुढे त्याचा त्यास पश्चात्ताप झाला. इंग्रज फौज अगदी दमून गेली होती पण शेवटीं हरिपतानीं आपण होऊन त्यांच्या मदतीस जाऊन त्यांची कुमक केली, व म्हणूनच टिपूचे राऊत निघून गेले. त्याच सुमारास परशु भाऊहि विदनुराकडून येऊन श्रीरंगपट्टणास दाखल झाला. व त्याने पराकाष्ठा करून टिपूची रसद तोडली. तेव्हा नाइलाज होऊन टिपूनें इंग्रजाशी तह केला तीन कोटि रुपये व अर्धे राज्य टिपूस देणे भाग पडल. त्याचे तीन सारखे हिस्से इंग्रज, मराठे व निजाम यानीं घेतले.

---

# टिपूवरील स्वारीचा पोवाडा

## ५

### ( शाहीर राजू सुलतान )

हा पोवाडा शेदूर येथे म्हालू तोंदल्या याने म्हटला व शितुतांनी तो उतरून काढिला. याशिवाय आणखी एक प्रत टोप सभापूर येथे त्यांना मिळाली होती.

सर केला टिपू सुलतान फिरंगी बाण गवसली खाण सोन्याची ॥ सोडीना फिरंगी लालुज पटणाची ॥ ध्रु० ॥

थोर होऊन शान अभिमान होउनी रावण होऊनी पाच्छाई द्वाही फिरविली परगण्यासी ॥ कैदेत घातले कुभार राजासी ॥ महाराठ लोक

---

फिरंगी बाण—बाण किंवा बाण या ऐवजी मूळ शब्द " याण " असा असावा. याण म्हणजे याणे किंवा याने–फिरंगी याण–फिरंग्याने. येथे फिरंगी हा शब्द इंग्रज या अर्थी वापरला आहे. पोर्तुगीज या अर्थाने नव्हे. इंग्रजांचा-हि फिरंगी या शब्दानें ऐतिहासिक वाङ्मयांत उल्लेख केलेला आढळतो. उदा. " फिरंगी अंमल आहे चहूकडे " या ध्रुपदाच्या पोवाड्यांत सर्वत्र तो तसाच वापरला आहे. " लालफिरंगी गोरा जमावून सारा । शेर.पुण्यावर दिली लढाई ।" " तलवार झाली वापर्डी फिरंगी छडी लागली दुनियावर फिराया " इ. गवसली खाण सोन्याची—टिपूचा म्हैसूर प्रांत अत्यंत संपन्न होता अशा अर्थाने त्याच्या मुलुखाला 'सोन्याची खाण' असे म्हटले आहे. शिवाय त्या मुलुखांत सोन्याच्या प्रत्यक्ष खाणी आहेतच. याच पोवाड्याच्या शेवटच्या चोकांत शाहीर स्पष्ट म्हणतो

ब्राह्मण नेइ धरून कापी चोमण मुसलमान केले राव तयासी ॥ बारा हजार चेला जमला पर्त्तासी ॥ चौमुलखी पडली धासत नाव कोण

---

मूळ म्हैसूरचे राजे जे कुभार जातीचे समजले जातात त्याना कैद करून स्वत च म्हैसूरच राज्य बळकावल होत चोमणे—जननेन्द्रिय 'महाराठ लोक ब्राह्मण नेई धरून कापि चोमण मुसलमान केले राव तयासि।' टिपूने केलेला धार्मिक जुलूम प्रसिद्धच आहे उदाहरणार्थ (१) मलबारातील पुढील प्रकार पहा " नायर लोकानी शहर सोडून जगलाचा आश्रय केल्यामुळे त्याना पकडण्यासासाठा टिपूला आपल्या सैन्याच्या टोळ्या करून निरनिराळ्या ठिकाणी पाठवाव्या लागल्या पैकी एका माळ्या टोळीने गुत्तीपूर येथील नायर लोकान्या एका बळकट किल्ल्यास वेढा दिला तेथे बायका पोरासुद्धा दोन हजार नायर लोक होते त्यानी काही दिवस किल्ला लढविला, पण शेवटा निरुपाय होऊन त्याचा उपासमार होऊ लागली, तेव्हा ते शरण आले त्या वेळीं " एकतर त्यानी आपणहून मुसलमानी धर्म स्वीकारावा नाहीं तर त्याना सक्तीने मुसलमानी धर्माची दीक्षा देण्यात येइल व शिवाय सर्वांना हद्दपारीची शिक्षा मिळेल व श्रीरंगपट्टणाकडे नेण्यात येइल' असे त्या नायर लोकाना कळविण्यात आल हे पाहून त्या लोकानी मुसलमानी धर्म स्वीकारण्याचे कबूल केल व दुसऱ्या दिवशीं सर्व पुरुषाची सुंता करण्याचा विधी झाला ! आणि नतर त्या पुरुषानी मिळून मासभक्षण केल्यावर हा धर्मान्त राचा समारभ सपला हे उदाहरण पाहून अरण्यवासाच्या यातनेस कटाळलल कित्येक लोक टिपूच्या सैन्यात दाखल होऊन मुसलमान बनले

घेतो थोर इम्रत तोफेची कानडे लोक फलटान केले त्यासी ॥ त्यानं दावा लाविला होता फिरग्यासी ॥ चाल ॥ भोवताचा वैरी टिकल फार दिवशीं ॥ बोलावून आणले जाऊन पेशव्यासी ॥ परमुलुख परगाणा दिला मोंगलासी ॥ झाडून ठाणीं बसविलीं पेशव्याचीं ॥ तीन दल मिळाले गर्दी

---

खिश्चन लोक इग्रजाना गुप्तपणे साहाय्य करतात अशी खात्रीलायक बातमी कळल्यापासून टिपूने परराज्यातील मुसलमानेतर प्रजेविषयीं अतिशय सावधपणा ठेवण्याचे ठरविले या सावधपणाचाच अतिरेक होऊन त्यान कारबारातील हजारो नेटिव खिश्चनाना मुसलमान बनवून त्याने त्याची कारबारातून हकालपट्टी केली व याच सावधपणामुळ आता त्याने परराज्यातील ब्राह्मणावर हत्यार धरल "आजपर्यंत या ब्राह्मणांनीं शत्रूच्या हेराचे काम करण्यासाठी बिनहरकत माझ्या राज्यातून जा ये केलीं असेल, पण इतउत्तर या गोष्टीकडे मला डोळेझाक करता येत नाही" असं ठरवून त्यानं असे हेराचे काम करणाऱ्या ब्राह्मणाना पकडण्याचा सपाटा चाल विला तेव्हा तेथील ब्राह्मणास दहशत बसून इग्रजी कोठीवाल्याचीं पत्रे पोच-विण्याचे त्यानीं साफ नाकारले प्रथम कपनीच्या लोकाना या गोष्टी खऱ्या वाटेनात, पण कालिकोट येथील दोनशे ब्राह्मणाना टिपूने बाटवून मुसलमान केले अशी खात्रीलायक बातमी कपनीकडे २० जुलै रोजीं आल्यामुळ त्यानीं पत्रे नेण्याबद्दल ब्राह्मणाना आग्रह करण्याचे सोडून दिल"

(३) "टिपूने कोची प्राताची व्यवस्था स्वत च करण्याच ठरविले, आणि व्यवस्था करणाऱ्या सिपानें त्यान या मुलुखात धुमाकूळ माडला कोचीच्या राजाचे मन टिपूविषयी विटून गेले तीस हजार पायदळ, पाच हजार घोडेस्वार व वीस तोफा एवढ्या सामुग्रीनिशी टिपूची स्वारी नोव्हेंबर महिन्यात कोचीकराच्या मुलुखात जी एकदा शिरली ती त्या मुलुखाचा सत्यानाश केल्यानतर बाहेर पडली म्हातारे कोतारे, बायका पोरे यानीं देशत्याग केला व तरुणाना जगलावाचून जागा राहिली नाहीं. धनिक लोकानी कोचीकराच्या मुलुखातून पळ काढला व नायणकोरच्या राजाने बाधलेल्या तटामागें ते लपून बसले. याखेरीज जे लोक तेथेच राहिले होते त्याचीं टिपूच्या सैन्याने कत्तल केली व त्याचीं घरेदारे जाळून टाकलीं

बोली किलबिली आतां उमजेना कवणाला ॥ खुब मार दिला मुरद्यानें खदक भरला ॥ चाल ॥ बसविले आपलें ठाणे गेला चालून लावून दुर्बीन पाहिले

---

केले त्यासी–त्याच्या फलटणी बनविल्या."कानडी,फिरगी लोक आणि हबशी" असाहि एक पाठभेद "कानडे लोक फलटान केले त्यासी" याला शितूतानी दिला आहे. तथापि खरा मूळ पाठ " कानडी फिरगी लोक आणि हबसि फलटान केले त्यासी" असा असावा अशी आमची समजूत आहे. टिपूच्या सैन्यांत कानडी, फिरगी म्हणजे फ्रेंच व हबसी म्हणजे सिद्दी लोक चांगल्यापैकीं निवडक भरपूर होते. त्याने–टिपूने. दावा लावणें–वैर धरणें. भौंवताचा–शेजारचा किंवा आपल्याभोंवती ज्याचा मुलूख पसरला आहे असा. दिकल फार दिवशी—आपल्या मुलुखाला घेरा घालून बसलेला आपला वैरी जो टिपू त्याचा निर्वंश जर वेळींच केला नाहीं, तर तो दृढमूल होईल. म्हणून इग्रजानीं त्याला नाहींसा करण्याकारितां पेशव्यास मदतीस आणिलें. परमुलूख— याचा बरोबर अर्थ लागत नाही. पेशव्यांना व मोगलाना शत्रूच्या मुलुखातले परगणे देण्याचे आमिष लावले इत्यादि भावार्थ. झाडून ठाणीं बसविली पेशव्याचीं—मोहिमेस सुरुवात झाल्यानतर परशुरामभाऊनें प्रत्यक्ष श्रीरंगपट्टणास पोचेपर्यंत सात–आठ महिन्यात जो टिपूचा मुलूख सोडविला त्यास उद्देशून तीन दळ मिळाले गर्दी मुलकाचीं—तीन दळें म्हणजे इग्रज, मराठे, व मोगल याच्या फौंजा. मुलुखाची गर्दी म्हणजे मनस्वी मोठा जमाव.'या मोहिमेत इग्रजी सैन्याजवळ

मोती तळ्याला ॥ वर्मासी वर्म भेटला धाक पडला ॥ तो मंटा फिरंगी इमर्ईहून आला ॥ सुलतान बचेन्या जाऊन तुडविला ॥ सा हजार बार

---

लाल सवाइ उडति भगव्या बाणाची–सवाइ (F) सवाईची दोरी. The name of the rope (turned into two or four directions) which is fastened to the top of the tent-pole.—मोल्स. लाल हें सवाईचें विशेषण. बाणा–निशाण; उदा.—"सेवक सिताराम ज्याच्या दशनामी भगवा बाणा." मराठ्यांच्या भगव्या निशाणाची लाल दोरी वाऱ्यावर उडत होती. मोल्सवर्थनें दिलेल्या अर्थावरून पाहतां मराठ्यांच्या तळावरील डेरे-राहुट्यांवर उडणाऱ्या भगव्या झेंड्याला अनुलक्षूनच वरील चरणाचा अर्थ तर्कानें बसवावा लागतो. आपण—इंग्रज. शार—शहर. उडविला धूर—धूर उडविणे म्हणजे मार देणें, पराभव करणें. पळून मग गेला—अर्थात् टिपू. देवडी किंवा देवडा मार–लागोपाठ उसत न घेता केलेली तोफांची किंवा बंदुकांची सरबत्ती. हबसी—टिपूजवळचे तोफखान्याचे हबश्यांचे पलटन होते त्याकडून. धरून किल्लेदार—इतिहासदृष्ट्या चूक. बंगलोरचा किल्लेदार बहादूरखान लढत असतां ठार झाला होता. त्याच्या शौर्यावर खूष होऊन कॉर्नवालीसनेंहीं त्याचे प्रेत निराळे बाजूस काढवून टिपूस निरोप पाठविला कीं, तुमची इच्छा असेल तर प्रेत सन्मानानें पुरण्यासाठीं तुमचेकडे पाठवून देऊं. पण टिपूनें उलट निरोप पाठविला कीं, 'शूर मनुष्य कर्तव्य बजावीत असतां ज्या

टिपूचा झडला ॥ चार हजार फिरंगी गोरा तिथ मेला ॥ त्या लालबागेचा धूर उडवून दिला ॥ तोफा टाकून माघारा पळून गेला ॥ होऊनी चाल दोन

---

या चरणाचा अर्थ नीट लागत नाही. फिरगी किल्ली बोली म्हणजे फिरग्यांशी कांहीं तहाचें बोलणे लाविले. किलबिली आतां उमजेना कवणाला— तें बोलणे किलबिलीसारखे अस्फुट म्हणजे गुप्त होते. त्याचा उमज बाहेर कोणास पडला नाही. एकदरीत अजमासाने या चरणाचा अर्थ बसवावयाचा तो असा—टिपूने बेंगळूर गेल्यावर इग्रजांशी तहाचे सूत्र लावून पाहिले, परतु ते तसेच जिरल्यावर त्याने इंग्रजांशी निकराचे दोन हात करण्याचे ठरविले. सुर्याने खंदक भरला—बगलोरच्याभोवतीं चांगला खदक असून, आंत शिरण्याच्या वाटेवर निवडुगाची लागवड केली होती. मोतीतळ्याला— हा मोतीतलाव म्हैसूरनजीक आहे. थोरल्या माधवराच्या कारकीर्दी-अखेर पेठे-पटवर्धनांनी जो हैदरअलीचा भयकर पराभव केला त्यामुळे मोती तलाव अजरामर झाला आहे. वर्मासि वर्म भेटला—ठकाठकाची गांठ पडली किंवा तुल्य बलवानांचा सामना सुरू झाला मेंढा फिरंगी—इग्रजांचा जनरल मेडोज. हा अत्यंत शूर अनुभविक, परतु दीर्घद्वेषी असा सेनापति होता. *टिपूने याला इतर इग्रजाप्रमाणे बरेच दिवस कैदेंत ठेवून त्याचा छळ केला* होता व म्हणून टिपूवर स्वारी होईल तेव्हां त्याचा पुरा सूड घ्यावा, ही त्याची इच्छा. "अर्काटाकडे हैदरअली इग्रजांकडे गेले होते ते साली 'बेली व भंडोर धरून कैद केले. फार तसदी केली होती. भडोर नांवे तोच मेडूस (तोच मेंढा) याचे मनात की त्या समयींचा बदला टिपूस करावा हा आग्रह." मोहिमेच्या

पारी सन्या दोपारी मध्याण रातरी गोरा फलटाण होऊन तयार लुटले
बार गंजीपाला ॥ पटणांत वळखिना माय लेकराला ॥ २

---

बत्तेऱ्या—वातेऱ्या. बातेरी हा शब्द बॅटरी शब्दाचा अपभ्रंश होय. कदाचित् टिपू सुलतानाने इंग्रजांच्या बातेऱ्या हल्ला करून मारल्या असाहि अर्थ वसेल. बार—टिपूच्या सैन्यांतील कवाईत शिकवलेल्या बंदुकी पलटणींतील शिपायांना बार अशी संज्ञा असे.

लालबाग—हैदरअलीची कबर जेथें आहे तो दर्यादौलत महाल म्हणजेच लालबाग होय.

"At the Eastern point of the island of the Shrirangapattan is situated a beautiful garden named Lalbag ornamented with several ××× and rendered sacred by..... the Mausoleum of Hyder Ali. This Garden was taken possession of on the night of the sixth when the English troops crossed the river and it being found impossible to procure any other materials for making fascines or gabions Lord Cornwallis was under the necessity of permitting cypress and other beautiful trees to be cut down for that purpose. The palaces and cloisters were at the same time, converted into hospital for the weak and wounded. The Sultan's proud mind was much irritated at seeing this spot, to ornament which he had bestowed pains, thus led waste. The funeral of his father contaminated by those whom he considered as infidels, He vented his rage in a continual discharge of cannons from the fort, directed at the garden, and every other spot within the sight occupied by his enemies." युद्ध संपल्यानंतर टिपूने पुनः लाल-

फिरगी मनसोबा निवळ, टिपूला खवळ, फिरगी बळ, पाले भारी ॥ त्याने बुधले पुरले पलगाशेजारीं ॥ मातेने घातरे भरा ॥ वडलाचा हाड सोडून कुणाकडे एकदाच वाचवावी नगरी ॥ म्हालात मेली खाशी अस्तुरी ॥ त्याची आईकताच शुद्ध गेली सारी ॥ त्यान पत्र लिवलीं भोवांत्या करीं ॥ पाठवून दिलीं तात्याच्या कचेरी ॥ वाचून पहाता माया आली उदरीं ॥ 'वडलांनें तारल होत समय शिरी ॥ आता तुम्हा वाचवा दौलत तुमचा

---

बाग कशी शुद्ध करून घेतलीं तहि वाचण्यासारखं आहे 'The Garden called Lalbag which had proved so useful to allies during the siege and which had been injudiciously used as burying place for Europeans, was purified by digging up all the bodies and throwing them into the river, the Mausoleum of Hyder was thoroughly repaired and new painted and every possible measure taken to efface the vestiges of its late possessions ( Memoirs of Tipoo Sultan by Charles Stuart )

सारी ॥ देतो मोंगलाचा परगाणा काम लहरी ॥ लष्करांत महागाई पडली दो शेरी ॥ झाली चौंकडून कुमका तारणारा हरी ॥ चाल ॥ गांवासी तीन तट किल्ला बळकट फिरंगी धीट भीत नाही आपल्या मरणासी ॥ राहुल्या नेहून भिडविल्या आरोग्यासी ॥ । ३

---

उडविण्यासाठी सुरुंगाच्या दारूचे बुदले. पलंगाशेजारी—वास्तविक पाठ 'अलगाशेजारी' असा पाहिजे. अलंग म्हणजे किल्ल्याचा तट. मातेने—टिपूच्या आईने. घातलें भरी—भीड घातली. वडिलांचीं हाडें इत्यादि—या पाठापेक्षा शितूतांनी पादटीपांत जो दुसरा पाठ दिला आहे तोच अधिक बरा दिसतो. तो असा—"घातली भिड । नको जाऊ कोणीकड । वडिलांचीं हाड । अशामधिं वाचिव ही नगरी।" टिपूची आई त्याला म्हणाली, 'तुझ्या बापाची कबर या शहरांत आहे. म्हणून तूं श्रीरंगपट्टण शत्रूच्या ताब्यात जाऊं देऊं नको, तह कर.' महालांत मेली राशी अस्तुरी—पराभव झालेला; आईचा लकडा लागलेला; आणि तशातच खाशी अस्तुरी म्हणजे पट्टराणी अकस्मात् मरण पावली. तेव्हां हताश होऊन टिपूनें कोणाकडून पत्र लिहवून हरिपंततात्यांकडे पत्रे पाठवून तहाची याचना केली. वडिलांनीं तारलें होतें इत्यादि—टिपूनें हरिपंताच्या पत्रांत असें लिहिलें होतें कीं, "तुम्ही वडिलांनीं मला पूर्वी संकटसमयीं वेळोवेळीं वांचविलें. आतां शिरीं तुम्ही आहां. मला वाचवा. ही सारी दौलत तुमचीच आहे. 'समय शिरीं' या शब्दाचा अर्थ 'माझ्यावर सध्या प्रसंग आहे', असाही करतां येईल. "इंग्रजांच्या मनांतून तह करावयाचा नव्हता. परंतु टिपूची दौलत गारद झाल्यास इंग्रज फार प्रबल होतील, याकरितां त्याचा समूळ उच्छेद होऊं द्यावयाचा नाही; ही मराठे व मोगल यांची मसलत पूर्वीच ठरली असल्यामुळे हरिपंतांनी या प्रसंगीं नेट धरला कीं, टिपूकडून तहाचें बोलणें आलें आहे. हे तीनहि सरकारांनी मान्य करावें. अशी त्यांची भीड पडली, तेव्हा लॉर्ड कॉर्नवालीस यांनी मोठ्या कष्टाने रुकार दिला."

[ खरे ऐतिहासिक लेखसंग्रह भाग ९ पृष्ठ ४४९७.]

देतो मोंगलांचा परगणा—मोंगल मागेल तो मुलूख त्याला देतो.

फिरगी मनसोबा निवळ, टिपूला खवळ, फिरगी बळ, झाले भारी ॥ त्याने बुधले पुरले पलगाशेजारीं ॥ मातेने घातले भरा ॥ वडलाचा हाड सोडून कुणाकडे एकदांच वाचवावी नगरी ॥ म्हालांत मेली खाशी अस्तुरी ॥ त्याची आईकताच शुद्ध गेली सारी ॥ त्यान पत्र लिवली भोवातिया करी ॥ पाठवून दिली तात्याच्या कचेरी ॥ वाचून पद्दार्ता माया आली उदरीं ॥ 'वडलान तारल होत समय शिरी ॥ आता तुम्हा वाचवा दौलत तुमची

---

बाग कशी शुद्ध करून घेतली तहि वाचण्यासारख आहे "The Garden called Lalbag which had proved so useful to allies during the siege and which had been injudiciously used as burying place for Europeans, was purified by digging up all the bodies and throwing them into the river, the Mausoleum of Hyder was thoroughly repaired and new painted and every possible measure taken to efface the vestiges of its late possessions ( Memoirs of Tipoo Sultan by Charles Stuart )

गजीपाला—शुद्ध पाठ 'लुटल शहरगजमाला', असा असला पाहिजे " इग्रज बदुकाच्या सिलका मारीत करीघट्याचे टेक्डीपर्यंत गेले टेक्डा घेतली तेथून पुढ शहरगजम लालवाग कावेरीच्या चिमट्यात आहे ती जागा कायम केली " [ आपटे २२१, ] " श्रीरगपट्टण म्हैसुरापासून ९ मैलावर कावेरी नदीचे काठीं आहे नदीच्या दोन शाखा होऊन निसर्गत च तें बेट बनले आहे बेटाची पूव पश्चिम लाबी सुमारे ३ मैल असून, रुदा १ मैल आहे या बेटाच्या पूर्वेस टिपूच्या वेळचे शहर होतें त्यास गजम पेठ असें म्हणतात " [ 'इतिहास सग्रह—ऐतिहासिक स्थळ' पृष्ठ १७ ]

पट्टणात घळखीना मायलेकराला—पट्टणात असा पळ सुटला की, त्या धादलींत आयाना आपलीं लेकर सम्भाळण्याचीहि शुद्ध राहिला नाही मनसोबा—मनसुबा म्हणज मसलत निवळ—पक्का खवळ—खवळवी त्याने—इग्रजाने बुदले—तट

सारी ॥ देतो मोंगलाचा परगाणा काम लहरी ॥ लष्करांत महागाई पडली दो शेरी ॥ झाली चौंकडून कुमका तारणारा हरी ॥ चाल ॥ गांवासी तीन तट किल्ला वळकट फिरंगी धीट भीत नाही आपल्या मरणासी ॥ राहुख्या नेहून भिडविल्या आरोळ्यासी ॥ २

---

उडविण्यासाठी सुरुंगाच्या दारूचे बुदले. पलंगाशेजारी—वास्तविक पाठ 'अलंगाशेजारी' असा पाहिजे. अलंग म्हणजे किल्ल्याचा तट. मातेने—टिपूच्या आईनें. घातलें भरी—भीड घातली. वडिलांचीं हाडें इत्यादि—या पाठापेक्षा शितूतांनी पादटीपांत जो दुसरा पाठ दिला आहे तोच अधिक बरा दिसतो. तो असा—" घातली भिड । नको जाऊं कोणीकडं । वडिलांची हाड । अशामधिं वाचिव ही नगरी।" टिपूची आई त्याला म्हणाली, 'तुझ्या बापाची कबर या शहरांत आहे. म्हणून तूं श्रीरंगपट्टण शत्रूच्या ताब्यांत जाऊं देऊं नको, तह कर.' महालांत मेली खाशी अस्तुरी—पराभव झालेला; आईचा लकडा लागलेला; आणि तशांतच खाशी अस्तुरी म्हणजे पट्टराणी अकस्मात् मरण पावली. तेव्हां हताश होऊन टिपूनें कोणाकडून पत्र लिहवून हरिपंततात्यांकडे पत्रें पाठवून तहाची याचना केली. वडिलांनीं तारलें होतें इत्यादि—टिपूनें हरिपंतांच्या पत्रांत असे लिहिलें होतें कीं, "तुम्ही वडिलांनीं मला पूर्वी संकटसमयीं वेळोवेळीं वांचविलें. आतां शिरीं तुम्ही आहां. मला वाचवा. ही सारी दौलत तुमचीच आहे. 'समय शिरीं' या शब्दांचा अर्थ 'माझ्यावर सध्या प्रसंग आहे', असाही करतां येईल. "इंग्रजांच्या मनांतून तह करावयाचा नव्हता. परंतु टिपूची दौलत गारद झाल्यास इंग्रज फार प्रबल होतील, याकरितां त्याचा समूळ उच्छेद होऊं द्यावयाचा नाहीं; ही मराठे व मोगल यांची मसलत पूर्वीच ठरली असल्यामुळे हरिपंतांनी या प्रसंगीं नेट धरला कीं, टिपूकडून तहाचें बोलणें आलें आहे. हे तीनहि सरकारांनी मान्य करावें. अशी त्यांची भीड पडली, तेव्हा लॉर्ड कॉर्नवालीस यांनी मोठ्या कष्टानें रुकार दिला."

[खरे ऐतिहासिक लेखसंग्रह भाग ९ पृष्ठ ४४९७.]

देतो मोंगलांचा परगणा—मोंगल मागेल तो मुलूख त्याला देतो.

लागलं सल्ल्याचे तोंड फिरंगी मोंड वेढा उठविना आपला ॥ पाहीन म्हणतो एकदा पटणाचा वाडा ॥ वर वाजवीन तंबूरा जरा धीर धरा बांधवीन घरे बाल्गीन सवा लाख घोडा ॥ तो हरिपंत तयाचा मनसोबा गाढा ॥ हाय मुसलमान या उभी असू दे सुभी दावतो खुबी मुसलमान वेढा ॥ घरीं बसल्याने पैशाचा करील झाडा ॥ चाल ॥ भ्रमाचा भोपळा नका तुम्ही फोडा ॥ मारला चंद्रपठाण बैजवाडा ॥ नऊ क्रोड रुपये रडणी केली झाडा ॥ तुंगभद्रेकडे परगाणा दिला सारा ॥ दिला लेक हातीं मारा कीं तारा ॥ चाल ॥ भाऊसाहेबासी आला राग खवळला वाघ काढला माग वलाडून गेला कावेरी ॥ परतून ढाला दिल्या त्यास लहरी ॥ ४

---

काम लहरी—? कुमका—? आरोब्यासी—तोफखान्याला किंवा तोफखान्यापर्यंत. मोंड—जनरल मेडोज. तंबूरा—टॅंबूरीन या इंग्लिश शब्दाचा अपभ्रंश. A kind of drum—नगारे. या उभी असू दे सुभी—याच्याकडे सुभी म्हणजे सुभेदारी राहू दे म्हणजे त्याचा अर्थ सर्व मुलुख घेऊन त्यास निर्मूल करू नये. फोडा—फोडू. चंद्रपठाण बैजवाडा—चंद्रपठाण हा चिनापट्टण या शब्दाचा शाहीराने केलेला अपभ्रंश! चिनापट्टण म्हणजे मद्रास. बैजवाडा म्हणजे बेझवाडा. टिपूने मद्रासकरांचा संपूर्ण पराभव केलेला होता त्यास अनुलक्षन त्यास लहरी—त्याच लहरी, त्याच क्षणाला. परशुरामभाऊ पटवर्धन याला टिपूशी लढण्याची खुमखुमी आली होती परंतु तो पट्टणास पोंचतो न पोंचतो तोंच तिकडे तह ठरला होता म्हणून त्याला लगेच परत फिरणे भाग पडलं परतून दिल्या ढाला—ढाल म्हणजे निशाण म्हणजे निशाणे परत फिरविलीं टिपूच्या घरास वा रिझली–'टिपूच्या घरा स्वारी झाली' असा मूळपाठ असावा घर मोंगलाचे घुमट—शितूत यानी याऐवजी 'त्या हादऱ्याचा गौमुट खालता नीट' असा दुसरा पाठ दिला आहे तोच बरा वाटतो. हैदर याची कबर आहे. तेथून खाली पेठ म्हणजे शहरगंजम आहे व त्यापुढे लालबाग आहे. रागीनें घेतलें घर—रोगानें घेतले घर असे पाहिजे लष्करात रोगराई सुरू झाली. घोड्याला चालेना ओझें नवे जीण—घोडीं उपासमारीनें व हालानीं इतकी अस्थिपंजर झालीं होतीं कीं, त्याना बिलकूल ओझे उचलेना मुसत्या जिनाचेही ओझे त्याना होत होत. बय-

पटण सारख्या शहरा निशाणा वरा टिपूच्या घरास वा रीझली ॥ उच गावातून जागा गावातुन होती नेमिली ॥ वर मोगलाचे घुमट खाल जाय निट वसविली पठ दिली लालवाग लावून ॥ त्या करनाटकामधीं जागा पाहून ॥ सोन्याचा निघतो धूर नदीस आला पुर नाव हाय श्रीरंगपट्टण ॥ त्या मुलखामधि राव जनमतो सोन ॥ चाल ॥ झाले सला चालले लष्कर निघून रागीने घेतले घर जन म्हणती अशी कैक मेली हगवण लागून । घोड्याला चालेना ओझे नवे जिण ॥ तसल्यात गाठ घातली राव वयवान ॥ फत्तु नाम गैबीचे करतो स्मरण ॥ लाड्ड नेमज वस्तादाची दया पूण ॥ राजू सुलतानाचें मडवड ठिकाण ॥ असा छद फद केला पाहून ॥ ऐकून जळती दंडी दुसमान ॥ चाल ॥ आम्ही दालीबद शिपाइ वळखिली शाई त्या शहरामधि तुरेवाल्याची उपडली दाँडी ॥ ५

---

यान—बैदानी हे बैद लोक म्हणने टिपूचे छापा घालणारे गनिमी काव्यात तरबेज असलेले घोडेस्वार त्याना बैद अशी सज्ञा होती "हरिपततात्याच लष्कर परत येत असताना महागाईमुळे व बैदाचा नित्य उपद्रव होत असल्यामुळे फार हैराण झाल पण परशुरामभाऊचें लष्कर परत फिरल्यामुळ तुगभद्रेवर येइ तेथपर्यंत त्याला ज्या विपत्ति भोगाव्या लागल्या त्यापुढ हरिपताच्या लष्कराची हलाखी काहीच नव्हती भाऊ देशी येऊन पोचतपर्यंत त्याच्या लष्करात एक रुपयास एक शेर याप्रमाणे धान्य विकल जात होतें वैरणीचा वडाड झाल्यामुळे शेकडा गुर व घोडी दररोज मरत होतीं बरोबरच्या अवजड तोफा ओढून नेणारे बैल गळाठले असल्यामुळ कधी एक कोस कधी अर्धा कोस

# नागपूरकर चिमणाबापू भोसल्याचा पोवाडा

## ऐतिहासिक माहिती

पुढील पोवाड्यात १७८० साली नागपूरकर भोसले यांनी कटक ओरिसावर जी स्वारी नेली त्याचे वर्णन आहे

सन १७८० च्या प्रारंभीं हैदर अलीन पुणें दरबाराशीं तह केला हा तह होताच अनेक वर्षे महाराष्ट्र व म्हैसूर येथील सरकारात जो युद्धप्रसग सुरू होता तो बद पडून एकोपा झाला त्या एकोप्याच्या पायावरच एक प्रचड कारस्थान नाना फडणविसानें रचून इग्रजाना सगळी कडून एकाच वेळीं शह देऊन त्याना उखडून टाकण्याचा घाट घातला मस लत अशी ठरली होती कीं, पेशव्यानीं मुंबई, गुजराथ व अतर्वेद येथील इग्रजास पादाक्रांत कराव, निजामअलीनें सिकाकोल राजमहिंद्रीकडे जाऊन तो प्रदेश ताब्यात घ्यावा, हैदरानें मद्रासेवर स्वारी करून इग्रजाच तिकडील राज्य घ्याव आणि नागपूरकर भोसल्यानी वगा ल्यावर स्वारी करून इग्रजास तबी यावी हा व्यूह फारच उत्तम होता परतु नागपूरकर भोसल्यानी पहिल्यापासून फितुरी सुरू केल्यामुळें तो सिद्धीस गेला नाहीं असा असा बनाव होत आहे हें भोसल्यानीच इग्रजास आतून कळवल ! त्याना उघड उघड स्वारीवर जात नाहीं म्हण ण्याची छाती नव्हती, म्हणून मुधोजी भोसल्यानें खडोजी ऊर्फ चिमणाबापू भोसले याच्याबरोबर चाळीस हजार फौज देऊन त्याला स्वारीस रवाना केल्याचसांग केल परतु स्वारीस निघतानाच त्यान चिमणा बापूस आतून स्पष्ट सागी दिली होती कीं, कोणीकडून तरी वेळ काढावा, बगाल्यात शिरू नये व इग्रजाशीं कलागत करू नये खुद्द वॉरन हेस्टिंग्ज् च्या पत्रव्यवहारावरूनही ही गोष्ट सिद्ध झाली आहे

११ ऑगस्ट १७७९ रोजीं चिमणाबापू नागपुराहून चाळीस हजार फौज घेऊन निघाला. प्रथम त्यानें बिहार प्रांतांत शिरावे व तिकडून बगाल्यात जाव, असं सर्वानुमत ठरल होत व तोच रस्ता सोयीचाही होता तसें केलें असत, तर अवघे दोन महिने बगाल्यात शिरण्यास लागले असते परतु चिमणा जीन मुद्दाम रस्ता बदलला व तो प्रथम कटक प्रांताकडे गेला रस्त्यानें- ही मुक्काम लाववीत १७८० च्या मे महिन्यात म्हणजे आठ-नऊ महिन्यांनी

तो कटक प्रांतांत येऊन पोंचला. बरें, तेथून तरी बंगालकडे जावें तें न करतां अर्वांतर ठाणीं सोडवीत पावसाळा जवळ येण्याची तो वाट पाहत बसला; आणि पुढें पाऊस सुरू झाल्यावर उघडपणेच .आतां स्वारी-शिकारी होणार नाहीं असें सांगूं लागला.

त्याच्या सैन्याचा सरजामही अगदीं वाईट होता. शिपायांचे पगार तुंबले होते. सारांश, त्या लष्कराच्याने इंग्रजांचें फारसें वांकडे होण्याचा संभव नव्हताच. इंग्रजांना, आंतून भोसल्यांनी फितुरी केलेली असली, तरीहि कांही भीति वाटतच होती. म्हणून त्यांनी ५० लक्ष रुपये लाच देऊन भोसल्यांना परतावलें! इंग्रजांना मद्रासेकडे सैन्य पाठविण्याची जरूर होती. पण तें सैन्य जाण्याचा रस्ता कटक प्रांतांतूनच असल्यामुळे व तेथेंच चिमणाजी येऊन बसल्यामुळे इंग्रजांना अडचण होती ती अशा रीतीनें दूर झाली.

या भोसल्यांच्या स्वारीविषयीं व त्यांच्या फितुरीमुळें झालेल्या राष्ट्राच्या घाताविषयीं भरपूर माहिती कै. यादवराव काळे यांच्या नागपूर प्रांताच्या इतिहासांत आणि सरदेसायांच्या मराठी रियासत उत्तर-विभाग खंड १ या पुस्तकांत सविस्तर आलेली आहे.

केवळ पोवाड्यावरून स्वारीचा आराखडा निघतो तो असा. भोसले नागपुराहून निघाल्यावर त्यांच्या सैन्यास जंगली प्रदेशांत अत्यंत त्रास झाला; व अनेक लोक हिंवताप लागून मेले. पुढें सैन्य सोमलवाड्याच्या

# नागपूरकर चिमणाबापू भोसल्याचा पोवाडा

## ६

## ( शाहीर सुलतान )

शिपाई चाकरी गेले नागपुराला । तेली वाणी उदमी दाली बांधू लागला ॥ ध्रुपद ॥

राजानीं मनसुबा केला बगाल्यावर । पाहिले मोहतुर दिले सासे डेर । चोलावुन मानकरी कचेरी भर । झाली चिमणाबापूची ताक्दि जलदी फार ॥ राव माने मानकरी घाटगे पाटणकर । यादव निंबाळकर ज्यातक जाधव ढमढेर । ननवरे पठाण सार । झाली हुजुरात तयार । अगड धो धो बाजे चवघडा बाहेर निघाला । राव बाड निशाण हाय उजव्या बाजुला ॥ शिपाई० ॥ १

वनीं येळवाच्या जाळ्या वन दारुण । कइकांनी आवधाक दिले प्राण सोडुन । कइकासीं आलें हिवजाळ धास्तिन । गेली फौज सोमल

---

दाली बाधणें—दाली म्हणजे कमरबद किंवा कमरपट्टा ज्याला तलवार लटकवितात तो दाली बाधण म्हणजे चढाइस किंवा ल्डाइस सिद्ध होण  मनसुबा—मसलत  राजानीं—नागपूरकर राजे भोसल्यानीं  मोहतुर—मुहूत  ज्यातक्—जाचक असे पाहिजे या आडनावाचे मराठे सरदार भोसल्याच्या पदरीं होते ( पहा, नागपूर प्रांताचा इतिहास पान ५७१ ) ओरिसातील बाराभाटीचा जो कटक जवळील प्रसिद्ध किल्ला भोसल्याच्या ताब्यात होता त्यावर दारकोजी जाचक हा सन १७७६ त किल्लेदार होता.  ननवरे—रणनवरे (?)  बांड निशाण—बाडा म्हणजे भूमिका एका रगाची व वरचे पट्टे अन्य रगाचे असा कपडा ( आपटे ) काळ्या पाढऱ्या अगर तानडया व अन्य रगाचा कपडा ( मोल्स ) यावरून भोसल्याचे निशाण कर्मे होत तें कळत प्रत्येक सरदाराचे निरनिराळ्या तऱ्हेच निशाण असे उदाहरणार्थ,बापू गोखल्याच्या निशाणावर मारुतीचे चित्र काढलेल असे, शिंद्याच्या झेंड्यावर नागाचे निशाण असे  येळवाच्या—वेढऱ्या  आवधाक—भीति  *हिंवजाळ*—हिंव म्हणजे थंडी जाळ म्हणजे ताप म्हणजे हिंवताप वगैरे  सोडिलीं निशाणें—समारंभाशिवाय इतर वेळीं

वाड्यावर चालुन ॥ मग सोडली निशाणें । हल्ला उठला चहुकडून । मग सुटती तोफा बाण । झाली लष्करात सडघाण । भेसूर दिसे रण । जरीपटका गेला चालुन । राव मान्याची लगी झाय उजव्या बाजुला । गेले मारीत खदकापाशीं मोरच्या दिला ॥ शिपाई० ॥ २

तेली वाणी उदमी नाइक पडले भरी । कर्जाची घेतली घोडी आले चाकरी । गेले वन्हाड.त फिरून माहुरावरी । दरकूच आले कवड्डच्या तळ्यावरी ॥ मनसुबी थोपली सारी । बोलावून मानकरी । सांगितले खरेपरी । आली बगाल्याची चाकरी । ओलांडुन गेले वारी । गेले चवकेवारीवरी । अशी फौज मिळून गेले नकटेबारिला । एक म्हणती उगाच आलो पस्तावा झाला ॥ शिपाई० ॥ ३

गेले लष्कर झाडीमधी पडेल जाऊन । मधिं पडली फट बुणगे

---

निशाणाचा कपडा निशाणाच्या दांडा भोवती गुंडाळून ठेवीत असत. येथे भावार्थ सैन्य हल्ल्यास सज्ज झालें. बाण—दारूचे बाण. हे सध्या दिवाळींत मुले सोडतात त्यासारखेच; परंतु अलस मोठे असत. जवळ जवळ आटदहा फूट लांबीच्या बांबूला दीड दोन फूट लांबीचे दारू भरलेले नळकांडें जोडलेलें असे. हे बाण शत्रु सैन्यानी फार नुकसानी करीत. त्यांचा नेम जरी तोफेसारखा अचूक नसे तरी शत्रूच्या तळास आगी लावण्यास व माराने माणसे मारण्यास ते फार उपयोगी असत. असल्या बाणांनी लढण्यात नागपूरकर भोसल्यांची ख्याती होती. सडघाण—धुवडा. भेसूर—भयासूर, भयकर, बीभत्स. रण—रणमैदान. लगी—झेंडा, निशाण. लक्षणेने मान्याचे पथक. नाइक—न आइक. आइक म्ह. आइके म्हणजे ऐकले नाही. कर्जाची घेतली घोडी आले चाकरी—कर्ज काढून घोडीपाडी विकत घेऊन सैन्यात चाकरीला दाखल झाले होते. फिरून—परतुन. मनसुबी थोपली सारी—मनसुबी म्हणजे मनसुबा, मसलत. थोपली म्हणजे थांबली. खरेपरी—खरेपणाने, समजूत पडेल अशा तऱ्हेने, आर्जवून. चवकेवारी—वाडी असे असावे. नागपूरकर भोसले बखर पान १६८ वर चौकीगड व वाडी अशी दोन स्थलवाचक नावें आली आहेत बहुधा तींच हीं असावींत. फट—अतर बुणगे—

गेले चुकून । तीन रोज लष्कर गेलें गडबडून । धाडून सांडणी मिळाली फौज येऊन ॥ तेल्या वाण्या उदम्यान । घोडे आणलें अर्धलिन । गेले एकाएकी मरून । दिले जिन-खोगीर टाकून । काय जावें देशाकारण । कधीं तोंड दाविना म्हण । गेलें लष्कर कटकावर जागा पाहीला । तेथे जवुमाळयाचा लालबाग देखिला ॥ शिपाई० ॥ ४

---

सैन्याच्या सामग्रीचा तळ; सैन्यांतले उदमी वगैरे बिनलढाऊ लोक. धाडून सांडणी—साडणीस्वार चौकशीला धाडून. दाविना—दावीन ना म्हणजे दाखविणार नाहीं. म्हण—म्हणे. ज्याचे घोडे मेले तो शिलेदार म्हणू लागला कीं, घोडे अर्धेलीने आणले होते ते घोडे मरून गेले. आतां हे जीन खोगीर तरी कशासाठीं बरोबर बाळगावयाचें? आता देशाला परत गेल्यावर सावकाराला काय सागावें?

अर्धेलीच घोड इ.—" भोसल्यांची फौज बगाल्याचे हद्देस गेली. तिकडे छावणी झाली. हवा वाईट सबब छावणींत तमाम घोडीं मेलीं. लोकात बळ राहिला नाही. " हिंगणे याचे नाना फडणिसास पत्र ता. १५।८।१७८१ चे. इतिहास संग्रह " दिल्ली येथील मराठ्यांची राजकारणे " लेखाक ५४ पृष्ठ ५२.

जवुमाळयाचा लालबाग—ही काही तरी अडाणी शाहीराच्या अशुद्ध उच्चारामुळे निर्माण झालेली चूक असावी. ' जाभुळ मळ्याचा ' लालबाग असें तर नसेल ? (२) लंकेंत मारुतीने जबूमाळ्याच्या बाग उद्ध्वस्त केल्याची कथा आहे. प्रस्तुत लालबागेंत किंवा जगलात वानराचा अतिशय उपद्रव असावा आणि म्हणून त्या बागेला किंवा जगलाला जंबुमाळयाचें नांव पडलेलें असावें. (३) लाला सेवकराम याने आपल्या ३ जुलै १७८१ रोजीं पुण्यास लिहिलेल्या बातमीपत्रांत चिमणाजी भोसले नीलगिरी डोंगरातून कूच करून पुढे आले असं म्हटलें आहे. नील किंवा नीळ ही एक वानराची जात आहे. ज्या गिरीवर म्हणजे डोंगरावर त्यांची फार वस्ती तो नीळगिरी. साराश, जबुमाळयाचा लालबाग म्हणजे नीळगिरीचा डोंगर असें तर नसेल ? लालबाग हें कटजूरी (Katjuri) नदीच्या कांठीं असून ती मराठा सुभेदाराची राहावयाची जागा होती असें कटक

एक आंबराईमधिं उतरले लष्कर। किल्लशाहून गोळ्यांचा मार निघेना धीर। शिपी साळी पिंजारी पळती भिऊन माघार। तेली वाणी उदमी होती पाठमोर॥ एकजात शिपाई रणशूर। मारिखले खदकावर। दाहा रोज सोसला मार। शिपायाचे ढालबखतर। गोळ्या फोडुन होती पार। गडबडले सोमलपुर। गडबडला किल्लेदार कवलासी आला। दिली खडणी राजाला। तियून शह्र उडविला॥ शिपाई०॥ ५

एक उडव्या मुलखामधिं गेले लष्कर। राहा महिने छावणी झाली कटकावर। तिथे बाराभाटिचा किल्ला ऐका थोर। त्या खदकामधिं सुसरी महाकुंजर॥ नादान मुल्लख फार। नाहीं पैसा तांब्याची तार। कवड्यांची

गॅझेटिअरमध्ये लिहिले आहे. मारविले खंदकावर—इरेस पडून खदकापाशी झालेल्या चकमकींत मारविले. अनेक शूर शिपाई तेथे कामास आले हा भावार्थ. बखतर—चिलखत. सोमलपूर—सबळपूर असावे. उडव्या मुलूख—ओरिसा. बाराभाटीच्या किल्ला—कटक हा प्रांत बंगालच्या दक्षिण भागास समुद्र किनाऱ्यावर असून, त्यात कटक हे मुख्य शहर आहे. कटक शहराजवळ बाराभाटीचा मजबूत किल्ला होता. तसेच बलसोर उर्फ बालेश्वर म्हणून महत्त्वाचे बंदर या प्रांतांत होते. (नागपूर प्रांताचा इतिहास पृ. २१८) "The citadel of cuttak known as fort barabhati is situated on the south Bank of Katjuri river opposite the city. (Imperial gazetteer of india vol. 4 Page 75)

महाकुंजर—मोठ्या हत्तीएवढाल्या. नादान—गरीब, कंगाल. नाही पैसा, तांब्याची तार कवड्यांची चाल फार—मुलुख इतका गरीब कीं, सोन्याचांदीची नाणीं सोडाच पण ताम्र्याचीहि नाणी दृष्टीस पडावयाचीं नाहीत. सर्व व्यवहार कवड्यांवरच चाले. सन १७९० सालीं कॉर्नवालीस यांनं फार्स्टर व लेकी या दोघा इंग्रजांना वकील म्हणून नागपुरास पाठविले होते. त्यापैकीं लेकीने लिहिलेल्या प्रवासवर्णनांतहि या गोष्टीचा प्रामुख्याने उल्लेख केला आहे. तो लिहितो, "कटक प्रांतांत सोने व चांदीचा व्यवहार फार कमी असून सर्व देवघेव कवड्यांनीं होते.'

चाल फार। खायाशी भात-खापर। नेस लंगोटी चर घोतर। अगीं कळ-कट बोतर। झाल्या खुशाल रांडा पाहुन भल्या लोकाला। अवघ्या लष्करामधिं उडव्या मुलुख उठला ॥ शिपाई० ॥ ६

गेली फौज चालून ढाऱ्या नाल्यावर। तिथें सोडली निशाणे झाले तयार। झाली पहिली हल्ला लोक पडले फार। आली हल्ला फिरून माघारी जयजयकार॥ भले मर्द शिपाई रणशूर। धावले खदकावर। लोक जखमी झाले फार। कईकाचीं बुडाली घर। रणकंदन अनिवार। लढण्याची हौंस फार। गडबडला किल्लेदार लागले झाडी तोडायाला। देइना खडणी तसाच पळून गेला ॥ शिपाई० ॥ ७

पुरीवर लष्कर गेलें महिनाभर। एक श्रावणमास महिनापवितर।

---

कळकट—घामट, मळकट. खायाशी भात खापर—येऊन-जाऊन भात तेवढा खायला मिळे; पण तोहि तिकडच्या पद्धतीप्रमाणे खापरावर!

बोतर—असा शब्द कोशांत सापडत नाही. बोथरी, बोथारा असा शब्द सापडतो, पण येथे तो शब्द लागू पडत नाही. कारण त्याचा अर्थ तोंडावरचा पडदा, बुरखा असा आहे. बोंदर असा शब्द आपटे देतात तो जुळतो. बोंदर ( न ) जीर्ण वस्त्र हाच शब्द बरोबर दिसतो. भल्या लोकांना—पेशवाईंत शिलेदार लोकानाच हा शब्द लावीत. ढाऱ्या नाल्यावर—" ढेकानाल नावाचा डोंगरी किल्ला होता व त्याच्या आसपास जंगल होतें. हे ठिकाण कटकच्या रस्त्याच्या पश्चिमेस बऱ्याच अंतरावर डोंगरात आहे. कटक प्रांतांतून जाणारा रस्ता व हे ठिकाण यामध्यें सतरा कोस दाट अरण्य आहे व तें बडखोर राजांनीं इतकें व्यापिलेलें आहे कीं, मराठी लष्कराकडे सामुग्री घेऊन जाणारे काही स्वार तिकडे गेले त्यांना मधूनच परत यावें लागले [ नागपूर प्रांताचा इतिहास पृ. २६२ ] आली हल्ला फिरून माघारी जयजयकार—आंतून किल्लेदाराने हल्ला करून भोसल्याचा मोहरा माघारी फिरविला तेव्हा अतिरेवेषाने हरहर महादेव असा जयजयकार करीत मराठे पुन्हां खदकावर धांवले. कैकांची बुडालीं घरें—कित्येक कुटुंबांतले एकूण एक कर्ते पुरुष या हल्ल्यांत मारले गेले असा भावार्थ पुरी—जगन्नाथ पुरी—पुरीगांव सागरतीरापासून दोन मैलावर आहे. येथे श्रीजगन्नाथजी ( कृष्णा )चें देवालय मुख्य असून ह्याचे आजूबाजूस पुष्कळ

तिथें जगन्नाथ एक देव तीर्थ थोर। त्याचे दर्शन घेतां पापे होतीं दूर ॥ देवाचें शिवालय थोर। लागेना अंत ना पार। राम लक्ष्मण अवतार। रिद्धी-सिद्धीचे घर। एक मडके विस्तवावर। दहा मडके होतीं तयार। वाणी कुणबी ब्राह्मण बसले जेवायला। एके जागीं जेविती, अवघा गोपाळकाला ॥ ८
शिपाई० ॥

---

देवतांचीं लहान मोठीं मंदिरं आहेत. श्रींचे मंदिराचा परिघ ६५२ फूट लांब आणि ६३० फूट रुंद असून भोंवताली २० फूट उंचीचा तट आहे. फार प्राचीन काळापासून हें देवालय पूज्य आहे. येथील नाथाच्या प्रसादास (भातास) सोंवळ्याचा मुळींच प्रतिबंध नाहीं. सर्व लोक तो एकाच ठिकाणीं सेवन करतात. आनद बाजारांतहि तो विकत मिळतो. जगन्नाथाच्या मुख्य रथोत्सवाची यात्रा दरवर्षी वैशाख मासीं भरते. त्या वेळीं सुमारें तीस लाखापर्यंत जमाव जमतो. रथोत्सवाच्या पूर्वी पंधरा दिवस देवाची स्नानयात्रा असते. हे दोन्हीहि समारंभ सुमारे महिनाभर चालतात व पाहण्यासारखे असतात. [ सचित्र भारत प्रवास वर्णन पृ. ५६ ]

पवितर—पवतर, पर्यंत. कदाचित 'पवित्र' याचाहि पवितर हा अडाणी अपभ्रंश होऊ शकेल. पवित्र हें श्रावणाचे विशेषण. तर्थि—तीर्थ क्षेत्र. पुरीजवळ भुवनेश्वर येथे प्रसिद्ध शिवालय आहे. तसेच कोनार्क गांवांत सूर्याचे प्रसिद्ध देवालय आहे. हें प्रसिद्ध क्षेत्राचें गांव ओरिसा प्रांतांतील पुरी जिल्ह्यांत बी. एन्. रेल्वेच्या ईस्ट .कोस्ट सेक्शनवर पुरीपासून उत्तरेस ३२ मैलांवर आहे. येथील विंदु सरोवराच्या पश्चिमेस कांही अतरावर अष्टमातृकांपैकीं कपालेश्वरी देवीचें भव्य असें दगडी देवालय आहे. ह्या देवळाचा आकार थेट जहाजाच्या आकाराप्रमाणे मोठा असून बांधणी वरील देवळाप्रमाणेच शिल्पपद्धतीची आहे. भुवनेश्वरास मुख्य क्षेत्रदैवत लिंगराज महादेव असून त्या भव्य देवालयाभोंवताली आणखीहि बरींच देवळें आहेत. त्याचप्रमाणे मुक्तेश्वराचे स्थान आणि देवालयहि पहाण्यायोग्य आहे. लिंगराज महादेवाचे उत्सवा-प्रीत्यर्थ दरसालीं महाशिवरात्रीस या गांवीं मोठी यात्रा भरते. इतर प्रांतांतील लोक श्रीजगन्नाथाची यात्रा करून परत जातांना ह्या क्षेत्रीं जाऊन तेथील यात्राविधी करितात. ( सचित्र भारत प्रवास वर्णन पृ. १२० )

एक बाळेसरावर उतरले लष्कर। तेथे उत्तार पेठ आहे दरयाचे किनार। गजकर्ण दुःख रोग उठले अंगावर। चारी प्रहर वर्षतो कहार निघेना धिर॥ आला पाऊस सुटला वार। गारानीं बसविला मार। गेले उडून राव्हट्या डेर। उट तट मेली फार। देवाची करणी फिरंगी आला। राजाची फत्ते तलवार यश पावला॥ शिपाई०॥ ९

भगवत दिले वरदान आले फिरून। एक बंगाल्याची चाकरी झाली कठीण। जो दानपुण्य करील तोचि निधान। रणशूरा दानशूराला देव प्रसन्न॥ कर दया धर्मनिधान। देव काटाल विघ्नांतुन। कवि सुलतान म्हण त्याच वेव्हापुर ठिकाण। भानु हयवती सांगेल गुण। बाळा अवध्यामधीं अज्ञान। नागपुरीं पवाडा केला बसुन गायाला। चार साहेबजादे बसऊ ऐकायाला॥ शिपाइ०॥ १०

---

बाळेसर—बालासोर दरयाचे किनार—दर्याच्या किनाऱ्याला वर्षतो कहार—१ कहर—भयंकर प्रसंग, आपत्ती, २ कहर—मेघ समुदाय भयंकर पाऊस पडतो फिरंगी—इंग्रज राजाची—चिमणाराजाची 'चिमणाबापू हा निवळ लढाऊ वीर आहे तो फार धीट व शूर आहे मुधोजीचा भाऊ बिंबाजी यास पुत्र नसल्यामुळे त्याने चिमणाबापूसच आपला पुत्र म्हणून मानिले होते व आपले ठाणें जें रतनपूर तेथील कारभार आपले मागे चिमणाबापूनेच करावा असें बिंबाजीनें ठरविलें होते बिंबाजी मेल्यावर त्याचे बायकोनेहि हीच तजवीज मान्य केली मुधोजीची या गोष्टीस हरकत नाही परंतु रघुजीरावास धाक वाटतो कीं, चिमणाबापू रतनपूरचें राज्य बळकावून बसेल व तो शूर असल्यामुळे प्रबळ होऊन आपल्या राज्यासहि त्यापासून धोका होईल म्हणून तो मुधोजीस ही गोष्ट मान्य करू देत नाहीं' (नागपूर प्रांताचा इतिहास पृ २८५) 'ता १६ ८ १७८९ रोजीं नागपुरास खंडाजी ऊर्फ चिमणाबापू हा एकाएकीं निवर्तला त्यास पुत्रसंतता नव्हता चिमणाबापू हा शरीराने धिप्पाड असून त्या वेळीं त्याच्याइतका सशक्त मनुष्य क्वचितच असेल तो अत्यंत शूर व धाडसी होता चिमणाबापू हा सशक्त व ऐनपंचविशीच्या वयांत असल्यामुळे व आजारी नसताना एकदम मरण पावल्यामुळे रघूजीनें त्यास जादूनें मारिले असा लोकप्रवाद त्या वेळीं उठला होता" (नागपूर प्रांताचा इतिहास पृ २९५) साहेबजादा—उमराव

---

# नाना फडणविसांचा पोवाडा

हा पोवाडा रा. शं. ना. जोशी यांनी भा. इ. सं. मंडळाच्या तेविसाव्या वर्षाच्या चौथ्या अंकांत छापला आहे. तेथे ते लिहितात " हा पोवाडा ज्या वहींत आहे ती वही पुणे येथील एका शाईवाल्याजवळ सांपडली. पोवाडा अपुरा आहे. लिहिणारा अडाणी मराठा असावा असें लिखाणावरून वाटते."

## ऐतिहासिक माहिती

सवाई माधवराव वारल्यावर नाइलाजानें नानांनीं बाजीरावास गादीवर बसविण्याचें ठरविलें, व परशुरामभाऊस जुन्नरास पाठवून त्यास पुण्यास आणविलें. खडकीच्या मुक्कामीं नाना बाजीरावास भेटले.

*नानांनीं बाजीरावास वश करून पेशवाईवर बसविण्यांत यश मिळविलें हें शिंद्याला आवडलें नाहीं. शिंद्यांच्या मनांत स्वतः बाजीरावाची स्थापना करून* राज्यकारभार स्वतःच्या हातीं दाबावयाचा होता. व शिंदे हे सर्वांत वरिष्ठ फौजबंद सरदार म्हणून ते त्यास शक्यहि होतें. पण मध्यंतरीं शिंद्यांच्या घरांत कांहीं आकस्मिक गृहकलह उभा राहिला त्यामुळे त्यांना नानांच्या आधीं बाजीराव हाताखालीं घालतां आला नाहीं.

नानांनीं मात केल्यामुळे शिंदा रागावला व त्यानें नानांवर कुरघोडी करण्याचें ठरविलें. जुन्नरास असतांच बाजीरावानें शिंद्यांशीं गुप्त करार केला होता कीं, मला गादीवर बसविलेंत तर तुम्हांस सव्वा कोटी रुपये रोख व पचवीस लाखांची जहागीर देईन ! तो बाजीरावानें केलेला करार आता नानांनीं पुरा करून द्यावा असें त्यानें मागणें सुरूं केलें व आपल्या फौजेच्या बळावर तो नानांना कारभारांतून काढून काशीस पाठविण्याच्या यत्नांना करूं लागला. यामुळे नानांना साहजिकच भय उत्पन्न झालें व ते कारभारांत फारसें लक्ष न घालतां सावधपणें राहूं लागले, व दगा दिसतांच २१ मार्च १७९६ रोजीं ते अचानक पुणे सोडून पळून गेले.

दरम्यान परशुरामभाऊंना बाजीरावाचा हलकट व घातकी स्वभाव पुरा कळून चुकला. शिंद्याचा दिवाण बाळोबा तात्या पागनीस यालाहि बाजीराव आवडत नव्हताच. तेव्हा त्या दोघांनीं असें ठरविलें कीं, बाजीरावास कैद करावें, व त्याचा धाकटा भाऊ चिमाजी अप्पा याला

## पोवाड्याचें वैशिष्ट्य

हा पोवाडा समकालीन व पूर्णपणे विश्वसनीय असा आहे. काही काही समकालीन पोवाडे उपलब्ध कागद पत्राच्या पुराव्याने पूर्ण विश्वसनीय ठरतात इतकेच नव्हे तर उपलब्ध कागद पत्रातून न सापडणारी अशीही अधिक माहिती त्यांतून सापडते. उदाहरणार्थ याच पोवाड्यात शिंद्यानी व परशुराम भाऊनी नानाफडणविसाच्या पक्षपाती लोकाना कैद केले त्यांची फारच तपशीलवार नावनिशी दिली आहे तसा तपशील उपलब्ध कागद पत्रातूनहि सापडत नाही

पकडलेल्या लोकांची एकूण संख्या ५२ असं सांगून शाहिरानं याद दिली आहे ती अशी १ बाळोबा पागनीस, १ धोंडीबा, १ बाजिबा मोधी, १ बाजिबा मोधीचा पुत्र, ७ वगैरे असाम्या.

पुण्यात पकडले ते

| | |
|---|---|
| १ वासुदेव कोतवाल | १ बहिरो रघुनाथ |
| १ रमी कळवतीण | १ कोंडी कळवतीण |
| १ अन्याबा मेहेंदळे | १ चिंतोपत लिमये |
| १ शिवपंत मोडक | १ राघोपंत थत्ते |
| १ जयराम जोशी | १ जुगी राख जयरामपंताची |
| १ केसो शामजी | १ मान्या |
| १ बाळाजी विष्णु सहस्रबुद्धे | १ लक्ष्मी राख सहस्रबुद्ध्याची |
| १ माहादाजी काळे | १ विठ्ठलराव गोळे |
| १ रामचंद्र पराजपे | १ भिकाजीपंत |
| १ चिंतो मोरेश्वर शिवनेरवाला | १ बाची मोरेश्वर देवरुख्या |
| १ गणपतराव करमरकर | १ सदाशिवपंत थत्ते |
| १ सदाशिवपंत जोशी | १ पानसे    १ जनोबा सुभेदार |

(४) घाड्यातील चार नाईक

| | |
|---|---|
| १ श्रीपतराव पटवर्धन | १ आलमखान |
| १ सटवाजी लाड | १ येसाजी घाडगे |

पेशवाइ द्यावी आणि त्याचा कारभार नानाफडणिसासारखा परशुराम भाऊने करावा व शिंद्यानें त्याच साहाय्य कराव

याप्रमाणे मसलत ठरून त्यांनी थेऊरच्या तळ्यावर एक दिवस बाजीरावास कैद केलें व चिमाजी अप्पास जबरदस्तीनें पुण्यास नेऊन सवाई माधवरावाची बायको यशोदाबाइ हिच्या मांडीवर त्यास दत्तक दिलें। वास्तविक यशोदाबाई ही चिमाजी अप्पाची सून लागत होती, परतु जबरदस्तीने त्यांनीं तिला सासऱ्यास दत्तक घ्यावयास लाविले।।

मग नानाना पकडण्याकरिता फौजा पाठविल्या व राज्यात नानाचे पक्ष पाती मोठेमोठे लोक होते त्या सर्वांस पकडून कैद केले पण पुढे नाना महाडास जाऊन बदोबस्ताने राहिले होते, त्याना तेथून गुतपण इग्रज, निजाम व खुद्द बाजीराव व दौलतराव शिंदे याच्याशींहि सूत्र जोडून अखेर बाळोबा पागनीस व परशुरामभाऊ यानाच कैद करून सव फितूर मोडून काढला, व पुन्हा बाजीरावास गादीवर बसविण्यात यश मिळविलें केवळ एकाकी असता व कोठलाहि आधार राहिला नसता नानानी आपल्या बुद्धीबळावर जे प्रचड कारस्थान रचिल व सिद्धीस नेल ते महाडच कारस्थान म्हणून इतिहासात सुप्रसिद्ध आहे

या कारस्थानात नानाच्या बुद्धिसामर्थ्याची जी चमक दिसली त्याचे वर्णन पुढील पोवाड्यात तुलनात्मक रीतीने सुदर केलेले आहे अगदी तसेंच वर्णन प्रभाकर शाहीराने दुसऱ्या बाजीरावावरील "यशस्वी झाले श्रीमत पहिले सव लढायाला" या पोवाड्यातहि केले आहे तो म्हणतो—

"आपण ( परशुरामभाऊ ) बाळोबा होऊन एक केली खचित मसलत। चिमाप्पास धनी करुन राखिली जुनाट दौलत ॥ करारात दोघाच्या कांही किंचित झाली गफलत। म्हणून फिरुन नानानी उलटी मारून केलि गल्लत ॥ सूत्रधारी जो पुरुष तयाच्या गुणास जग भुलत। हातात सगळे दोर पतगा परि फौजा हालत ॥ (चाल) ॥ परशुराम रामचद्र आणि बाळोबास ठाउक रण। राज्यकारणी नव्हेत एक केसरी एक वारण ॥ कठीण गाठ नानाशी न चाले तथे जारण मारण ॥ (चाल) महाडास बसुनि नानानी बेत ठरविले ॥ बाळोबास शिंद्याकडून कैद करविले। शिवनेरी गडावर पटवधन धरविले॥" इ

# पोवाड्याचें वैशिष्ट्य

१ हा पोवाडा समकालीन व पूर्णपण विश्वसनीय असा आहे काह काही समकालीन पोवाडे उपलब्ध कागद पत्राच्या पुराव्यानेपूर्ण विश्वसनी ठरतात इतकेंच नव्हे तर उपलब्ध कागद पत्रातून न सापडणारी अशी अधिक माहिती त्यातून सापडते उदाहरणार्थ याच पोवाड्यांत शिंद्यानीं परशुराम भाऊनीं नानाफडणविसाच्या पक्षपाती लोकाना कैद केलें आहे फारच तपशीलवार नावनिशी दिली आहे तसा तपशील उपलब्ध काग पत्रातनहि सापडत नाही

पकडलेल्या लोकाची एकूण सख्या ५२ असं सागून शाहिरान याद दिला आहे ती अशी १ बाळोबा पागनीस, १ धोंडीबा, १ बाजिबा मोधी, १ बाजिबा मोधीचा पुत्र, ७ वगैरे असाम्या.

पुण्यात पकडले ते

| | |
|---|---|
| १ वासुदेव कोतवाल | १ बहिरो रघुनाथ |
| १ रमी कळवतीण | १ कोंडी कळवतीण |
| १ अन्याबा मेहेंदळे | १ चिंतोपत लिमये |
| १ शिवपत मोडक | १ राघोपत थत्ते |
| १ जयराम जोशी | १ जुगी राख जयरामपताची |
| १ केसो शामजी | १ मान्या |
| १ बाळाजी विष्णु सहस्रबुद्धे | १ लक्ष्मी राख सहस्रबुद्ध्याची |
| १ माहादाजी काळे | १ विठ्ठलराव गोळे |
| १ रामचद्र पराजपे | १ भिकाजीपत |
| १ चिंतो मोरेश्वर शिवनेरवाला | १ बाजी मोरेश्वर देवहऱ्या |
| १ गणपतराव करमरकर | १ सदाशिवपत थत्ते |
| १ सदाशिवपत जोशी | १ पानसे १ जनोबा मुमेदार |

( ४ ) घाड्यातील चार नाईक

| | |
|---|---|
| १ श्रीपतराव पटवर्धन | १ आलमखान |
| १ सटवाजी लाड | १ येसाजी पाडगे |

| | |
|---|---|
| १ हरी विष्णु सहस्रबुद्धे | १ विसाजीपंत वाडेदकर |
| १ आप्पाजी वल्लाळ सहस्रबुद्धे | |
| १ हरबाजी घायगुडे | १ हिरोजी पाटणकर |
| १ चाबाजी अभ्यकर | १ मोरो बापू |
| १ अन्याबा अभ्यकर | |
| २ हुजरे फडक्याचे | २ खिजमतगार |

या नांवांपैकीं बरींच नांवें नवीन आहेत व तीं सर्व विश्वसनीय वाटतात.

इतिहासदृष्ट्याही पोवाड्यातील सर्व हकीगत सुसंगत व पौर्वापर्य सभाळून सांगितलेली आहे हे पूर्वी दिलेल्या ऐतिहासिक माहितीवरून दिसून येईलच.

# नाना फडणविसांचा पोवाडा

## ७

भले नाना फडनीस केली कीर्त सवाई । चव मुलखी घास्त त्रीलोक जानती शाही ॥ धृ ॥ सपन्न सर्वगुनी ब्रहस्पति-प्रमान । कोमळ हृदई जैसे भोळे सीव जाने । पाहाता थोरपन मेरु दीस्तो लहान । आर्जुन कर्न त्या तुले पराक्रम जान । चेतुरता पाहाता विशेस गुन सुज्ञान । कुठवर कीर्त वरनावी तन्ही सुखान । आदभुत ज्ञान उपमा किती सुन द्यावी । प्रीथ्वीचे वजेन कीती म्हुन कोनी जोखावी । कीती खोल सप्त पाताळे सुन सांगावी । सभुच्या तपाची गनना कैसी करावी । आद सेक्षीचा जप किती म्हुन की वदावी । कीती वर्णू पराक्रम म्हु×स्तुत बोलावी । नाना फडनीसच प्रमान तुमची पदवी । सत्वधीर कीर्त हारींचेंद्रातुले जाली ठावी । थ्रीयाळ त्याहुनीया महिमा आधवी । आंतरी शांत कोमळ कठुरपन नाही । येसस्वी सदा कल्पना सर्वा ठावी ॥ १

नारायन आवतार सपले पाहा जेपासुन । तैपासून सांगतो व्रत ते घ्या आयेकुन । गरभी असता श्रीमत शेर्त (शत्रू) मर्दी (र्दू) न । चालविल राज नानानी हीमत धरून । कैवरी छेत्रू ठेविले

---

भले—भले शाबास या अर्थी. सवाई—विशेष. घास्त—दरारा. त्रीलोक जानती शाही—शाही म्हणजे राज्य किंवा सैन्य. राज्यांत व त्रैलोक्यांत नानांची दहशत महशूर आहे. प्रमान—प्रमाण बृहस्पतितुल्य. जाने—जाण असें पाहिजे. त्या तुले—त्या तुल्य. सुन—म्हणून. नाना फडनीसच प्रमान तुमची पदवी—तुमचीच उपमा तुम्हांस शोभेल. गगनगगनाकार सागरः सागरोपमः याप्रमाणे. हारींचेंद्रा तुले—हरिश्चंद्रा तुल्य. जाली ठावी—जगाला ठाऊक झाली. आधवी—अधिक. कठुरपना—कठोरपण. येशस्वी सदा कल्पना सर्वा ठावी—तुमची प्रत्येक कल्पना म्हणजे योजना किंवा मसलत दरवेळीं यशस्वी व्हावयाची हें ठरून गेलेलें अशी जगाची खात्रीच झाली आहे. जैपासुन—जेव्हांपासून, जेधवा. तैपासुन तेव्हांपासून, तेधवा. व्रत—वृत्त. शेर्तमर्दीनें—शर्तमर्दीनें. शौर्य-पराकाष्टेनें. हीमत—हिंमत. कैवरी छेत्रू ठेविले स्थापनाधन

आपनाधन करून। तीळतुले कोठे पड दिल्हे नाही नुन। धर्येवत नव खडात गाजती कीत। नादती रहीत ( राहात ) खुसवतु सहेर पुन्यात। बसल्या च ठाई प्रताप करुन आद्भुत। मागल हापसी फिरगी हैदऱ्या सहित। खडऱ्या देती ठेविले आनुन जबत। बसल्येच ठाइ बाछाव आले चालत। केला मुलुख काबाज सागरवलयाकित। येक्छेनी राज भगवा केली झेडा सेर्त। कुठवर वरनावी महिमा विष्णु भगत। श्रीमन्

---

करून—मूळपाठ ' वैक वैरी छेनु ठेविले आपनाधन करुन ' असा असावा अपना धन म्हणजे आपल्या स्वाधीन किंवा ताब्यात स्वाधीनबद्दल 'स्वाध्यान' असे अडाणी लोक पूर्वी बोलत व लेखीतहि तसा शब्द येत असे स्वबद्दल ' आपना ' वापरला आहे आपना + आध्यान–आपनाध्यान–आपनाधन तळितुले–तीळतुल्य नुन—न्यून धर्येवत—धैर्यवत कीत–कीत. रहीत—रइत–रयत–प्रजा शकरराव जोश्यानीं रहित हा शब्द ' राहात ' याबद्दल वापरला असें सुचविले आहे पण त चूक आहे खुसवतु—खुषवक्त पाहिजे खुषवक्त म्हणजे समाधानात हैदऱ्या—हैद या–हैदरअली त्या वेळचे मराठे हैदरचा 'हैदऱ्या' असा उल्लेख करीत उ "शिपाई रोहिले जाट गाठ न पडली हैदऱ्याची" ( बदामीचा पोवाडा ) जबत—जबेत–धाकात बसल्येच ठाई बाछाव आले चालत—तिसैन मया व अलफ ११९० अली गौर याचा नातू आपणास पादशायत व्हावी म्हणोन कलकत्यास गेला अलीकडे भागानगरास गेले तेथें सरबरा न झाली पुण्यास आले त्याजला श्रीमत स्वत पुढे जाऊन नजर करून भेटा झाल्या या प्रसगीं शिंदियाकडील पत्र अलीगौर यास गादीवर कायम केल म्हणून थाजवरून त्याजला गारदौंडास दरमहा खर्चास देऊन ठेविले ( भारतवर्ष पतप्रधान याची दुसरी शकावली पृ ८० )

राज—राज्य भगवा केली झेडा सेर्त—मुळात 'भगवा झडा केली सेर्त' असं असाव नाही तर झेडा स्त्रीलिंगी शब्द धरावा लागेल अद्याप तसा झेडा शब्द स्त्रीलिंगी आढळल्याचे स्मरत नाही ती हल्ला, तो जागा असे वाक्प्रचार मात्र दृष्टीस पडतात सेर्त म्हणजे दीर्घ पराक्रम विष्णुभगत—विष्णुभक्त नानाची विष्णुभक्ती प्रसिद्ध

रावसाहेबाची फिरवीली द्वाही। छेपन देशामध्ये म्हामुर पडली आ ( वा ) ई ॥ २

श्रीमत लाहानाचे थोर केले नानानी। सेवेसी सादर उभे कर जोडोनी। सद्भावे लक्ष लाउनी धन्याचे चेरनी। येकनीष्टेचे सेवा केली चित्तापासुनी। धरयेला नाही द्वैतभाव अंतकर्नी। चालविले राज पाहा नाव धन्याच करूनी। चोविस वर्षे नानांनी कारभार केला। नंतर माधव आवतार निजधामा गेला। कसे रा ( ज ) पुढे चालेल मुन विचार पडला। अनावे सवाई बाजीराव वे ( त ) ठरवीला। तव घडी रवाना केले परसरामभाउला। भंडारकीया भावुन दिल्ही श्रीमंताला। पुन्याशी आनीले बाजीरावसाहेबाला। खडुखडुचे मुकामी नाना गेले भेटीला। कुच दरकुच करून माधुन सिंदा आला। ममलद केली नानानी मग ते समई। आज्ञा घेऊन सातार्‍यास गेले लवलाही ॥ ३

नाना कावा करून गेले महाडाला। बरे पाहु कोन चालवील या राज्याला। नानाचे मागे मतांत कैसा जाला। सांगेतो स्वत चेतुर आना च्यानाला। बाळोबा पागनीस भाउसंग मिळाला॥ मसलत करून राजाचा फितवा केला। जरीपटका माग लागले बाबा फडक्यासी। परचुन्यापधुन घेतली हीरुन मकलसी। नानाचे लोक होते लचे। तरती केली त्यासी।

---

आहे. बेलबाग नानांनी स्थापली. 'नानानी बेलबाग बांधुनी स्थापियले लक्ष्मीकांत' ( मनोहरकृत पोवाडा ). म्हामुर—महाशूर, महशूर, प्रसिद्ध. पडली आ ( वा ) ई—आवाई झाली म्हणजे लौकीक झाला. नांव धन्याच करुनी—धन्याच्या नांवाने कारभार हाकला. तव घडी—तद्‌घडी, त्याच वेळीं. भंडारकीया—शपथ, बेलभंडार. खडुखडुचे—खडकीचे पाहिजे. बरे पाहु कोन चालवील या राज्याला—नाना म्हणाले ठीक आहे तुम्ही आतां कारभार कसा करतां तेच पाहातो. स्वत चेतुर—स्वत हा शब्द मुळांत स्वस्थ म्ह. स्वस्थपणें असा असावा. हे चतुर श्रोत्यानो स्वस्थपणे लक्ष देऊन ऐका. राजाचा फितवा केला—राज्याचा फितवा केला म्हणजे राज्यांत फितूर उत्पन्न केला. हीरून घेतली मकलसी—सरकारी पत्रावर मखलाशी करण्याचा नारोपंत चक्रदेवाचा अधिकार काढून घेतला. सरकारी पत्र किंवा कागद तयार झाल्या-

जुने कारभारी होते केले दुर साऱ्या (सी)। स्व आगे करु लागले भाग्य चवकसी। पुढे आसता आवलंबीले थोर कार्यासी। याचे न व दा न व जाचे सेवटासी। व्याघ्राची सर काये येती जंबुकासी। पंडीताची सर काये न ये मुरखासी। न कळे मुढासी पुढे होईल कैसं काई। आपलेच ठकानी वसले होवून बाछआई॥ ४

सीद्याचे भेटीला बाजीराव धनी गेले। मग मागे बाराभाईनी कैसे केले।

---

नंतर किंवा हिशेबाचा तक्ता तयार झाल्यानंतर जो मान्यतादर्शक शेरा होत असे त्याला मसलाशी असा शब्द असे. "राजश्री बाबा फडके, 'देवावे' करीत होते त्यांणी, 'देवावे' करूं नये, हुजुरातेच्या फौजेचा कारभार अगदी करूं नये. तैनांत घेऊन घरीं स्वस्थ बसावे. नारोपंत चक्रदेव यांनी कांहीं मसलाशी करूं नये हे बोलणे पडले असे, हेहि ऐकतो. येणे प्रमाणे शिर्यांची भारी झाली." ( ऐ. ले. सं.भाग ९ पृ. ४९६९. ) नानाचे लोक होत लबे तस्ती केली त्यासी—होत लबे ही मोडी वाचनाची चूक आहे. मुळांत बेतलेब म्हणजेच बेतलब असा शब्द असावा. 'नानाचे लोक बेतलब तस्ती केली त्यासी'–नानाच्या पक्षाचे जे लोक होते त्यास तस्ती लाऊन त्यांस बेतलब केले म्हणजे सर्वस्व हरण केलें. कांहीं बाकी उरून दिली नाही. तलब म्हणजे वार्का. होते—हो! ते असे पाहिजे. साऱ्या—साऱ्यासी स्व आगें—स्व आंगे–जातीने, स्वतः चवकसी—कारभार, व्यवस्था. पुढ आसता—आसता–आस्था–आशा पुढच्या आशेवर कार्यावर कारस्थानावर लक्ष ठेऊन. थोर कार्यासी—थोर कार्य म्हणजे बाजीरावाला पदच्युत करून चिमाजी अप्पाला गादीवर बसविण्याचे कारस्थान. याचे न व दा न व जाचे–(?) ठकानी—ठिकाणी. बाछआई–बाच्छाई. बाच्छाय–बाछयासारखे नुसते सिंहासनावर बसल्यासारखे स्वस्थ बसले. कारभारावर किंवा इतरत्र फितुरीवर लक्ष ठेवावे ते ठेवले नाहीं. बादशाहा स्वस्थ बसावयाचा आणि कारभाऱ्याने सर्व उरकावयाचें ही कल्पना. बाराभाईनी—हा शब्द निंदात्मक वापरला आहे. ज्यांत कोणाचा कोणास मेळ नाहीं अशा कारभारी मंडळास हा लावतात.मूळ हा शब्द आनंदीबाईने सखारामबापू नाना इत्यादिकांच्या कारभारी मंडळासाठीं तुच्छतेने उपयोजिला होता.

बाबाकडे, जाऊ म्हून आपासी सांगितल । घालून पालखींत तद घडी पुन्यासी आणले । पाह्य करू नये ते विप्रीत कर्म केले । दोन्ही वर्षे जबरदस्तीने सरती बसविले । घरोघर करू लागले कारभारासी ॥ चवगर्दी बैसवील्या चौक्या सेहेर पुन्यासी ॥ ठेवीले कारकोन ठाई नाक्यासी ॥ झाडा घेती बाईहूनसे हेरुन आल्या-गेल्यासी ॥ फोडुन पाहाती कुलतमाम लाखोल्यासी । हे आल्पबुधीन आखेर पडतील फाx ॥ कसी होईल बरोबरी रवीची खद्योतासी । मोराची प्रीतिमा नये लाढोरासी ॥ च्यार दीवस मौजा केल्या होवुन सुक नासी । कुल कार-भारी भावुचे ठाईठाई । पुन्यात कारभार करती बाराभाई ॥ ५

पागनीस परसरामभावु सीद्यासहीत । कुल तमाम पाह्य नानावर फिरले होत । अच्यादु बुध नानाची न कळे आत । कळसूनी कावा केला बसुन माह्याडात । सीद्याला पत्र पाठवीले लेहुन गुप्त । का परबुधीन घालीता कलप स्नेह्यात ॥ पुर्वीचे वचन चितात

---

बाबाकडे—बाजीरावाला बाबासाहेब म्हणत तद घडी—तत्‌घडी—त्याच क्षणीं, लगेच, लगोलग. करू नये ते विप्रीत कर्म केलें—विप्रीत. विपरीत सुनेच्या मांडीवर सासरा दत्तक दिला हे! चिमाजी अप्पाला सवाई माधवरावाच्या बायकोच्या मांडीवर दत्तक दिला. चवगर्दी—चवगर्दा-चौफेर ठायी—ठायीं-ठायीं बाहीहूनसे हेरुन आल्यागेल्यासी—बाहेरून सेहेरून आल्यागेल्यासी असा मूळ पाठ असावा. सेहेरून-शहरांतून. पुणे शहरातून. शहराबाहेर चौक्या बसविल्या व बाहेरून आत येणारे आणि शहरातून बाहेर जाणारे अशाचा झाडा घेऊं लागले. कुल तमाम—झाडून सर्व. का—मूळपाठ फार्सी—फाशात असा पाहिजे. प्रीतीमा—प्रतिमा सर. च्यार दिवस मौजा केल्या होवुन सुकनासी—'बेमुनसफानिशीं' या शब्दाचें अडाणी लेखकाने किंवा गोंधळ्यानें 'होवुन सुकनासी' असे रूप बनविलें. बे मुनासफ् म्ह. गैर-कायदा, अन्यायाचे. चार दिवस बेकायदा वाटेल तसें वागून कारभारीपणाचें सुख भोगलें नानावर फिरले होत—नानाशीं बिघडले होते. परबुद्धीनें—दुसऱ्याच्या शिकवणीनें. कलप—कल्प, विक्षेप, विघाड. दुसऱ्याच्या शिकवणीनें तुमच्या आमच्या चालत आलेल्या एकींत कां विघाड करतां ! पूर्वीचे वचन—महादजी नाना यांच्या आणा शपथा होऊन एक-

करावे स्मरन । तुमचा आमचा येकलास पहील्यापसुन । मातले फीतोनी यासी बधन ॥ समजले देवलतराव पन आसे पाहुन । तदघडी बाळोबा पागनीसाला धरुन । ठेवले आटकत त्याहासी जसी करुन । तैसच आर्पेन धोंडीबाला करून । वाजीबा मोघी पुत्रासहीत जान । वगैरे सात आसाम्या थोर लाहान । पुन्यातील धरले किती ईचे सीवाई । रागतो नावनीसीच ऐकुन घ्या सर्वही ॥ ६

प्रथम वासुदेव कोतवाल केला जप्त । त्यामागे यकासरसे येकाला धरीत । प (व) हीरो रघुनाथ धरीला ऐका त्वरित । रमी कोडी दोघी कळवा घातीनी सहीत । आन्याबा मेदळे नीमये चीतोपत । सीवपत मोडके राघोपत थत्ते । जयराम जोसी जुगी राखी सहीत धरला । केसो शामजी भान्या चेतुरभुज केला । आनीक बाळाजी वीष्णु सहस्रबुद्धयाला । त्याची राख लक्ष्मी ठेविली कैयदला ॥ माह्यादाजी काळे विठ्ठलराव गोळयाला । रामचेद्र पराजपे भिकाजीपंत आटकवला । मग धरला चींतो मोरेश्वर सीवनेरचाला । वाजी मोरेस्वर देवरुख्या पळून गेला । गणपतराव करमरकर आना घ्यानाला । सदाशिव थत्ते सदाशिवपंत जोशी वहीला । पानशा तोफखान्याचा धरून ते समई । जनोबा सुभेदार दस्त केला लवलाही ॥ ७

श्रीपतराव पटवर्धन आल्मखान । सटवाजी लाड येसाजी घाडगे पुर्न ।

---

मेकांनी एकमेकांस अतर देऊ नये.फडणिसी नानाची आणि सरदारी शिंयाची असे समजून दोघांनी परस्परांस अकृत्रिम साहाय्य करावे असे ठरले होते. येकलास—येख्लास–मैत्री, स्नेह. मातले—माजले. फितोनी—फितोरी म्ह. फितुरी असे पाहिजे. फितुरी माजले आहेत त्याना बधन करावे म्हणजे त्यास कैद करावे. त्याहासी—त्यासी. आर्पेन—आकर्षण पाहिजे. त्याच रीतीने धोंडीबालाही आकर्षण केले म्हणजे कैद केले. वगैरे—इतर, किरकोळ. ईचे सीवाई—याच्याशिवाय. नावानिसीच—यादीच. यकासरसे—एका पाठोपाठ. नीमये—लिमये. जुगीराखी सहित—त्याच्या ठेवलेल्या जुगी नावाच्या राखेसहित. कैयदला—कैदेत. वहीला—वायला निराळा,आणिक. आल्मखान—आलमखान. पूर्न–पूर्ण. आभ्याआकर—अभ्यकर.

बाब्यातील चार नाईक घ्या ऐकुन । हरी विष्णु सहस्रबुधे, पाहा निरखून । वीसाजीपंत वाडदेकराला धरून । आबाजी बलाळ सहस्रबुधे जान । हारबाजी घायगुडे हीरोजी पाटणकर मोरो बापु बाबाजी । आभ्याआकर । अन्याचा आभ्याकर आनीक दोन हुजरे । निसबत फडस्याची दोन खास (म) तगार । धरील्या आसाम्या बावन यकतर । आनीक लहान थोराचा नाही सुमार । जे ना (ना) कडे गेले ते ऐका सरदार । मानाजी फाकडे मल्हारराव पोवार । नीलकंठराव दीनकरपंत भडभडे चेतुर । बळवतराव गोडबोले समजुन हृदई । गोपाळराव राजपागे असाम्या साही ॥ ८

राहिला थोडा मजकूर कथा मागली । .



---

मोडी लिपीत अभयकर असेही रूप लिहीत असत. निसबत—पदरचे किंवा तर्फेचे रमी कोंडी दोघी कळवातिणी सहित—पुणें नगर संशोधन वृत्त खंड २ रा. यांतील ८७ नंबरचा लेखांक इंग्रजी आमदानी सुरु झाल्या बरोबर केलेल्या पुणे शहरातील पेठाच्या पट्याच्या उगवणी बाबत आहे त्यांत पुणे शहरात कोणाकोणास सरकार नोकर म्हणून किंवा वशिल्याचे म्हणून घरपट्टी माफ होती त्याचा याद आहे. त्यात रमी कोंडीचा उल्लेख आहे तो असा "तीन (घरें) कलवतीण रमी कोंडीची आहेत बहिरोजीत मेहन्दळ याजपासी चाकरीस होती सबब तिची घरे पेठ वसाहती-पासून माफ" परतु या नोंदीत रमी कोंडी हे एकाच स्त्रीचे नाव असें म्हटले आहे पण पोवाड्यात "रमी कोंडी दोघी कळवातीणीसहित" असे स्पष्ट म्हटले आहे.

# अकीवाटच्या वेढ्याचा पोवाडा

## ऐतिहासिक माहिती

या पोवाड्याच्या तीन प्रता रा शितूत यास मिळाल्या होत्या पण त्यापैकी वाळवे येथील जीवाप्पा मुदाळे याजकडून मिळालेली प्रतच शितूतानी ग्राह्य ठरवून तीच छापली

करवीरकरानी स १७७८ च्या एप्रिल अखेरीस महादजी शिंद्याशीं जो तह केला, त्या तहातल्या शर्ती शिंद्यानी करवीरकराकडून जबरदस्तीने कबूल करविल्या होत्या त्यामुळे त्या पाळण्याच त्याच्या मनात मुळीच नव्हत. अर्थात तह होऊन दोन महिने लोटले नाहात तोच करवीरकरानी पुन धामधुम सुरू केली शिंदे व पटवधन वगैरे सरदार किंबहुना सारे पुण दरबार या वेळीं मोरोबादादाच खूळ मोडण्यात गुतले असल्यामुळे आपणास तूत प्रतिबध करणारे कोणी नाही हे करवीरकरास पूण माहीत होत त्यानीं सलवत करायाच्या मिषाने बावडेकर अमात्य व त्याचे कारभारी, विशाळगडकर प्रतिनिधी आपाजी शामजी, बाबूराव गडनीस, राघोबा पाथऱ्या, सौंदत्तीकर गोसावी वगैरे अकरा आसामी बोलावून आणून विश्वासघाताने कैद केले शिंद्याशीं केलेल्या तहात अकरा लक्ष रुपये द्यावयाच कलम होते त्या रकमेस शिंद्यानी अमात्य व प्रतिनिधी वगैरे असामा उगवणीदार घेतले होते अस दिसत कारण कीं या अकरा मडळीस करवीरकरानी कैद करून तीन दिवस उपाशी कोडून ठेवल्यावर चवथे दिवशीं प्रतिनिधी व अमात्य यास मात्र सोडून दिल पण सोडताना शिंद्यास देऊ केलेल्या खडणापैकीं पाच लक्ष रुपये पोच त्याची पावती त्याजपासून लिहून घेतली! बाकी बावडेकराच्या कारभाऱ्या सुद्धा नऊ असामी अटकेत राहिले त्याजपासून निघेल तो पैसा उकळण्याचा उद्योग चालूच होता आपाजा शामजीच्या ताब्यात ठाणी होतीं त्यांच्या सोडचिठ्ठया लिहून देण्याविषयी त्यास सक्तीचा तगादा लाविला, तेव्हा त्यान त्या लिहून दिल्या त्याप्रमाण वडगाव व आणखी एकाद दुसर ठाण स्वाधीन झाल परतु कागनोळा, निपाणा व चिकोडी येथील ठाणेदारांनीं या चिट्या मान्य करण्याच साफ नाकारल त्यावरून महाराजानीं आपाजी शामजीवर *क्रुद्ध होऊन त्याचे डोळ काढविले शिंद्याशीं केलेल्या तहात चिकोडी व* मनोळी हे दोन्हा तालुके पेशव्यास देऊन टाकल्याचं व कागलकर घाटग्या

कडे कागलचें ठाण कायमचे ठेवण्याबद्दलचे कलम लिहिलेले आहे; परतु आता चिकोडी मनोळी व कागल जबरदस्तीने घ्यावयाची मसलत करवीर दरबारांत ठरली. त्याप्रमाणे चिकोडी घेण्याकरिता सात आठशें स्वार व दोन हजार पायदळ इतक्या सरजामानिशी सटवोजी भोसल्याची स्वारी निघाली. ता १८ रोजी राणी दुर्गाबाई मरण पावली. तथापि तिच्या मत्यु-मुळे वर सागितलेल्या मसलतींत काही फेरफार झाला नाही. इकडे अप्पाजी शामजीचे बधु विरुपाक्ष शामजी व अताजी शामजी यानींहि करवीरकराशीं टक्कर देण्यास कमर बाधिली. त्यांच्या कुमकेस पुणें दरबारकडून बचाजी विश्वनाथ खाडेकर याजबरोबर थोडीशी फौंज आली. मागून व्यकटराव घोरपडे इचलकरजीकर याची याच कामा वर नेमणूक झाली. नोवेंबर महिन्यात महाराज व येसाजी शिंदे कागलास वेढा देऊन बसले तो चिकोडीकरानी येऊन घाडग्यांची कुमक केला व महाराजास वेढा उठविणे भाग पडल. सटवोजी भोसला येळगुडच्या ठाण्यास वेढा देऊन बसला होता त्यावरहि चिकोडीकरानी छापा घालून त्यास लुटून पिटाळून लाविले चिकोडीकरांची याप्रमाणे सरशी झाली तरा पुढच्याच महिन्यात महाराज व येसाजी शिंदे यानी पुन कागलवर चाल केली यावेळीं घाडग्यानी मर्दुमकाने लढून महाराजांचे एकामागून एक तीनि हल्ले परतविले परतु वेळेवर कोणाकडून कुमक न पोचल्यामुळ शेवटीं त्यास कागलचें ठाणे महाराजांच्या हवालीं करावे लागलें येळगुडचे ठाणेहि शिंद्यानी सधी साधून घेऊन पाडून टाकलें पेशव्यांची बहुतेक फौंज इग्रज पुण्यावर चालून येत होते त्याशीं लढण्यात गुतली होती. काही सुरापुरच्या मोहिमेवर परशुरामभाऊबरोबर होती याप्रमाणे त्यावेळीं रान मोकळे सापडल्यामुळे करवीरकरास चांगलेच फावलें, पण चिकोडीकरानी त्यास तात्पुरतें आटोक्यात ठेऊन त्याचा अधिक फैलाव होऊ दिला नाही. पुढे इग्रज व दादासाहेब पराजित होऊन इग्रज तळेगांवाहून मुबईस परतगेल्या-वर करवीरकराची धडपड अर्थातच कमी झाली चिकोडी, मनोळी तर त्याच्या हातीं लागलीं नाहीच, पण घाडगे प्रतिनिधी व अमात्य यांस उपद्रव दिल्याबद्दल व प्रातात धामधुम केल्याबद्दल पेशवे सरकारकडून तर्थी मिळ-ण्याच भय नवीन उत्पन्न झाल

हैदरअलीवर स्वारी करण्याकरिता उभयता कारभाऱ्यानी मोठी फौज घेऊन कर्नाटकात जावे अशा मसलत पुणें दरबारी बरेच दिवस घाटत होती त्याप्रमाणे इग्रजाशी चाल असलेली लढाइ सपल्यावर कर्नाटकचे स्वारीस निघावयाचे नाना फडर्णास व सखारामबापू यानी कबूलहि केल होते तस झाल असत तर त्या उभयतानी कर्नाटकात जाता जाता करवीरकराचें पारिपत्य सहजासहजी केल असते, परतु सखाराम बापूस शिंदे व नाना यानी कैद केल्यामुळे मोहिमेचा बेत तितकाच राहिला, आणि परशुरामभाऊ सुरापूरचे मोहिमेवर गुतले होते त्यास नाना फडणीस यानी लिहिल की, सुरापूरच्या खडणीचा उलगडा झाल्यावर तुम्ही करवीरकर महाराज व कित्तूरकर देसाई याच्या ताउक्यात जाऊन त्या उभयताचा बदोबस्त करावा त्याप्रमाणे आता परशुरामभाऊ करवीरकरांच्या दग्याचा बदोबस्त करण्यासाठी त्याच्या कटकोळ महालात येऊन पोंचल त्या महालात भाऊचे लष्कर येताच लक्ष्मणराव शिंदे तोगलकर यानी खडणाचा जाबसाल सामोपचारान सपविण्याची खटपट राजाबा पानसे याच्या नियमानें केली, परतु ती सिद्धीस गेली नाही भाऊनी बन्नूर व कटकोळ या गावास जरब देऊन त्यापासून अनुक्रम तीस व दहा हजार रुपये खडणी घेतली व दोन्ही गावात आपली ठाणीं घातली नतर तोगेलकरापासून थोडाबहुत खडणी घेऊन ते मनोळी तालुक्यातील सती गिरें वगैरे ठाण्यावरून गोकाककडे आले

इतके होई तों जून महिन्यास सुरवात झाली त्यामुळ आठ पधरा दिवसात मोहिमेच काम बद ठेवण प्राप्त झाले तितक्या अवकाशात साधेल अशी मसलत भाऊस पत्करावयाची होती गोकाकचे ठाणें कित्तूरकर बळकावून बसला होता, व त्या ठाण्याच्या आसऱ्याने राहून तेरदाळ परगण्यास उपद्रव देत होता याकरितां त्यापासून गोकाकच ठाण घ्याव ही एक मसलत होती दुसरी मसलत करवीरकराची अकीवाट व शिरोळ हीं ठाणीं काबीज करण्याची होती पहिलीपेक्षा दुसरी मसलत परशुरामभाऊस फारच अगत्याची होती अकीवाटकराचा कुरुदवाडास व शिरोळकराचा मिरजेस फारच उपद्रवकारक शेजार झाला होता अकीवाटपेक्षा शिराळचें ठाणें फार बळकट असल्यामुळ स यदांच्या मोहिमत घ्याव अस दोन महिने भाऊच्या

मनांत घोळत होते. त्याकामापुरती एकहाती मुबलक फौज व चांगल्या थोर तोफा यदा त्यांच्या स्वारींत होत्या. पचवीस तीस खडी दारु, पांच सात थोर तोफा व शेपन्नास कामाठी व गोलदाज गुप्तपणें तयार ठेवण्याविषयी त्यांनी मिरजेस गगाधरराव यांस लिहून तितकी तयारी करविली होती. पण आतां अखेरचे दिवस आल्यामुळे शिरोळचे ठाणे घेण्याची मसलत झेपणार नाहीसे समजून भाऊनी अकीवाटास वेढा घातला

तेंहि ठाणें फार मजबूत असून आत शिबंदीचे लोक निवडक व भरपूर होते. त्यांनी तें ठाणें तीन आठवडे फारच शिताफीनें झुजविलें. भाऊनी मोर्चेबंदी करून तोफाच्या मारागिरीनें तटाच्या भिंतीस खिंडारे पाडून हल्ला केला तेंव्हा आंतले लोक जिवावर उदार होऊन मोठ्या आवेशानें लढले. त्यांनी कौल मागितला नाही व बाहेरच्या लोकांनीं दिला नाही. आंतल्यापैकीं शेवटला शिपाई मारला जाईपर्यंत उभयपक्षीं हत्यार थांबलें नाही. त्यामुळे हे ठाणे काबीज होईपर्यंत भाऊची हानी फार झाली. नुसत्या हल्ल्यातच त्याचे नामीनामी दोनतीनशें माणूस ठार पडले आणि तलवारीच्या व दगडाच्या जखमा लागलेल्यांची सख्या सातशेंपासून आठशें पर्यंत होती. गोविंद हरीचे चुलत बधु अप्पाजीपत पटवर्धन याच्या घराण्यातील बळवतराव दीक्षित यांस उजवे हाताचे कोपरास भाल्याची जखम झाली. (खरे ३०५६)

(२) शालिवाहन शके १७०० राज्याभिषेक शक १०५ साली (सन १७७७) महादजी शिंदे गेल्यावर परशराम रामचद्र पटवर्धन यांनीं फौज घेऊन महाराज सरकारच्या अकीवाट ठाण्यास वेढा घातला. ठाण्यांत जे सनदी वगैरे लोक होते, त्यांत दोघे भाऊ मोठे शूर शिपाई होते. ते मोठ्या धैर्यानें व पराकाष्ठेनें लढले. त्यांनीं पटवर्धन याची फौज जेरीस आणली व ठाण्यात शिरकाव होऊ दिला नाहीं. परतु आतील लोकांस करवीराहून कुमक येईना. ठाण्यांत दाण्याचा तोटा पडला, आणि इतक्यात दोघां शूर भावापैकीं एक अकस्मात् गोळी लागून पडला दुसरा मोठ्या पराकाष्ठेने लढला. परतु त्यासहि गोळी लागून तो पडला तेंव्हां पटवर्धनांनी ठाणे जबरीने ताब्यांत घेतलें.

(कोल्हापूर व कर्नाटक प्रांतातील राज्यें व संस्थानें यांचा इतिहास ले. वा. प्र. मोडक)

---

# अकीवाटच्या वेढ्याचा पोवाडा

## ८

## ( शाहीर—मानसिंग भोवाना रजपूत )

सोमवाराचे दिवशीं निघाले परशरामभाऊ ॥ अकीवाटावर हल्ला नेमिली सैन चला जाऊ ॥धृ ॥

मिळूनिया उमराव अवघ्यांनी मनसोबा केला ॥ जासूदाच्या जोड्या पत्र पाठविले मिरजेला ॥ सवाइ माधवराव नाना फडणीस बोलला ॥ मिळवा सारी शाही आज्ञा केली भाऊला ॥ राजासगे रारा दावा लावला ॥ मुलखाची वसाडी दिवा लागेनासा जाहला ॥ महाराजांची दया आम्हावर परसन शाहू॥१

भोवानराव भगवत दोघे बधू अष्टप्रधान ॥ हरीपत फडक्यांचें त्याजवरी लिहिलें सैन ॥ बावड्याची बदोबस्ती खबर ऐकून ॥ करवीराला वेटा घातला माहादजी शिंद्याने ॥ खासा सेनापती सखाराम पाठविला त्याने ॥ पेंढाऱ्याच्या धुमा अवघें लोटले सैन ॥ कुलक्षेत्राची जागा अवघे देव चला उठवू ॥ २

सवाइ माधवराव जन्मले खानदान । गोकाकच्या नदीवर जाऊ दे सैन । मनोळीची बारी लुटली सब्धा रावतांने । सिरोट्टीला वेढा हाद्ऱ्या आला राव चालून ॥ सामानगडची खडणी घेतली रगाडल सैन ॥ आदी घेऊन आकीवाट मग काय शिरोळास जाऊ ॥ ३

अष्टकारकून अष्टउमराव उभा देवडीला ॥ चिटणीस फडणास पोतनीस विचार त्यांनी केला । बारा हजार घोडा त्यामधि खासा निवडीला ॥ जरि

---

हल्ला नेमिली—हल्ला शब्द मुळात स्त्रीलिंगी आहे सैन—सैन्य शाही—सैन्य राजा सगे—कोल्हापूरकर छत्रपतीशी मुलखाची वसाडी—परशुरामभाऊच्या सैन्याने कोल्हापुरकराचा मुलूख जाळून पोळून ओसाड करून टाकला भोवानराव भगवत दोघे बधु अष्टप्रधान—भवानराव व भगवतराव प्रतिनिधी अष्टप्रधाना पैकी त्यावरी लिहिले सैन—हरिपत फडक्याचे पथक त्याजकडे चाकरीस दिले ( १ ) पेंढाऱ्याच्या धुमा—पेंढाऱ्याच्या धाडी हाद्ऱ्या—हैदऱ्या हैदरअलीचा उल्लेख तत्काळीन कागदपत्रात व

पटका चौघडा नौबत वाजे विशीला ॥ गारद्याचा बाजा रोहिल्याचा चालला ॥ सिदरायाचा माळ सगळा जागा नेमिल करुनिया मतलब मोर्चे दिले राव गोवाला ॥ सिदरायाने कौल. आहे प्रसन्न तुजला । आज पधरावे रोजी किल्ला येईल हाताला । नका अनमान किल्ला घटकेमाधिं घेऊं ॥

आर्कीवाटाला वेढा गाव लढविला शरतीन । तेथे मोर्चे दिले । किल्यामधि बधू दोघेजण । लिहूनियां कागदपत्र पाठविले ... । वेगी सोडा किल्ला तुम्हांला देतो जीवदान । म्हणे आपाजीपंत सल्ला करावा जलदीन । विचार नाही बरा जी अवघे सरले सामान । सुभेदाराची कुमक कोठे दिसत नाहीं आजून । मायापा बाळापा त्यानी आणले बलावून ॥ म्हणे बच्याजीपंत तुम्ही भीम अर्जुन ॥ महाराजांचे अन्न खाल्लं भोंदून ॥ इतकें वचन आईकतो धांवले समशेर उपसून ॥ आम्ही यातीचे लव्हार दोघे झुजु शरतीन ॥ वकत पडल्यावर अवघे मरून खरे होऊं ॥ पर किल्ला ना देऊं ॥ ५

आईतवाराचे दिशीं ताकीद होती सैनेला ॥ सोमवाराचे दिवशीं तमाने हल्ला नेमीला ॥ पहिले प्रहररात्रा हल्ला तिनदां मोडला ॥ बरकदासाचे

---

प्रचारांत हैदऱ्या असा पुष्कळ वेळा करीत असत. गारद्याचा बाजा भार रोहिल्याचा चालला—पुढे बंड वाजवीत गाडदी चालले व मागून रोहिल्यांचा जमाव निघाला युरोपियन पद्धतीनें कवाईत शिकलेल्या गारद्यांच्या पथकांत बँड असे. शरतीन—शौर्याने. वेगी—तात्बडतोब, जलदीने. आपाजीपंत—किल्ल्यांतील कोल्हापूरकरांचा कोणी अधिकारी. मायाप्पा बाळाप्पा—वर येळाप्पा जेठाप्पा अशीं नावें दिलीं आहेत. मग खरी नावें कोणती? सुभेदार—यशवतराव शिंदे सेनासाहेब सुभेदार. बच्याजीपंत—आप्पाजीपंत असे पाहिजे. महाराजांचे अन्न खाल्लें भोंदून—भोंदणे म्हणजे फसवणे. भावार्थ असा कीं, इतके दिवस कोल्हापूरकर छत्रपतींचें अन्न खालेत; पण आता किल्ला चांगला लढवीत नाही ही आपल्या धन्याशीं तुमची प्रतारणाच आहे. यातीचे—जातीचे. भावार्थ आम्ही जातीचे लोहार आहोत, धोतरे ब्राह्मण नव्हे मरून खरे होऊ पण किल्ला शत्रूचे हातीं देणार नाहीं. धर-

चढवून आला हणमता झोर ॥ बलभीमाचे नाव घेता लगी आहे समशेर ॥ समशेरीन लोक कापल अवघे लहान थोर ॥ अशुद्धाचे पाट चालिले वेशी बाहेर ॥ कौरव पाडव झुजले जाहला सव्हार ॥ जाळी मधि व्याघ्र काढून केला की हो जेर ॥ दोघे लव्हार ठार पडले हणमता झोर ॥ भले होते लव्हार त्यासी चला की हो पाहू ॥ ८

आर्कीवाट घेऊन भाऊ यशवत झाला ॥ चौघडा वाजवीत शहर पुण्याशी गेला ॥ सवाई माधवराव नाना फडणीस बोलला ॥ महाराजाचा कळस तुम्ही कैसा पाडिला ॥ नऊलाखाचा खच जाहला सारा पेशव्याला ॥ शिरोळ्या मधि ठाण फौजा गेल्या देशाला । करूनिया वस्त्र भाऊला परगणा दिला । येथून जाहला पोवाडा आइका सागेन तुम्हाला । धीनगीरी गोसावी शिव प्रसन त्याला ॥ म्हणे मानशिंग भोवाना रजपूत गानो सभेला ॥ किती गासी नागीशा आता किंमत तुझी पाहू ॥ आकावादावर हल्ला नेमिली सैन चला जाऊ ॥ ९



---

गंगाधर फडणीस इत्यादी—" गगाधरपत यास गोळी लागल्याचा मजकूर लिहिला तो कळला कुरुदवाडास गेले देहावसान झालें त्याने सहगमन सपादिलें हेंहि वर्तमान कळल मोठी वाईट गोष्ट जाहली. गगाधरपतासारखे मनुष्य होण नाही " वासुदेव सदाशिवाचे मिरजकर गगाधर गोविंदरावास पत्र [ खरे पान ३४८४ ] पाहिजार—प्रतिष्ठा गारु करू बरोबर—जमिनीबरोबर, जमीनदोस्त ययली रायली—वरची व खालची करूनिया वस्त्रें—वस्त्र देऊन

बार झडती गणता नाही त्याला ॥ दारू आणि गोळ्याने सूर्य झाकुळला ॥ भाल्याच्या माराला कोण घळसिना कवणाला ॥ दोन कोतवाल हत्ती नीट चालविला वेशीला ॥ विक्रमाची उज्जनी तिते रणखांब गाडला ॥ तीनशे साठ मुडदे तयानें कागद वाचिला ॥ आम्ही धाक माहाराठी फौज हिचा दर्प सकळाला ॥ श्रीमत महाराज पेशवा याला ताेंड कसें दावू ॥ ६

इतके वचन ऐकता भाऊला क्रोध फार येऊन ॥ रघुनाथ दादा जवळ घेतले बलावून । खेड्याखेड्यासी ताकीद शिड्या येवू दे जलदीन । खोरे आणि कुदळी बिगारी काढा सामान । लव्हार आणि सुतार अवघे मिळविले सैन । असे अठराहि कारखाने गोळ्या झडती खणाखण । कामाठे बेलदार लाविले मोर्चा कारण । गगाधर फडणीस गेला बिर्नी धरून । त्यासी लागल्या जखमा ठार पडला दिवाण । तेव्हा येल्यापा जेळ्यापा किल्यात बंधु दोघेजण । शिंग आणि हलग्याचा बाजा होतो कडाक्यान । चवरी अबदागिरी रुमाल काय उडती मौजेन। टकमका पाहती शाही झळकती रुप्याचे म्यान ॥ भला होता सरदार त्यासी चला कीहो पाहू ॥ ७

इतक वचन ऐकिता भाऊला ईर चढली फार ॥ चदी चदावर दिल्ली ओरगाबाद शाहर । उदड घेतले किल्ले काय या खेड्याचा पडीवार ॥ आकीवाटच्यासाठीं बुडाली कैकांची घर ॥ मारून चकाचूर गाव करु बरोबर ॥ चहू वेशीला च्यार शिड्या लावा लौकर ॥ आतल्यानी मारा केला आगीचा फार ॥ वहिल्या वेशीनें हल्ला चढली हर बोला सार ॥ खायले वेशीने लव्हार दोघे जाहले तयार ॥ ढाल पट्टा

---

कदास—बरकदाज—बंदुकवाले. भांडे—तोफ. दोन कोतवाल हत्ती इ.—दरवाजा फोडण्यासाठी तीनशे साठ मुडदे इत्यादी—आपले तीनशे साठ शिपाई या असल्या भिकार ठाण्याच्या हल्ल्यात पडले याचे भाऊसाहेबाना वैषम्य वाटले. आम्ही धाक—मूळ शब्द आबधाक असा असावा. आबधाक म्हणजे दहशत किंवा भीति भावार्थ ज्या माझ्या फौजेचा सकळाला दर्प वाटे ती माझी फौज आवधाकली, माझे तीनशे लोक मले. आता मी पेशव्यास तोंड कसें दाखवू असा भाऊसाहिवास त्वेष आला.

चढवून आला हणमता झोर ॥ बलभीमाचे नाच ,घेतां लगी आहे समशेर ॥ समशेरीनें लोक कापले अवघे लहान थोर ॥ अगुद्धाचे पाट चालिले वेशी बाहेर ॥ कौरव पाडव झुजले जाहला सव्हार ॥ जाळी मधि व्याघ्र फोडून गेला की हो जेर ॥ दोघे लव्हार ठार पडले हणमता झोर ॥ भले होते लव्हार त्यासी चला कीं हो पाहू ॥ ८

आर्कीवाट घेऊन भाऊ यशवत झाला ॥ चौघडा वाजवीत शहर पुण्याशी गेला ॥ सवाई माधवराव नाना फडणीस बोलला ॥ महाराजाचा कळस तुम्ही कैसा पाडिला ॥ नऊलाखाचा खर्च जाहला सांगी पेशव्याला ॥ शिरोळा मधि ठाणें फौजा गेल्या देशाला । करूनिया वस्त्रें भाऊला परगणा दिला । येथून जाहला पोवाडा आईका सागेन तुम्हाला । धोनगीरी गोसावी शिव प्रसन्न त्याला ॥ म्हणे मानसिंग भोवाना रजपूत गानो सभेला ॥ किती गासी नागीशा आता किंमत तुझी पाहू ॥ आर्कीवाटावर हल्ला नेमिली सैन चला जाऊ ॥ ९



---

गंगाधर फडणीस इत्यादी—" गगाधरपत यांस गोळी लागल्याचा मजकूर लिहिला तो कळला कुरुदवाडास गेले. देहावसान झाले. स्त्रीने सहगमन सपादिलें हेहि वर्तमान कळल मोठी वाईट गोष्ट जाहली. गगाधरपतासारखे मनुष्य होण नाही. " वासुदेव सदाशिवाचे मिरजकर गगाधर गोविंदरावास पत्र [ खरे पान २८०८ ]. पाडेवार—प्रतिष्ठा गांव करू बरोबर—जमिनीबरोबर, जमीनदोस्त वयली खायली—वरची व खालची करूनिया वस्त्रें—वस्त्रे देऊन

# महादजी शिंद्यांचा पोवाडा

## ९

### ( शाहीर काशीराम )

मानवी तनू अवतार धरुनी केली चौदेशीं सीमा ॥ माहाक्षेत्री जन्मले केवळ विषकठ प्रतिमा ॥ मारुनि आरते जेर जेर केले नसे कुणाची तमा ॥ मारवाड गुजराथ आटकवर रिपुशी आणिले दमा ॥ महाराज श्रीमताशी मान्य ॥ शिंदे माहादजी क्षेत्री जन्मले केला वंश धन्य ॥ धृ० ॥ १

हरिभजनी निशीदिनी ज्याचे गुर प्रतापीमहा ॥ हे वारण झुलती सदोदित प्रत्यक्ष नयनीं पाहा ॥ हुट अबीर जयाचा सर्वावरता शाहा ॥ हाल धराया कवण न दिसे करी पावन तृण दाहा ॥ साहेब पट्ट देईना न्यून ॥ २

---

मानवी तनू अवतार धरूनी—ईश्वर ज्याप्रमाणे मनुष्यदेह धारण करून अवतारकृत्य करतो त्याप्रमाणे जणू काही महादजीच्या रुपाने ईश्वरानें असामान्य कृती केली. महादजी अवतारी पुरुष होता. चौदेशीं—चारी दिशांस म्हणजे सर्वत्र. सीमा—मर्यादा. भावार्थ—दशदिशांत पराक्रम किंवा ख्याति गाजविली. सीमा करणे म्हणजे शर्थ करणे, पराक्रम करणे. हा शब्दप्रयोग ऐतिहासिक पत्रव्यवहारांत नेहमी आढळतो. क्षेत्री—क्षत्रिय. महाक्षेत्री म्हणजे क्षत्रियोत्तम किंवा वीरपुंगव. विषकंठ—Huge, Vast, disproportionataly large ( मोल्सवर्थ ) प्रतिमा—ठाणमान, शरीरयष्टि. महादजी शिंदे अगानें स्थूल, वर्णानें काळा, विष प्राशन केलेल्या शंकरासारखा मुद्रेनें उग्र होता. त्याला अनुलक्षून 'केवळ विषकठ प्रतिमा' असें शाहीरानें वर्णन केलें आहे केवळ म्हणजे मूर्तिमत. आरते—अरि ते असें पाहिजे. अरि—शत्रू. जेरजेर केले—मूळांत जर्जर केले असे असलें पाहिजे बाकी जेर करणे आणि जर्जर करणें दोहोंचा अर्थ एकच. तमा—भीति, पर्वा. दमा आणणें—दमास आणणे म्ह. दमविणे, निर्बल करणें. आटकवर—अटकेपर्यंत. हरिभजनि निशिदिनी—महादजी मोठा भगवद्भक्त होता व साधुसंताच्या मागे पुष्कळ वेळां असे. तो पायांत चाळ घालून केव्हा केव्हां भजनहि करी. त्यानें कांही भक्तिपर पदेंहि रचलेलीं आहेत.

दया शांती गुरुभक्तीचा अखंड आनंद ॥ दर्पे रिपु कोंपती स्थापिले बाच्छाइ पद ॥ दर्शन होता माहावीराचे उतरती मद ॥ दखण नवखंडात वाढली शूरत्वाची बीरद ॥ पूर्वी आचरले बहु पुण्य ॥ ३

---

हरिभजनि इत्यादि—या दुसऱ्या सबध चौकाचा अन्वयार्थ नीटसा लागत नाही वारण व हुट म्ह उट हे शब्द लक्षणेने महादजीच्या पराक्रमी सरदाराविषयीं असें समजावयाचें कीं काय ? पण पुढें अबीर म्ह हबीर शूर सरदार असा शब्द आलाच आहे "महादजी निशिदिनि हरिभजनि (निमग्न आहे) त्याचे महाप्रतापी शूर अबीर की जयाचा सर्वावर शह आहे, ते अबीर व महादजीच्या लष्करांतले झुलणारे वारण म्ह हत्ती व उंट प्रत्यक्षच नयनी म्ह डोळ्यांनी पहा" असा काहीतरी ओढून ताणून अर्थ बसवावा लागतो हाल धरामा—मूळांत हाल शब्द नसून बल असा असावा. मोडी वाचनाची चूक असावी असे वाटतें एखाद्याविरुद्ध बळ धरणें म्ह त्याला विरोध करणे महादजी विरुद्ध बळ धराया कवण न दिस म्ह महादजीला विरोध करील असा कोणीहि वरचढ समर्थ पुरुष दिसत नाही आणि जर कोणी विरोध केला तर महादजी, पावन म्हणजे अग्नि जसा तृणाचा दाह करून टाकतो म्ह गवत जाळून टाकतो त्याप्रमाणे त्याचा नाश करतो साहेब—साहेबा असं मूळात असावें मोडी लिपींत व व बा ही अक्षरें सारखींच दिसतात साहेबा म्ह पेशव्यास गुरुभक्तीचा अखंड आनंद—मन्सूरशहा या

जितद्रिंय बुद्धीवत उपमा साजेना दुजी ॥ जिकडे जाव तिकडे फत्ते मले मर्द गार्जी ॥ जिलींब चाले घनघोर सदा तत्पर स्वामीकाजी ॥ जितक्या तितक्या कळा प्रगटल्या दावी जगामाजी ॥ वीर पाहुनी होती मौन ॥ ४

सिंह प्रतापी आगळा तद्वत शिंद्याचे वशी ॥ सिंदे महादजी

---

असाही आहे व त्यावरूनच वादली निशाण म्हणजे जरीपटका म्हणून महादजीने नवखड पृथ्वीत मराठ्याचा जरीपटका फडकावला असाहि अर्थ घेता येइल बिरद–बिरीद या शब्दाचा अर्थ मोलस्वर्थ पुढीलप्रमाणे देतो A thread etc worn (around the arm etc) as a badge or token महादजीनें दक्षिणेत व नवखड पृथ्वींत आपल्या पराक्रमाच्या निशाण्या ठेवल्या, तथापि दहावे खड जें काशी तेथे मात्र त्याची निशाणी नाही पेशव्यानीं हिंदूचे पवित्र काशी क्षेत्र सोडविण्याविषयीं महादजीच्यामागे सतत भुगा लावला असताही त्याच्याकडून ते काम सिद्धीस गेले नाही या दृष्टीने शाहीर दक्षिण व नवखड पृथ्वी याचाच उल्लेख फक्त करतो ते योग्यच होय पण अर्थात् हा अभिप्राय मूळ शाहीराच्या मनात असणे शक्यच नाही. पूर्वी आचरिले बहुपुण्य—पूर्वजन्मीं पुण्य केल म्हणून या जन्मीं महादजीला अशी लोकोत्तर पराक्रमाची कृत्यें करता आली असा भावार्थ गाजी—विजयी, शूर जिलीव चाले घणघोर—जिलीव—परिवार, बरोबरचा सैन्याचा जमाव वगैरे घणघोर—अफाट, प्रचड जितुक्या तितुक्या कळा प्रकटल्या दावि जगामाजि—जो जो यात्रिक शोध नवा नवा सापडला त्याचा महादजीनें आपल्या लष्करासाठीं पूण उपयोग करून घेतला हें वर्णन महादजीच्या युरोपियन देखरेखीखालीं सुसज्ज झालेल्या तोफखान्या बद्दल व क्वायती दपूबद्दल आहे मौन—मौन होण म्हणजे चकित होऊन ताडातून शब्द न निघण

सिंहासन—वास्तविक बादशहाकडून सिंहासन मिळाल नव्हत महादजीस ज्या वस्ता वकील मुतलखीच्या मिळाल्या त्यात सिंहासन नव्हते फक्त ढाल तलवार कलमदान, हत्ती, नालकी रोगणाची, सोनेरी कामाची

माहिती मिळते तिला सारस्वतकार भाव्यांच्या माहितीची जोड देऊन ती थोडक्यांत पुढे मांडतो.—

गोविंदराव शाहीराचा आजा व बाप हे दोघेहि फार प्रख्यात होते. त्यांची चांगल्या विद्वानांत व बरदी पुरुषांत गणना होई. आजाचे नांव गणोजी व बापाचे नांव भिवाजी, आडनांव भागवत. गोविंदराव स्वतःला गोविंदराव साळी असे अनेक वेळा म्हणवितो. हा गोविंदराव जुन्नरचा राहणारा. "गोविंदराव साळी जुन्नरचा कवि तो भारी" किंवा "गोविंदराव करि शाहिरी। शेहर जुन्नरी गड शिवनेरी" किंवा "गोविंदराव कवि वस्ति शेहर जुन्नरी" असे अनेक स्पष्ट उल्लेख त्याने केलेले आहेत. तो तुरेवाला होता. त्याच्या शिष्यांची व फडकऱ्यांचीं नांवे शेल्याबा, मरहारी, बहिरू, बापू, राणु, देवजी, विठू, आबा, सतु, रामा, शिवराम भिमा, भवानी, राघु, यमाजी, गगाराम, रावजी, हरी, पांडु, राधा यांपैकीं हरी, पांडु, शिवराम वगैरे आदा करीत राधा कोकिळेसारखी गोड गाई व बाकीचे सर्व स्वतः कवने करणारे,

# महादजी शिंद्यांचा दुसरा पोवाडा

या पोवाड्याचा शाहीर मल्हारी नावाचा आहे पोवाड्याचे शेवटीं तो आपली माहिती अशा देतो " गोविंदराव गुरुराज धन्य होऊन गेले मोतीदाणा। सुर मर्दांचे गाति पवाडे शेहर जुनर ठिकाणा। बाळमती अज्ञान गातसे मल्हारी कवि राजवरा। बहेरू करतो रग सवाई चग वाजवी तन्हा तन्हा॥" या तुकावरून हा मल्हारी शाहीर जुन्नरच्या गोविंदराव साळी नामक अति सुप्रसिद्ध शाहीराचा शिष्य होता व बाहिरू नावाचा त्याचा एक साथीदार होता ही माहिती कळते

गोविंदरावी लावण्या पोवाड्याच एक अगदी जीर्ण हस्तलिखित बाड आमच्यापाशीं आहे त्यात शेदीडश लावण्या, गण व पोवाडे आहेत मात्र त्यातील लावण्या एकट्या गोविंदरावाच्याच नसून मल्हारी, राणू वगैरेंच्याही आहेत येवढी गोष्ट खरी कीं त्या सर्व गोविंदरावाच्या साप्रदायिकाच्या आहेत या अशा जुन्या बाडातून कर्त्यांची वगवारी केलेली कधींच नसते प्रत्येक लावणीचा शेवट वाचून आपणासच ती करावी लागते. पण तरी सुद्धा ती वगवारी वरोवरच होईल अशी आशा नको कारण हे शाहीर आपल्या कवनाच्या शेवटीं कर्त्यांचे, साथीदाराचे, नाच्याच, नायकिणीच, गुरूच अशीं अनेक नावे घालितात व शेकडा पाउणशें उदाहरणात नक्की कविता कुणाची हृ सांगतां येत नाहीं पुष्कळानी, प्रभाकराच्या लावण्या पोवाड्याचे छापलेले पुस्तक वाचल असेल त्यांतल्या काहीं कविता गगु हैवतीच्या, महादूच्या, गगाधराच्या वगैरे निरनिराळ्या लोकाच्या आहेत पण त्या सव प्रभाकराच्या म्हणूनच छापल्या गेल्या आहेत पण यापैकी सूक्ष्म परीक्षणाच्या अभावामुळें सपादकाकडे जेवढा दोष येतो तेवढा वगळ त्यास बाकी सर्व दोष शाहीराकडेच जातो आमच्या जवळ असलेल्या बाडाची हींच स्थिती आहे त्यातील सव कवन आम्ही बहुधा बारकाईने वाचलीं आहेत व त्यावरून आम्ही अस म्हणतो कीं, त्यात मुख्यत गोविंदराव साळी व त्याचा शिष्य मल्हारी यांचींच कवनें आहेत क्वचित राणू न्हाव्यासारख्यांचींही कांहीं आहेत

सदर वाडातील कवनाचे बऱ्याच बारकाईने परीक्षण करून त्यावरून गोविंदराव साळी व प्रस्तुत पोवाड्याचा कर्ता मल्हारी याच्याबद्दल जी

माहिती मिळते तिला सारस्वतकार माव्यांच्या माहितीची जोड देऊन ती येथक्यांत पुढे मांडतो.—

गोविंदराव शाहीराचा आजा व बाप हे दोघेहि फार प्रख्यात होते. त्यांची चांगल्या विद्वानांत व दरदी पुरुषांत गणना होई. आजाचे नांव गणोजी व बापाचे नांव भिवाजी, आडनांव भागवत. गोविंदराव स्वतःला गोविंदराव साळी असे अनेक वेळा म्हणवितो. हा गोविंदराव जुन्नरचा राहणारा. "गोविंदराव साळी जुन्नरचा कवि तो भारी" किंवा "गोविंदराव करि शाहिरी। शेहर जुन्नरी गड शिवनेरी" किंवा "गोविंदराव कवि वास्ति शेहर जुन्नरी" असे अनेक स्पष्ट उल्लेख त्याने केलेले आहेत. तो तुरेवाला होता. त्याच्या शिष्यांची व फडकऱ्यांची नांवे शेल्याबा, मल्हारी, बाहिरु, बापू, राणु, देवजी, विठू, आवा, संतु, रामा, शिवराम भिमा, भवानी, राघु, यमाजी, गगाराम, रावजी, हरी, पांडु, राधा यांपैकी हरी, पांडु, शिवराम वगैरे आदा करीत राधा कोकिळेसारखा गोड गाई व बाकीचे सर्व स्वतः कवने करणारे,

# महादजी शिंद्यांचा दुसरा पोवाडा

## १०

### ( शाहिर–मल्हारी )

सोडुन सारा राज्यपसारा निघून गेले शीवपुरा। पाटिल–बावा येवनिष्ट म्हणून किरत वाढली दिगातरा ॥ धृ ॥

रघुनाथाच पूर्ण प्रतापी भक्त जसा काय हनुमत। तसच श्रीमताचे सेवक पाटिलबावा म्हणवीत ॥ ज्या पुरुषानें हिंदुस्थानी जाऊन केले आदभूत। महाल मुलुख गडपहाड घेतला गड्या करुनिया दिकत ॥ रागडे न राठवडे

---

शीवपुरा—कैलासास किरत—कीत, कीत आदभूत—अतक्य पराक्रम, गडपहाड—डोंगरी किल्ले गड्या—गढया दिकत—मोडी वाचनाची चूक हिंमत अस असावे गवसुन आपल्यात—आपल्या ताब्यात घेऊन किंवा रहस्यांत घेऊन गोज—गोहद गोहदचा किल्ला घेण्यास महादाजीस तीन वर्षे लागली! आपाजी रामाचे नाना फडणिसास पत्र २६ २ १७८४ च "इकडील वतमान तरी राजश्री पाटील बावानी गोहेद भावत्या फौजच्या व पलटणाच्या चवक्या बसवन रस्त वद केला याजमुळे लढाइखेरीज राणा जेर जाहला नतर फाल्गुन शु॥ पचमीस किल्ला सोडून राणेखानभाई व बाळाजा अनत पागेनीस याचे विद्यमान येऊन भेटला श्रीमताचे पुण्यप्रतापेकरून ह यश राजश्री पाटीलबावास तीन वर्षे श्रम केल्याच इश्वर दिरह येणेकरून या प्रांती तमाम सस्थानिकांवर दवाव वसला"

राजरजवाडे गुंवसुन आपल्यात पानपताच्या पल्याड फवजा गेल्या अटकेपर्यंत ॥ गोजसारखा किल्ला घेतला उदंडिक साऱ्या मुलखात । गुलाम कादर बाच्छा मारून भोगित होता दवलत ॥ महाराजानें मूड घेतला धरून आणिला जीवन्त । पुरता बदलुन हुकूम केला सत्वर कीजे पारिपत ॥ तीरमार करुन मारिले निमकहरामी चाकरा । बाच्छा-

---

राण्यास कळले व अडीच शेर धान्य वगैरे गिरानी फारच जाली तेव्हा फाल्गुन शुद्ध चतुर्थीस गोहदवाल्याने बाहेराल कारभारी यासी भानगड भेटीची लावली कारभारी यानी पाटीलबाबास श्रुत केले पाटीलबाबाचा आग्रह कीं सुरुग उडवून गडी घ्यावी परंतु गोहदवाल्याने आग्रह फारच केला अशी घालमेल जाव सालाचें लागलीच होती तो शुद्ध पचमीस पन्नास स्वार व कांही पायदळ इतक्यानिशीं बाहेर येऊन भेटीस येतो म्हणून सांगून पाठविले यानीहि, कारभारी यानी पाटीलबाबास सांगून भेटीस आणिला भेटी जाल्या डावे बाजूस उतरावयास जागा दिली पर्वास कबिले बाहेर काढून ठाणे सध्याकाळीं सरकारचे जाणार श्रीमताच्या पुण्यप्रतापें करून किल्ला फत्ते जाला पाटीलबावास महत् यश आले' (महेश्वर दरबारचीं पत्रे इतिहाससंग्रह लेखांक १२५ पृ २४१-२४२.) बाच्छा मारून—बादशहाला गुलाम कादरानें अंधळा छळलें परंतु ठार मारिले नव्हते ९ सप्टेंबर १७८८ चे जोधपूरचें नानास सरकारी बातमीपत्र. त्यांतही "चवथे दिवशीं रोहिल्यास उरावर बसवून खंजिरानें पोट चिरिलें. मारला. याप्रमाणे सार्वभौमाची गत केली" असा मजकूर आहे मग शेकडो कोस दूर पुणें प्रांतात राहणाऱ्या अडाणी शाहीरानें 'बादशा मारून भोगीत होता जुनाट दौलत' असं म्हटले तर तें स्वाभाविकच आहे. (इतिहाससंग्रह पु. ६ अंक १–२–३) महाराजानें—महाराज ही महादजीची पदवी. कीजे—करावे. पारिपत—पारिपत्य.

तीरमार करून मारिले निमकहरामी चाकरा—५ मार्च १७८९ चें पत्र. दिल्लीहून नाना फडणिसास विठ्ठल हरी व गंगाजी आव्हाड या बातमीदारांचें. "इकडील मजकूर तरी गुलाम कादर याजला इतके दिवस ठेऊन द्रव्यांश पाहिला तो कांहीं साधला नाहीं. नंतर फाल्गुन शु. ४ स त्याचे

यजादे खुशाल झालि म्हणे मी फेडिन उपकारा ॥ बाच्छायजादी खुशाल झाली मेला गुलाम कादर । माझ्या पित्याचा सूड घेतला धन्य मराठा सर दार । रूमचे बाच्छास गेले फर्मान हे घेऊन हलकार । ऐकुनया खुशवत

---

पाच पाट काढून उटावर बसवून लष्करांत फिरविला. दुसरे दिवशी नासिक हीन केल मागती फिरविला तिसरे दिवशीं सव अग हीन करून डोळे काढून पादशहाकडे पाठविले व त्यास बाहीर काढन मारुन टाकिला " ( इ स दिल्ली येथील मराठ्याची राजकारण भाग १ पत्र ३७८ )

७ माच १७८९ चे गोविंदराव पुरुषोत्तम याचे नाना स्वामीस पत्र इ. स दि म रा भा १, पत्र न ३८०

" हल्लीं वतमान तरी गुलाम कादर याचे डोळे, नाक, कान काहाडून दिल्लीस पातशहाकडे राजश्री पाटील बावानी पाठवून दिलें व मशार नि ह्रेचे बद बद वेगळे करून जीवे मारिला "

गुलाम कादराशीं लढाइ, त्याचा मोड, पळ, धरपकड वगैरेसबधी अस्सल माहिती पत्र न ३७ पृ ३६६ Historical papers relating to Gwalior State Vol III पत्र न ८२-८३-८४ व मराठी दसर रुमाल ३ रा यात पहावीं

बाछ्याजादी खुशाल झाली—कोणती त नक्की लक्षांत येत नाहीं " बादशहाचे डोळे काढल्यावर गुलाम कादराने अदमासें १९ शहाजादे कैद करुन बरोबर नले. आधळ्या बादशहाजवळ फक्त एक बेगम मात्र सोडून गेला आहे " ( इतिहास सग्रह दिल्ली येथील मराठ्यांचीं राजकारण भाग १, पा २७२ ) त्यांच ही ब्रादशाहजादा काय? रूमचे बाच्छास गेले फर्मान—" शहाकडील वकील काबूल रहदारा हून राजश्री पाटीलबावाकडेस आला आहे त्याण वस्त्र बहुमान भारी मरातबाचा आणून दिल्हा आणि पुढ बोलणें सलूखाचे आहे कीं लाहोर पर्यंत श्रीमताचा अमल बसवावा आणि लाहोरापलीकडे अटकपर्यंत आमचा अमल असेल याप्रमाणे तहनामा श्रीमताचा व्हावा ज्यासमयीं श्रीमताचे सरकारात फौजेचे कुमकेस प्रयोजन पडेल ते समयीं आम्हास हुकूम करावा म्हणजे दोन चार दस्ते पाहिजेत तेव्हा पाठवून देत जाऊ अथवा

मानला मनास आणिला बीच्यार ॥ दस्तक वदुन शिरी फिरून बंदगी लेहिले हाजूर । दिधले ते श्रीमन्ता अर्पण मी हुकुमाचा चाकर ॥ शिंद्यांचा भावार्थ पाहुनी बाच्छा म्हणती फार बर । त्याचे नांवे दुसरा सरंजाम धाडला सत्वर ॥ बाच्छाची वजिरात तुम्ही कारभार आपला सर्व करा। म्हणउन बाच्छा तक्ति स्थापिला दुष्मन मोडुन केले चुरा ॥

युद्धीचे सागर करीती दिल्लीचा बदोबस्त । बान्छायाची दोही फिरली महाराजाची सलावत ॥ जयपुरवाला लढाई घेऊन तोहि आणिला कवलात । श्रीमन्ताचि कुमक गेली अलीबहादर राजगत ॥ सामोरे भेटाया आले सडी स्वारिची गणीत। लक्ष स्वार शिवाय पायदळ गज अवाऱ्या बहूत ॥ देशोदेशिचे राजे चाकर जिवबादादा सगात । राशाच्या अवाऱ्या दिडशे

---

आम्हांस इकडे मसलतीचे कामकाज पडेल ते समयीं आपण आमची कुमक करावी. स्वामी म्हणतील कीं दस्ता किती फौजेचा? त्यास १०००० स्वाराचा असतो. याप्रमाणे त्याची चाल आहे. व बोलणेंही खचित आहे. इतकी गोष्ट व्हावयाचें कारण तरी, गुलामकादराचे पारिपत्य कोणाऱ्याने जाहलें नव्हते आणि ती गोष्ट यांचे हातून जाहली! याजमुळे शाहाने खुसी बहुत मानिली. हल्लीं शहाकडील खिलत वकील घेऊन आला आहे." (Historical papers relating to Gwalior State vol III पत्र नं. ८६, पा. १३५, १३ मार्च १७८९ चे पत्र.)

हलकार—जासुद, हलकारा,हलकारा आणि हरकारा एकच. खुशवैत मानला—खुशवक्त मानला,समाधान झाले,आनंद झाला. दस्तक—परवाना,राजपत्र. बंदगी—सलाम,प्रणाम. हाजुर-हुजूर. दोही—द्वाही. सलावत—जोरा,अंमल, धाक, वचक,दरारा. कवलात आणणे—ताब्यात आणणे, पराभव करणे. राजगत—कुटुंबापैकीं, कुटुंबीयांपैकीं. खुद्द पेशव्याचा प्रतिनिधी म्हणून अलीबहादुरास सैन्य देऊन पाठविला. वास्तविक आलीबहादुराच्या लोकानींच गुलाम कादरास पकडला होता. अर्थात गुलामकादर प्रकरणानंतर अलीबहादुरास पाटिलबावाकडे पाठविले हा कालविपर्यास आहे. सकळिक—मूळ शब्द सकलित असा आहे. सकलित म्हणजे संक्षेपानें. गोसाव्यावरुनी पहले

निज कार्यावर लक्ष ठेविलें चालुन आले दखणेत। मोगलाच्या मुलखात। खडण्या घेऊन पाडली धाशत ॥ तुळजापुर करून लष्कर लाविले येवोनिया सरडथास। सत्वर गचि (!) कुचे केला भेट घ्यावया उद्युक्त ॥ आले पुण्यासी पुलापासी राहत राव जे समयेत। शेहरामध्ये आवइ पडलि होति घरोघरि खलबत ॥ नाना फडणिस श्रीमन्ताप येउन दावायेले वाढ्यांत। केलि तयारी फऊज सारी सडी स्वारी शोभीवन्त ॥ सुयेळ मुमोहोर्त पाह्यति जोतिसि ज्ञानीवन्त। परशराम आवतार वैसले अबारीमधे श्रीमन्त ॥ वाजे धवशा केला तमाशा पहाया मिळली समस्त। राव आले म्हणून आयेकुन पाटिल हात बाधुन मोहोरे येत ॥ पायउतारा होऊन स्वामिचे चरणी

---

दोघे बधू आपल्या धन्याच्या बाजूने पेशव्याशीं ल्टले. यांच्याच चकमकींत होळकरास जखमा लागल्या परतु पुढे याच उमरावगिरान विश्वासराव, तुकोजी शिंदे, सताजी वाघ व यशवतराव पवार या चौघाचे मुडदे तीन लक्ष रुपयास सोडवून घेऊन त्यास विधियुक्त सस्कार करविला. १७६२ सालीं झालेल्या वकसारच्या लढाईंत अनुपगिराने फार पराक्रम केला. १७६६ सालीं हे दोघे बधू पेशव्याविरुद्ध जाटाच्याबाजूने लढले. १७८१मध्ये दिल्लीचा मुख्य वजीर नजबखान यानें जयनगरावर स्वारी करून त्या प्राताचा बदोबस्त अनुपगिराकडे सोपविला. त्यानतर १७८४ सालीं त्याचे पोवाड्यांत वर्णन केल्याप्रमाणे महादजीशीं वितुष्ट आले. पण तो त्यातून वचला एवढेच नव्हे, तर अलीबहाद्दराचा कायमचा मित्र बनला. पुढे १८०४ सालीं अनुपगिरानें इग्रजाशीं तह केला व थोड्याच दिवसात तो मरण पावला. (गोसावी व त्यांचा सप्रदाय भाग १ पृ. २३६ ते २५५ ले गोस्वामी पृथ्वीगीर हरीगीर, ——.)

मस्तकी ठेवीले। मर्यादा पाहताच आवघे लोक जाहले विस्मीत ॥ निरथ भिमाने मिर्ज घातलि म्हणे स्वामि करुणा करा। पूर्व जन्मिचे सुकृत म्हणुनि पाय लाधले परमपरा ॥

माळ घातलि गळयात उचलुन मस्तक दिधल आलिंगन । पाटिल म्हणाति दर्शन होता विच्छा झाली परिपोर्ण ॥ नाना भेटुन लोक भेटले विडे वाटले मांजिन । तोफा सुटती वाद्ये वाजाति आनंद पाहाति सर्व जन ॥ चतुराइ नानाचि लवकर रावसाहेबासि उठऊन। भेटी नंतर उठाउठि आल माधारा परतून ॥ कितेक दिवसाउपर पाटिल तळ ढाळति ते तेथुन। दुसऱ्या जागा उतरुनि तेथुन पुन्यामदि येणे जाणे ॥ पाटिलबावा श्रीमन्ताप विचार करिती बसुन। बाच्छायाने नालकि दिधला ते मेवावा आपण ॥ माझ्या नावे दुसरि ज तुह्मि घाल तव मा घेइन। मान्य केले रावसाहेबाने उदइक आहे शुभदीन ॥ दुसऱ्या जागा डेरे द्यावया

---

तुर्कस्तानातील ऑटोमन राजवटीत प्रथम पडली कारण तथऱ्या एका राजाला एका शत्रूच्या वकिलाने दरबारात बोलण करीत असता अचानक तरवार उपसून दग्याने ठार मारिले यासंबंधी माहिती श्रीमंत राजे तात्यासाहेब मिरजकर यांनी तुर्क्यांच लिहिलेल्या ऑटोमन घराण्याचा इतिहास या पुस्तकात आली आहे आपणाकडेहि ही पद्धत रूट होता पुढे तिला दरबारी स्वरूप आल म्हणजे मनुष्य ज्या हुद्द्याचा असेल त्याप्रमाणे रमाशन नाहीतर हाराने हात बांधून राजास भेटण्याची प्रथा पडली सवाई माधवरावान्या लग्नात पुण्यास सवाइ माधवरावान छत्रपतीचा भेट होर

ऐसे कौतुक दाखविलें ॥ सचीव पन्तप्रधान त्याला महासक्टीं तारीले। गायक वाडाचे सचाणि करुनी साहेबास दिधल्या नजरा ॥ धन्याजवळ नानाच्या मसे गोष्टि केल्या दुधारा ॥

मरयादा रक्षुन धन्याचे कार्य करिती ती जपुन ॥ मर्जीकरिता वसुन राहिल आज्ञाधारक निपूण । आरोग्यकाया महाराजाचि सदा पुष्ट शक्तीवान ॥ सहजा सहजि जेवर आला म्हणून राहिले निजून। उपाय करिता अपाय होति कळल पुरे त्याचे चिन्ह ॥ प्राश्चित घेती शास्त्रयुक्त ती महामहा देती दान। घडिघडि येति श्रीमन्त नाना खबर घ्यावया जलदान ॥ नाडि पाहता कठिण अवस्था डोळा उरलासे प्राण। व्याकुळ झाले शब्द न चाले वाचेसि पडले मौन ॥

---

आहे वाटेने रग खेळत जाव अस ठरल आहे " श्रीपतराव मोरेश्वर यांच बाळासा पटवर्धनास पत्र.

सचीव पतप्रधान इ—रघुनाथ चिमणाजी सचीव वारल्या वर त्याचा मुलगा शकराजा यास वस्त्रे मिळाली त्याच व त्याच्या सावत्र आइचें भाडण लागल तो अगदीं नालायक होता, सबब पेशव्याकडून बाजी मोरेश्वर कारभारी नेमून देण्यात आला पण त्यामुळे सचिव अधिकच भ्रमिष्टासारखा वागू लागला बाजी मोरेश्वर आणि आपली सावत्र आई याच सूत आहे अस वाटून त्याच चित्त खवळले शेवटीं बाजी मोरेश्वराने जबरदस्ती करुन सचिव जेजुरीस पळून गेला होता तेथून त्यास पकडून आणल गायकवाडाच्या प्रकरणानतर सचीव प्रकरण पुढे आलें, शाहीराचा अनुक्रम निराळा आहे

| | | |
|---|---|---|
| ४ सचीव प्रकरण | २ एप्रिल १७९३ सुमार | खरे |
| ३ गायकवाड प्र | २८ डिसेंबर १७९२ सुमार | |
| २ शिंद्याचे हिशेब | २७ डिसेंबर १७९२ सुमार | |
| १ रंग (खरे प नं ३५०२) | १७९३ सुमार | |

मर्यादा—आदब, नम्रता निपूण—निष्णात आरोग्यकाया—निरोगा प्रकृति जेवर—ज्वर उपाय करिता अपाय होती—"हकीमजी आपले चालीचे जुलाब देत गेले परतु गुणास काहीं आल नाहीं. मगळवार द्वादशीस प्राय सकाळपासून कफ जाला तो

अन्तीसमाये स्वामीपायि लक्ष लाविले प्रेमानं ॥ श्रीमन्तानी आपलीं वस्त्रे देऊन पाटिल गौरविल ॥ कष्टी होऊन श्रीमन्त म्हणति राज्यातिल हें नीधान । डोहोडोहो शब्द ऐकुनि पाटिलनेत्र ढाळिति जीवन ॥ ते हो नाना अन्तरयामि वहुत श्रमि झाले जाण । पाटिल जाति निजधामासि कलुन आलें बुधिन्द ॥ माघ शुद्ध त्रयोदसि बुधवार रात्र पहिला पाहारा प्राण सोडिला अकांत झाला अस्मानि तुटला तारा ॥

शक १७१५ प्रमादि संवत्सर वर्जेले प्राणा ॥ त्या वेळे लष्करचे लोका त्राहे त्राहे भगवाना ॥ अभय देऊन समजावीति बंदोबस्त करिती नाना । केली तयारि जाउन सारि भरुनिया बार तोफखाना ॥ भागीरथीच्या उदके न्हाणुन प्रेत जाळले ततक्षणा ॥ दौलतराव बाबा गेले होते. आंब्याच्या दर्शना ॥ बाबा फडक्यासंगे ठेविल्या पागा नेमुन रक्षणा । राव नाना ते आले पुन्यामधि खबरा कळल्या सर्व जना ॥ पाटीलांचे कठीण दुःख रावसाहेबासि साहेना । युक्ति युक्तिनें समजावीति राज्याचे अवले नाना ॥ त्याच्यामागे कृपा करुनिया मुलापासुनि सेवा घ्याना । पाटिल स्वर्गि खुशाल होति जन्माचे सार्थक जाणा ॥ गोविंदराव गुरुराज धन्य ते होऊन गेले मोतीदाणा । शुर मर्दांचे गाति पवाडे शेहर जुन्नर ठाकाणा ॥ बाळमति अज्ञान गातसे मल्हारि कविराज वरा । बाहिरू करितो रंग सवाइ चंग वाजवि तन्द्रातन्द्रा ॥

---

शैत्य उपचारामुळे जाला. दुसरी औषधे द्यावी म्हणोन पाचसात वैद्य जमा केले. उपचार करावा हे योजना करून औषधे चालू केली. परंतु लागू होईनात. चढ होत चालला. बोलणे राहिले. बुधवार त्रयोदसी सायंकाळी श्रीमंत रा. नाना फडणीस समाचारास आले. अंगोघरीह एकदोन वेळ आले होते. तेंव्हा बोलणें परस्परे जाले. या वेळेस कांही बोलणें झालें नाही. वगैरे" (रत्नाकर वर्ष ३, अंक ४, स. १९२८, जगन्नाथ विश्वनाथाची लालाजी बल्लाळ गुळगुळे, मु. कोटा, यांस पत्रे)

श्रीमंतांनी आपलीं वस्त्रें देऊन पाटिल गौरविले—स्वतः पांघरलेले वस्त्र श्रीमंतांनी देणें हा मोठा बहुमान. ही मोगली पद्धत आहे. Robes of honour–There were five degrees of khilat those of three, five, six or seven pieces or they might as a special mark of favour consist of clothes that the emperor had actually worn.

(Army of the Indian Moghuls–Irvine, Page 29)

नव्हता. शहरपन्ह्याच्या भिंती फार उंच नाहींत व खदकही फारसा खोल नाहीं असें पाहून १० मे रोजीं पहांटे तीन वाजतां शिड्या लावून पेठ काबीज करण्याची मनरोनें सिद्धता केली व कुजबुज होतांच शिड्यासामान नेऊन हल्ला करणाऱ्या तुकडीनें शिड्या लावल्या. मराठ्यांनीं खूप आगीचा मार केला, तरी त्या तुकडीनें स्वतःच्या डाव्या-उजव्या हातचे बुरूज जिंकून कायम केले व वेस उघडून सर्व इंग्रज सैन्य आंत घेतलें. आंत शिरलेल्या इंग्रज सैन्याच्या एका तुकडीनें उजव्या हातच्या शहरपन्ह्याच्या बाजूनें मारीत जाऊन किल्ल्यानजीकच्या पेठेंतल्या दोनतीन मोठ्या हवेल्या बळकावल्या. दुसऱ्या एका तुकडीनें शहरपन्ह्याच्या डाव्या हाताकडील बाजूनें चढाई केली व आणखी तिसऱ्या एका तुकडीनें मध्यावरून सरळ चाल केली व शहराच्या ज्या वेशीमुळें शहराचे दोन भाग पडले होते ती वेस खुली करून डाव्या-उजव्या हातच्या तुकड्यांचा मिलाफ केला. नंतर एक ग्रेनेडियर्सची टोळी पाठवून शहरालगत एका वाटेंत मराठ्यांनीं चौकी ठेविली होती ती उधळून देण्यात आली. दरम्यान गणपतराव पानशे आपला तोफखाना घेऊन सोलापूर शहरपन्ह्याच्याबाहेर परंतु किल्ल्यासमीप मोक्याची जागा घेऊन उभा होता ती त्याने सोडली, व उजव्या बाजूला वळसा देऊन इंग्रज सैन्यानें बाहेर तळ्यावर जी आपली शिलकी फौज ठेविली होती तीवर तोफांचा मारा सुरू केला. म्हणून जनरल मनरोनें ती शिलकी फौज शहरांत आश्रयास नेली. पण तेवढ्यांत मराठ्यांच्या तोफखान्यांतील दारुगोळा अकस्मात् गोळा पडून म्हणा किंवा कशानें तरी भडकला. त्याबरोबर तीच नामी संधि असें पाहून इंग्रज सैन्यास बागनेटांनीं हल्ला चढविण्याचा हुकूम देण्यांत आला. या वेळीं निकराची लढाई झाली. गणपतराव पानशाला जखमा चढल्या व त्याच्या हाताखालचा दुसरा एक अधिकारी गोळा लागून ठार झाला; व पानशांच्या तोफखान्याची व फौजेची दाणादाण झाली. याच सुमारास निजामाचा दुल्हेखान नांवाचा सरदार ८०० पायदळ व ३०० घोडेस्वार घेऊन इंग्रजांकडे दाखल झाला होता. या दिवशीं किल्लेकऱ्यांनीं शहरांतला कांहीं भाग शत्रूच्या हातीं पडूं नये म्हणून शिकस्त चालविली. पण ते साधेना. तेव्हां शहराबाहेर असलेली मराठ्यांची फौज डावाडोल होऊन आपली जागा बदलण्याच्या

# सोलापूरच्या लढाईचा पोवाडा

अष्टयाची लढाई झाल्यानतर सुमार तीन महिन्यांच्या अवधींत पेशव्याचे सातारा वगैरे किल्ले इग्रजानीं जिंकले नतर जनरल मनरो हा भीमा व घटप्रभा या दोन नद्यामधील पेशव्याचा मुलूख जिंकण्याच्या उद्योगास लागला तो ७ मे १८१८ रोजीं सिद्दापरजवळ भीमा उतरून आला यामुळे पेशव्यांन्या सैन्याला परत माग हटून सोलापूरचा आश्रय घ्यावा लागला दुसऱ्या दिवशीं पाथ्रीजवळ सीना नदी उतरून इग्रज सैन्य आणखी पुढ आले व ९ मे रोजीं मराठ्यानी त्यावर तोफा-बदुकाचा मार धरला होता, तरीहि अगदीं दोन मैलावर त येऊन ठेपल इग्रजानीं आपल्या लष्करातील चेनसिंग सुभेदार नावाचा एक हिंदु अधिकारी किल्ला सलोख्यान खालीं करून द्या, असा निरोप देऊन किल्लेदाराकडे पाठविला या चेन सिंगान आजपर्यंत अनेक वेळा इग्रजाच्या असल्या कामगिऱ्या फार उत्तम तऱ्हेन बजावून गोळी न वाजता ठाणीं इग्रजान्या हातीं पाडवून देण्यात यश मिळविले होते, पण या वेळी मात्र किल्लेकऱ्यानीं त्याचा खून केला। बोलण करणाऱ्या वकिलास युध्यमान पक्षापैकीं कोणीही दगा करावयाचा नसतो, असा युद्धनीतीतला सवमान्य दडक आहे तो मराठ्यानी अशा रीतीन मोडल्यामुळ चिडून जाऊन इग्रजानीं

नव्हता. शहरपन्ह्याच्या भिंती फार उंच नाहींत व खंदकही फारसा खोल नाही असे पाहून १० मे रोजीं पहांटे तीन वाजतां शिड्या लावून पेठ काबीज करण्याची मनरोने सिद्धता केली व झुजूमुजू होताच शिड्यासामान नेऊन हल्ला करणाऱ्या तुकडीनें शिड्या लावल्या. मराठ्यांनी खूप आगीचा मार केला, तरी त्या तुकडीनें स्वतःच्या डाव्या-उजव्या हातचे बुरूज जिंकून कायम केले व वेस उघडून सर्व इंग्रज सैन्य आंत घेतले. आंत शिरलेल्या इंग्रज सैन्याच्या एका तुकडीनें उजव्या हातच्या शहरपन्ह्याच्या बाजूनें मारीत जाऊन किल्ल्यानजीकच्या पेठेतल्या दोनतीन मोठ्या हवेल्या बळकावल्या. दुसऱ्या एका तुकडीनें शहरपन्ह्याच्या डाव्या हाताकडील बाजूनें चढाई केली व आणखी तिसऱ्या एका तुकडीनें मध्यावरून सरळ चाल केली व शहराच्या ज्या वेशीमुळे शहराचे दोन भाग पडले होते ती वेस खुली करून डाव्या-उजव्या हातच्या तुकड्यांचा मिलाफ केला. नंतर एक ग्रेनेडियर्सची टोळी पाठवून शहरालगत एका वाडींत मराठ्यांनी चौकी ठेविली होती ती उधळून देण्यात आली. दरम्यान गणपतराव पानशे आपला तोफखाना घेऊन सोलापूर शहरपन्ह्याच्याबाहेर परंतु किल्ल्यासमीप मोक्याची जागा घेऊन उभा होता ती त्याने सोडली, व उजव्या बाजूला वळसा देऊन इंग्रज सैन्यानें बाहेर तळावर जी आपली शिलकी फौज ठेविली होती तीवर तोफांचा मारा सुरू केला. म्हणून जनरल मनरोनें ती शिलकी फौज शहरांत आश्रयास नेली. पण तेवढ्यांत मराठ्यांच्या तोफखान्यांतील दारुगोळा अकस्मात् गोळा पडून म्हणा किंवा कशानें तरी भडकला. त्याबरोबर तीच नामी संधि असे पाहून इंग्रज सैन्यास बागनेटांनीं हल्ला चढविण्याचा हुकूम देण्यांत आला. या वेळीं निकराची लढाई झाली. गणपतराव पानशाला जखमा चढल्या व त्याच्या हाताखालचा दुसरा एक अधिकारी गोळा लागून ठार झाला; व पानशांच्या तोफखान्याची व फौजेची दाणादाण झाली. याच सुमारास निजामाचा दुल्हेखान नांवाचा सरदार ८०० पायदळ व ३०० घोडेस्वार घेऊन इंग्रजांकडे दाखल झाला होता. या दिवशीं किल्लेकऱ्यांनीं शहरांतला कांहीं भाग शत्रूच्या हातीं पडूं नये म्हणून शिकस्त चालविली. पण ते साधेना. तेव्हां शहराबाहेर असलेली मराठ्यांची फौज डावाडोल होऊन आपली जागा बदलण्याच्या

उद्योगास लागली. ते पाहतांच इंग्रजांच्या घोडदळानें दोन हलक्या तोफा घेऊन मराठ्यांचा पाठलाग केला. दुलेखानालाहि तेंच करण्यास सांगण्यांत आलें. तेव्हा मात्र मराठ्यांचा पळच सुटला व ते आपल्या तोफा तशाच जागेवर टाकून धावू लागले. पण इंग्रज फौजांनी सात मैलांवर मराठ्यांना गांठून त्यावर गोळागोळी सुरू केली. मराठ्यांनीहि प्रतिकार केला; परंतु त्यांचा कांही इलाज चालला नाही व मराठ्यांचे जवळ जवळ एक हजार शिपाई कापले गेले. इंग्रजांनी रात्रीं अंधार होऊन दिसेनासें होईपर्यंत पाठलाग करून सीना नदीपावेतो मराठ्यांस पिटून घातलें.

इकडे शहर जिंकलेल्या इंग्रज सैन्यानें किल्ल्यावर शिड्या लावून एल्गार करण्याचें ठरविलें व त्यासाठीं दक्षिणेकडील तटास शिड्या लावण्याचें मुक्रर झालें त्या बाजूने शिड्या लावण्याचे कारण तिकडे हल्ला करणाऱ्यांना दबा घेत जाण्यासारख्या दडणी होत्या व तेथल्या बाजूच्या खंदकांत पाणीहि फारसें खोल नव्हतें. ता. ११ मे रोजी तलावाच्या बांधाखाली आसऱ्यानें तोफखाना ठेवून इंग्रजांनी किल्ल्यांत सतत गोळे टाकण्यास सुरुवात केली. हेतु हा कीं मराठे गुंतून पडावे. दुसराही एक हेतु असा की, त्या तोफांच्या माऱ्याच्या आश्रयानें हल्लेकऱ्यांना तटाजवळ सुखरूप पोंचतां यावें. ता. ११ व १२ या दोन तारखांस इंग्रजांनीं किल्ल्यावर देवडामार चालू ठेवला व १३ व्या तारखेस त्याच तोफांच्या आश्रयानें इंग्रजांनीं पुष्कळ पुढें सरकून किल्ल्यानजीक एक बातेरी उभी करून तेथून दिवाळतोडी म्हणजे तट पाडणाऱ्या तोफांचा भडिमार सुरू केला. त्या बातेरीनें आपलें काम उत्तम बजावलें. तटास भगदाड पडलें तेव्हा मराठे आंतून मेढा घालण्याच्या उद्योगास लागले. पण रात्रीपर्यंत, शिड्या लावून तटावर सहज चढतां येण्याइतका तट ढांसळला होता व म्हणून १४ तारखेस दुपारीं इंग्रजांनीं शिड्या सामान करून हल्ल्याची तयारीही केली. तें पाहून स्थळ राखणें अशक्य वाटून किल्लेकरी तहास आले. इंग्रजांनीं त्यास कौल दिला व किल्ल्यांतील सर्व मराठे लोक आपापली चीजवस्त घेऊन दुसरे दिवशीं सकाळीं ठाणें खाली करून वाट फुटेल तिकडे चालते झाले.

(२) या लढाईसंबंधी अलीकडे प्रसिद्ध झालेल्या पेशवे दप्तर भाग ४५-

मध्ये कांहीं मराठी पत्रे छापलेलीं आहेत. तीं अर्थात् इंग्रजांनीं नेमलेल्या देशी फितुरी बातमीदारांनी रोजच्या रोज त्यांना लिहिलेलीं बातमीपत्रे होत. तीं खुद्द लढाईच्या वेळीं समक्ष पाहून किंवा रोजची बातमी आणवून अधिकृतपणे लिहिलेलीं असल्यामुळे साधन या दृष्टीनें त्यांची किंमत अव्वल दर्जाचीच मानली पाहिजे. मात्र तीं इंग्रजांच्या पक्षाचीं आहेत येवढें लक्षांत ठेवलें पाहिजे. त्या पत्रांवरुन निघणारी सोलापूरच्या लढाईसंबंधीची पोवाड्याला उपयुक्त पडणारी माहिती अशी—

जनरल तामस मणरोल (मनरो) ९ मे रोजीं सोलापुरच्या जवळ दोन तीन कोसावर येऊन पोंचला. त्या आधी एक दिवस इंग्रजांचा तोफखाना दोनप्रहर रात्रीस सोलापुरास दाखल झाला होता. निजामाकडीलइंग्रजांच्या मदतीस आलेला सरदार दुल्हेखान मौजे देवगांवच्या ओढ्यावर येऊन पोंचला. त्याच्या तुरुप स्वारांनीं लागेच तलावा केला. म्हणजे सोलापूर किल्ल्याच्या आसपास जाऊन टेहळणी केली. त्यावरोबर किल्लेकरांनीं त्यांच्यावर तोफा डागल्या. किल्लेकऱ्यांनीं देवगांवच्या पुढे एक कोसावर मौजे बाळी म्हणून गांव आहे. तेथे एक लढाऊ गढीहि होती, तींत तोफा वगैरे ठेवून त्यांनीं ती किल्ल्याच्या आघाडीच्या मोर्चासारखी लढविण्याची तरतूद केली होती. तसेंच सोलापुरापासून बाळीपर्यंतची सर्व मधलीं झाडीं तोडून टाकून साफ मैदान करुन शत्रूस आसरा घेतां येऊ नये अशीहि तजवीज करण्यांत आली होती.

इंग्रज सोलापुरास आल्यावर दुसरेच दिवशीं १० तारखेस मोठी लढाई झाली. तोफखान्याकडील म्हणजे गणपतराव पानशाकडील हजार पांचशें माणूस ठार झाले. विठ्ठल बचाजी व काकोपत हे कामास आले. इंग्रज व निजाम यांजकडीलही खराबी फार झाली. किल्ल्याबाहेरील पानशाची फौज फुटली. पळ सुटला, तिचा पाठलाग करुन इंग्रजांनी अनेक लोक ठार मारले. "मोठी सडघाण केली." या लढाईत इंग्रजांनीं किल्याबाहेरील पेठ म्हणजे सोलापूर गांव काबीज केलें ही गोष्ट इंग्रजांच्या शौर्याइतकीच त्यांच्या फितुरीमुळे इतकी लौकर घडून आली. मराठ्यांकडील भाऊ गोडबोले, विठ्ठलपंत, गाडगीळ, गांवांतील शेटे महाजन हे इंग्रजांस फितूर झाले होते. भाऊ गोडबोले व विठ्ठलपंत गाडगीळ

याना पानशानी किल्ल्यांत फितूर होईल म्हणून बेड्या घालून कैदेत ठेवल्याची एक बातमी उठली होती; तर दुसरी अशीही होती कीं, गोडबोले लढाईच्या दगलीत इग्रजास जाऊन मिळाला. शेव्याला मात्र तो सांपडला तेव्हा पानशे यानी तोफेच्या तोंडीं दिला! गणपतराव पानशे याच्या हातावर गोळ्याची जखम झाली म्हणून बळवतराव बापूर्जी १० मे रोजीं मगळ वेढ्याहून खुद्द जणरल तामस मणरोल याला कळवितो त्या बातमीस खुद्द गणपतराव पानशाच्या मुलाच्या पत्राचेंच उत्तम प्रत्यतर सापडतें. या सोलापूरच्या लढाईचें वर्णन खुद्द त्या लढाईंत बापाबरोबर असलेले दामोदरराव पानसे यानी केले आहे. त्यात ते लिहितात. "जनरल मदरोल हा कर्नाटकातून सात पलटणे घेऊन नवाब पोलादजग बहादूर (निजामाचा एक सरदार) सात पलटण व पोलादजग याजकडील फौज, दुक्षेखान (याच्या हाताखालची फौज) मदतीस घेऊन (आमच्यावर चालून आला तेव्हा त्याची व आमची) सोलापूर मुक्कामी लढाई झाली त्या लढाईचे पूर्वीं "सीना व भीमा मध्य देश घेऊन, फौज व तोफखान्यासुद्धा खर्चाचा बदोबस्त करून देतो" म्हणून इग्रज बहादुर याजकडील बोलणे आले होते. परतु आपले खानदानीवर नजर देऊन लोभ न धरिता शके १७४० मध्ये (तारीख ६ माहे मे १८१८) लढाईच घेतली. त्या लढाईंत प्रथम बसते घोडीस गोळा लागून ठार पडली. तेव्हा सरदार पडले असे फौजेच्या मनांत येऊन बेहवा गर्दी झाली. परतु खैर होऊन फौज पायदळ एकत्र करून इग्रजावर चालून घेतले तो उजवे हातास गोळीची जखम लागून बहुत जेरीस येऊन दोन घटका आराम होण्याकरिता बाजूस बसले. इग्रज बहादूर यांनी तळावर चालून आल्यानतर किल्ल्यातून लढाईस सुरवात झाली. लढाई सरजाम वरकड बदोबस्ताप्रमाणे दोन्ही बाजूचे समसमान. सबब तहाचे बोलणें उभयपक्षी होऊन तहनामा ७८ रजब सन सलासीन अशर ता १४ मे सन १८१८ इसवींत जहाला"
[पानशे घराण्याचा इतिहास पृष्ठांक ११४]

अलीकडे पेशवे दप्तर भाग ४१ मध्ये २११, २०६, १९३, २०९, २१० लेखाकात या लढाईसबधी नवी माहिती उपलब्ध झाली आहे ती पुढीलप्रमाणे—

श्री

मोहर

तहाच्या अटी

( ता १४–५–१८१८ )

नक्ल

यादि किल्ले सोलापूर येथील ठरावाची कलमे सु॥ समान असेर मयातैन व अलफ छ ८ रजब सन १२४७ वैशाख शु ९ गुरुवार शके १७४० सन १८१८ माहे मे छ १४.

१ किल्लेदार व दरकदार व कारकून जमादार व सिलेदार, बारगीर व बाजे लोक वगैरे आपलाली बायकामुले कबिलेचे चीजवस्त हत्यार पत्यार घोडे तट्टू बैल गुरे वगैरे सुधा घेऊन जातील त्याच उपमर्द देऊ नये पार करून द्यावे कलम

१ गणपतराव भाऊ पानसे यास व त्याची चीजवस्त घोडे तट्टू कारकून मडळी शागीर्द पेशा झाडून पार करून द्यावे.

१ गांवातील कारकून हाजरनीस सिबंदी किल्ल्यात चाकरीस होते ते किल्ल्यातून बाहेर निघोन गावात व परगावी आपलालें घरीं मुललेकर चीजवस्तसुधा राहतील त्यास कौल देऊन हरयेकविसी उपद्रव लागो नये.

१ कौल द्यावयाचे तपसील

१ गणपतराव भाऊ यास कौल व पत्र.

१ चीजवस्त कारकून व मडळीसुधा व खासगत पार व्हावयाचा कौल.

१ पुण्यात जाऊन आपले वाड्यात हरयेक जागा राहतील व त्याचे सरंजामाच्या वगैरे पेशजीप्रमाणे बंदोबस्त करून देण्याविसी आर्लपिरतन साहेब यास पत्र.

१ विसाजी देवराव किल्लेदार यास कौल व पत्र

१ चीजवस्त मडलीची व खासगत सुधा घेऊन जाण्याविसीचा कौल.

१ पाच्छापूरचे वतन पेशजीपासून साल गुदस्तपावेतो चालत आल्या प्रमाणे पुढे चालविण्याविसी मामलेदार यासी पत्र.

१ घरची बायेका मुलेमाणसे चीजवस्त व जप्ती व वर्दीस ठेविले आहेत म्हणोन वर्तमान आहे येविसी मामलेदार याचे नावे पत्र देऊन मोकले करून स्वाधीन करावे.

१ पुण्यात बाग नवी विर्हार खणून केली आहे आम्हाकडे चालविण्याविसी अलपिष्टनसाहेब यास पत्र यावे

१ जमादार व लोक वगैरे याचे नावे कौल की, ज्यास जेथ सोय पडेल तेथ त्याणी राहिले असता उपसग देऊ नये

१ गणेश नारायण जोसी कारकून याचे घर मौज हिंडील ता साळसी येथे आहेत ते आपले घरी चीजवस्तसुधा जाऊन राहतील त्यास हरयेक विसी उपसग होऊ नये म्हणोन किले मालवण येथील मामलेदार यास पत्र.

सदरहू प्रमाणे ठरून कौल पत्र देऊन गोला गोली बद जाहल्यापासून सहा प्रहरांत किला हवाला करून बाहेर निघोन जाऊ येणेप्रमाणे पाच कलमे.

इम्रर्जा हारफ ( हर्फ, हरफ=अक्षर, लेख )

ता १० ५-१८१८

बळवतराव बापूजा याचे नवाबसाहेब यास पत्र

१ छ ९ तारखीस आस्तमाणी लस्करात अखबार घेऊन गेला होता तो आला त्याणे बातमी आणली तोफखाना छ ८ तारखीस दोन प्रहरा रात्रीस सोलापुरास दाखल जाला आपलेहि लस्कर मौजे देवगावचे वळ्यावर जाऊन उतरले आहे आपल्याकडील तुरुप तलाव्यास गेले होते, त्याणी किल्यावरून च्यार तोफा डागल्या ह्मणौनही बातमी आणली तेथून पुढे कचा येक कोस मौजे वाले ह्मणोन गाव आहे तेथील गढा लढाऊ आहे तेथे पाणशे याणा च्यार तोफा ठेऊन जागा चलकाविली आहे मोचा बादला आहे लढावयाचा दम बहुत आहे आणखी किल्यात गांवची रयत देशमुख व देशपांडे शट्ये माहाजन व बारा हाकदार नेऊन बसाविले आहेत फितुर होईल ह्मणोन आज आणखी अखबार लस्करात पाठविली आहे काये बातमी येईल ती खरी

ता. १३ ५ १८१८

बलवंतराव बापूजी याचे नवाबसाहेब याम पत्र

अर्जदास्त फिदवी बलवतराव बापूजी बादबदगी आदाव तसलीमात कुरनिसात रज्या आऊरदे मारूजमे रसानद आरे येथील रीर सला अख बार देवटी मुा मगलवेड नजीक श्री पंढरपूर ता छ १३ माहे मे सन १८१८ ईसवी मुताबिक छ ७ माहे रजेब सन १२३३ रोज बुधवार पो यथा स्थित अमो विशेष इकडील माार कालचे असवारीत लिा जासूद गेले ते आले नाहीत त्यांनी बातमी आणली लढाइ चालली आहे तोफखान्याचे दरोबस्त लोक किल्यात शिरले आहेत आपल्याइकडील लोक पेठत जाऊन मोरचे लावन रेवणीस लागले आहेत लस्करात हावालदिली नाही लोक हुशार आहेत वरचेवर मणुशे पडतात किला अद्याप जेरीस आला नाही मणरुपचे आगून तोफा लावल्या आहेत कोण पडले कोण राहिले हे कोन्ही लस्करात बोलत नाहीत पनास पाऊनशे डोल्या जातात येतात तोफखान्याचे स्वार व पायेदल बाहीर होते त्यास निरोप दिल्हा त्यांचे मागे आपल्या इकडील तुरुप व काही लयेनचे लोक याणी दऊड करून मोठी सडघान केली दोनतीन कोस मुडदे पडले आहेत काही पडुन गेले लष्करात याप्रमाणे बातमी आहे नाहीर व येथे मुखत्यारच पडले (मनरो) म्हणोन लोक स्पष्ट बोलतात किल्यात येथे वकिलाचे पत्र आल त्यात सरदार पड त्याच वतमाण लिहितो ती बातमी रो गोविंदपत ओक याणी येऊन सागितला त्यावरून ऐकिले ते लिहिणे प्राप्त जाले परंतु लस्करातहि बोलतात ऐसा लढाई कधीच घेतली नाही उभयेपक्षा मणुशे बहुत मले बाजार बातमा तर मणश्री येतात रात्री येकाण सागितले कीं दुलेखान यास गोला लागली, तेव्हा धोत्रीकडे ( डॉक्टरकडे ) घेऊन चालले तो वाटेतच काळ जाहाला आणि लस्करात तर कोन्ही कोन्हासा बोलत नाही निवल जाल्या वर सरे खोटे वतमान कलल दुसरे येकाण सागितले त्यानखान जामदार पहिले पानशे याजकडे नवकर होता हाली त्याजपाशा चार हजार आरब आहेत त्याम पत्र पो आहे तिसरे एकाने सागितले रा भाऊ गोडबोले पुंढ होते त्याणी व पेठचे शेट्याने फितुर केला म्हणोन आपल्याकडील लोक पेठत सिरले, गोडबोले आपल्या लस्करात

मिळाले शेव्या यास धरून पानशे याणी तोफचे ताडा देऊन उडविला जेऊरचे रप्याकडील वरधी आली आपल्याकडील गेक पलटण * * मिनावर आले आहे व श्रीमताचे माघे पलटणे होते ते धारुराकडे आले आहेत कलावे नासगावकर पटवरधण याचकडील वकील रो बापू हासकर आज येथून आपले ल्स्करास गेले छ १२ तारखीसी अखबार रवाना केली ती येऊन पोचलीच आशल मार साहेबाचे खिजमतीस लि॥ आहे बदगीस रोशन होय हे अजदास्त

( ३ ) पुढ देण्यात येत असलेली लढाइचा हकीकत खुद्द कपनी सरकारच्या मद्रास आर्मीच्या जनलवरून म्हणजे रोजनिशीवरून घेतलेली असल्यामुळे ती सर्वांत अधिक विश्वसनीय होय ही माहिती— " Journal of the sieges of the Madras Army in the years 1817, 1818, 1819 with observations on the system, according to which such operations have usually been conducted in India and a statement of the improvements that appear necessary by Edward Lake, Lieutnant of the Hon E I Co Madras Engineers ( Publish 1825 )

सदर पुस्तक सर जॉन माल्कमच्या आज्ञेवरून मुद्दाम अभ्यासपवक लिहिण्यात आले होते

"बेळगावचा किल्ला जिंकल्यानतर मद्रास आर्मीला ब्रिगेडिअर ज प्रिझलर याच्या रिझर्व्ह डिव्हिजनपैकी काही सैन्य येऊन मिळाले नतर ते सव सैन्य सोलापूर किल्ल्यावर चालून गेले इगज मैन्याचा तपशील असा—

राइट ब्रिगेड—हींत युरोपियन फ्लँक बटालियन व रायफल कोअर होते एकूण माणसं १०६०, सेन्टर ब्रिगेड—हींत चवथ्या मद्रास नेटिव्ह इन्फन्ट्रीचे दुसरे बटॅलियन, एकूण माणस १११०, लेफ्ट ब्रिगेड—हींत सातव्या आणि नेटिव्ह इन्फन्ट्रीचे पहिले बटॅलिअन व बाराव्या मद्रास नेटिव्ह इन्फन्ट्रीचे दुसरे बटॅलियन, एकूण माणस १४३० याखेरीज याना

साऱ्या ड्रगूनचें २ स्क्वाड्रन्स्, सऱ्या १८०; तोफखाना कामगार, सऱ्या सर्व मिळून १२३ व पायोनिर्सच्या चार कंपन्या.

९ मे १८१८ रोजीं हें इंग्रज सैन्य सोलापूर किल्याच्या पश्चिम अगास २॥ मैलावर येऊन बसले. किल्यावर झाडी बरीच असल्यामुळे किल्याची रचना चांगलीशी उमटून दिसत नव्हती. तथापि मराठ्यांचे पायदळ आणि तोफा दिसत होत्या. हे पायदळ किल्याच्या उत्तरच्या तटबंदीवर दिसत असून त्यांच्या रांग दाक्षिणेकडे तळें आहे त्याच्या काठापर्यंत होती. मात्र तळ्याच्या काठच्या भिंतीमुळे त्याचा फक्त छातीवरचा भागच तेवढा दिसत होता.

सोलापूर शहर व किल्लयाभोंवती अफाट असें सर्व सपाट काळें वावर होतें. फक्त ओढ्यानाल्यामुळें जमीन किंचित मधेंच तुटल्यासारखी दिसे इत केच. सोलापूरच्या दक्षिणेस मात्र जमीन एकदरींत चढणीची परंतु त्यातच चढउतार असलेली अशी आहे. शहराला पक्का मातीचा तट असून जागोजाग चिरेबंदी बुरुज आहेत फक्त नर्ऋत्य कोनांत मात्र तटबंदी नाहीं कारण तेथेंच सोलापूरच्या किल्याची हद्द शहरपेठेला येऊन मिळते. फक्त तीनशें यार्डांचेंच अंतर दोघांत आहे. किल्याच्या दक्षिणेस मोठा थोरला तलाव असून त्याचें पाणी किल्याच्या तटावर उंचमळत असतें. याच तळ्यातून किल्याच्या तटाभोंवतालच्या खंदकांत पाणी घेण्याची सोय केलेली आहे.

इंग्रज सैन्य आल्या दिवशींच म्हणजे ९ तारखेस सकाळीं नऊ वाजता जनरल प्रिझलर सोलापूरच्या पेठे भोंवती तलाव्यास गेला. त्याचा हेतु तट आणि दरवाजे कितपत बळकट आहेत हे पाहण्याचा होता पुन्हा सध्याकाळींहि दुसरी एक तुकडी दक्षिणेकडे प्रत्यक्ष किल्लयाचा लागभाग पाहण्यासाठीं पाठविण्यांत आली सकाळीं गेलेल्या तलाव्याच्या टोळीवर किल्याच्या पश्चिमेकडून मराठ्यांनीं चाहून येण्याची हूल दाखविली. पण ते तटाचा आसरा सोडून फारसे पुढें आले नाहींत. फक्त आघाडी च्या लोकांची झटपट झाली इतकच. तलावा झाल्यानंतर किल्या आधीं पेठच जिंकण्याचें इंग्रजांनीं ठरविलें. व त्याप्रमाणें ता. १० रोजीं पहाटें तीन वाजता एक इंग्रज तुकडी काहीं तोफा घेऊन तळावरून बाहेर पडली. शहरपन्हापासून उत्तरेस हजार यार्डांवर येऊन ठेपल्यावर फिरून

हल्ल्याच्या सोईसाठी त्या तुकडीच्या दोन तुकड्या करण्यांत आल्या व कांहीं थोडे लोक उपराळ्यासाठीं तेथेच राखून ठेवण्यांत आले. दिवस उजाडतांच तोफा लागू करून त्याच्या आसऱ्याने त्या दोन्ही तुकड्या हल्यास उठल्या. इंग्रजांची हालचाल मराठ्यांना कळून चुकल्यामुळे त्यांनींही बंदुका मारण्यास सुरवात केली होती. दोन्ही तुकड्यांनीं तटाला एकाच वेळीं शिड्या लाविल्या. त्यांना प्रतिकार असा फारच थोडा झाला. थोड्याच वेळांत शहराच्या तटावरून व आंतील रस्त्यावरून मराठ्यांचे लोक त्यांनी मारून काढले व पळाचा पाठलाग करीत पेठेच्या दुसऱ्या टोकास वेस होती तेथपर्यंत जाऊन वेस कबजांत घेतली व मग बंदुकांचा मार धरिला.

याच वेळीं मराठ्यांची मोठी हालचाल दिसूं लागली.ते कांही तोफा घेऊन पेठेच्या दक्षिण दिशेकडून येऊं लागले. त्यांचा हेतू पूर्व दिशेकडील दरवाज्यांतून पेठेंत शिरण्याचा किंवा त्या बाजूस इंग्रजांनी ठेवलेल्या त्या उपराळ्याच्या तुकडीवर हल्ला करण्याचा असावा.

पेठ जिंकून आल्यावर जनरल मनरोने, बाहेर मराठ्यांचें सैन्य जमून तोफा चालवूं लागले होते त्याचा मुकाबला घ्यावा असे ठरविले. म्हणून पेठेत गेलेल्या इंग्रज सैन्यांपैकीं दोन कंपन्या आणखी भरतीस घेऊन व तोफांची सरबत्ती सुरू करून इंग्रज सैन्य चाल करून गेले. याच वेळी मराठ्यांच्या तोफखान्यांतील एक दारू गोळ्याचा छकडा भडकून मोठा स्फोट झाला. त्याने गोंधळांत भरच पडली व ते मराठी सैन्य दाणादाण होऊन पळालें.त्यांच्या तीन तोफा इंग्रजांना मिळाल्या. बाकीच्या तेवढ्यातल्या तेवढ्यांत त्यांनीं खंदकांत लोटून दिल्या होत्या.

किल्ल्यांतील मराठ्यानी,पेठेतून किल्ल्यानजिक जाऊन पोंचलेल्या इंग्रज शिपायांवर, सतत बंदुकांचा मार चालविला होता. हा मार तटाच्या आडून व तटावर त्यांनीं एक नवाच मेढा उभा केला होता त्यांतून चालविला होता. त्यामुळें इंग्रजांचें पुष्कळ माणूस मेले किंवा जायाजखमी झाले. पण मराठ्यांचीही हानी जबर असली पाहिजे; कारण चार वाजण्याच्या सुमारास त्यांनीं मेढा सोडून दिला व ते पूर्व दिशेने मैदानाकडे गेले.

अशा रीतीने किल्ल्याभोवतालचा शत्रुप्रतिकार मोडून काढल्यावर प्रत्यक्ष किल्ल्याचा वेढा सुरू झाला. ११ मे रोजीं इंग्रजांनी बातेऱ्या बांधण्यास सुरवात केली व पेठेच्या दक्षिण वेशीजवळ तळ्याच्या

धक्क्याच्या मागे उभारलेल्या बातेरीवरून चार तोफांचा मार धरिला. या मारामुळे किल्ल्यातील घरे जळाली व मराठ्याच्या कांही तोफाही बंद पडल्या. १२ रोजी सायकाळपासून इंग्रजांनी तोफांचा पुन्हा अखंड मार धरिला. १३ रोजी तलावातील देवळांत इग्रजांनी बरकदाज नेऊन बसविले. कारण हे देऊळ किल्ल्याच्या तटापासून फारच जवळ होते. तेथे उभारण्यात येत असलेल्या बातेरीच्या बेलदार गवड्यांना सरक्षण द्यावे हा एक हेतु होताच; शिवाय मराठ्याकडून, तलावाचा दरवाजा चोरीने फोडून,सर्व जळबव करून टाकण्याचा प्रयत्नहि उघडकीस आला होता.१४रोजी इग्रजांच्या सर्व बातेऱ्यावरून धुमधडाका सुरू झाला व तट भराभर ढासळू लागला व दुपारी मोठेच खिंडार पडले. तेव्हा किल्ला बोलू लागला व अखेर करार ठरून दुसरे दिवशी सकाळी आठ वाजता इग्रजाचे निशाण किल्ल्यावर चढले.

या सर्व वेळ्यात म्हणजे पेठेवरील हल्ल्यासुद्धा इग्रजांचे एकूण फक्त ९७ लोकच मेले, त्यात ४ ऑफिसर होते. इग्रजाना ४० तोफा व अनेक जेजाला मिळाल्या.

## पाठभेद

आम्हास याच पोवाड्याची एक दुसरी प्रत मगळवेढ्याचे श्री.शबूराव करमरकर यानी, एका गोंधळ्यास हा पोवाडा म्हणावयास लावून, तो उतरवून घेऊन पाठविली होती. दोन्ही प्रती ताडून सरस वाटले ते पाठ स्वीकारून त्यावरून नवी प्रत तयार केली तीच पुढे संहिता म्हणून छापली आहे. शितूत प्रत व ही प्रत यातील पाठभेदाचा तक्ता पुढीलप्रमाणे

| शितूत प्रत | नवी प्रत |
|---|---|
| दाणापाणी उदड भरले<br>अरब कोरडीला | दाणापाणी उदड भरले<br>अरब ते कुरु हेला |
| तीन हजार गारदी शिपाई<br>अरबाचे वेढेला।<br>बदोबस्तीने किला रेखल<br>दिला तोफ रुपला॥ | दोन हजार कारडा काय बोले<br>कोकण्याला । तीन हजार गारदी<br>शिवायअरब चापेलीला ॥ बदोबस्तिने<br>किल्ला रोकिला हुकुम केला तोफेला ॥ |

| | |
|---|---|
| तुरुपस्वाराने वेठ उठविला— तोफ किल्यासमोर | तुरुक स्वारानें गेट उठविली तोफ-खान्याच्या म्होर |
| सल्यामल्यासाठी फिरंगी चालून पुढे गेला। ईश्वराने अंत घेतला सांगतसे मुक्रर | सल्यामामल्यासाठी फिरगी चालुन गेला मोन्हं। इश्वासार्नं अन्त घेतला सांगतसे मजकुर |
| अवघी दख्खन घेतली— तुम्ही कायल बहुत आम्हावर | अवघे दख्खण घेतले तुम्ही कां— लढतां आम्हावरोवर |
| गड किल्ले सोन | गड किल्ले सोडून |
| वेशीवर ते शीर ठेविले— पातले सार | येशीवरतं शीर ठेवल पाहातसे लष्कर |
| लइन पुढे तंबूर | लहिन पुढे तंबूर |
| सतरा हजार अरब— चेतिला जाव्या दुदकर | सात हजार अरब छाटिला झालासे धुदकार |
| कयक जन नवस वरती फिरला | कैक जन नवस करितां पिराला |
| तोफा बाणाच्या मळावलुनि नेल्या लष्करांत | तोफखानाच्या माळा ओढुनि नेल्या लष्करांत |
| आला किल्यावर बहुत | आला किल्ल्याभोवत |
| रणमंडळा लावून तोफ सोडिली | रणमडळाहून तोफ सोडिली |
| दिरया मुड्यावर हात फिरंगी शिरला गोळा पुरात | दिले मुच्यावर ढाल फिरगी शिरला सोलापुरांत |

| | |
|---|---|
| सन्यवकऱ्यानं प्राण सोडिला | सावकाराने प्राण सोडिला |
| गल्लोगल्लिने मनुष्य पडे मुडदे चपवत | जसा अवकाळी मेघ वर्षतो । तसा तसा गोळा दिसारित । गल्लोगल्लिन माणुस पडल मुड्याच पर्वत |
| म्हाकाळ बुरुजावरून बळावली तोफाचि विपरीत । कुदा घालुनी तोफ ठासली दरी मुजरा पेठेत | दाहि बुरज्यानी तोफ डागली रणमडळावरत । रणमडळाचा तट पाडिला उरतले खालत ॥ महकाळ बुरूज येउन बळविला तोफेच्या विपारित । खुर्दा घालुन तोफ ठासली धरि मुजरा पेठेत |
| हजार बाराश लटानी— उडली पायक घाटकत दरवाजाला नेउन बुडविली शिडया लावि खदकात । | हजार बाराशे लहिन— उडालि पाच एक घटकत दरवाजाला जाउन भिडाले छडया ( शिडया ) लावि किल्यात |
| किल्यामधि झाला फितुर मग पडली मसलत | किल्यामधे झाला फितूर मग पडली मसलत किल्लेदारान रुमाल फिरविला परचकासी आले |
| सोडुन किल्ला जाळायाला नीर फुटला लोकाला | सोडुन किल्ला झाला वायला निरुप दिला लोकाला |
| दाखने मधि पयस फिरविला | दखणमधि पैसा फिरविला |
| चांगला दिला रगड सायबाला | चागला दिला गरूड सायबाला |
| गराड सायबांची फार जेर्यांम रणम फिरविला | गरूड सायबाची फार चौकशी जाहीरनामा फिरवला । |

| | |
|---|---|
| चवड त्यानी घेतला कफवल दिला रतल। झडझड मुसल-मान सला व दिली पायाला | चौंहप्ल्याने घ्यावा पैसा कौल दिला रयतेला । गड किल्ले हे आज्या बावख्या चट माडाया लागला । झाडझुड मुलमाणस चट लिहया लागला । |
| चप गेवूनी | चाक घेवूनी |
| हरवक्षीनें कुळें रक्षिलीं | हरबाबतीनें कुळे रक्षिलीं |
| लचलुच दरम्यान खर्चित वतन पडले जसिला | लाचलुच जो ग्याल खाल तर वतन पडल जसिला |
| हजार रुपये वसुल करावे येक प्रांती अमल | हजार रुपये आम्ही वसूल करावे काय प्रांती आम्हाला |
| तपकिरीला पयसा मिळेना येते जवळि बायला | तपकिरीला पैसा मिळेना व्यर्थ जाच ल्हियाला |
| बे प्रहच मोडी सुटली मरण जादरनल | वाघा हातची ( वाघाची ) मेढी सुटली मारि पजा धरणिला । |
| वमकुरी सदसीपाय रत्नरावजी बोलला । भयरल नीत गरजे | राव मजकुरी सगे शिपाई रत्नराव बोलला । भयरवनाथ गर्जे |

# सोलापूरच्या लढाईचा पोवाडा

## ११

### ( शाहीर—रत्नराव )

श्रीमत म्हाराज पेशवे धनी मुक्ले राज्याला ॥ शिरी सलामत इग्रज बहाद्दर दरखनी झेंडा लाविला ॥ ध्रुवपद ॥

श्रीमत गेल्यावर पाठीमागे वर्तमान काय झाला। सोलापूरच्या किल्ल्याजवळ तोफखाना लढू लागला। त्या किल्याचा धनी गणेशपत काय बोले फिरग्याला। लक्ष बागडी फुटेल परतु किला देईना तुह्माला। *दारुगोळी भाग तमाखू कमी नाही पैशाला। दाणापाणी उदड भरले अराब* कोरडीला। कडीतोडे बक्षिसी पोशाग देईन शिपायाला। हरतऱ्हेने लढवीन किला नका खवळू आह्माला। तीन हजार गारदी शिपाई अरब चाफेलीला। बदोबस्तीने किला रेखला हुकुम केला तोफेला। नव्हते किल्याचें लगीन लागले बाशिंग बांधले रणमडळाला ॥ १

---

शिरी सलामत इंग्रज बहादर—इग्रज बहादुराचे शीर सलामत राहिले म्हणजे त्याची सरशी झाली. किल्ल्याचा धनी गणेशपत—किल्ल्याचा धनी आणि गणेशपत असा अर्थ घ्यावयाचा. धनी म्हणजे किल्लेदार दुसराच होता. गणेशपंत म्हणजे गणपतराव पानसे तोफखानेवाले हे मदतनीस होते. देईना—देईन ना असें पाहिजे. भांग तमाखू—दारु गोळ्या इतकीच भाग तमाखू शिपायांना अत्यावश्यक असते त्यावाचून शिपायाचे चालणारच नाही म्हणून सैन्याबरोबर या वस्तूचा सग्रह अवश्य करीत असत आजहि शिपायाना सिगारेटस अशाच आवश्यक समजल्या जातात भाग दक्षिणी शिपायाकरिता नव्हे, मुख्यत गोसावी किंवा उत्तर हिंदुस्थानी परदेशी शिपाया साठी. अराब कोरडीला—आरब करार्डीला असे असावे कराडी म्हणजे तटाची कड. भावार्थ तटा जवळ त्याच्या सरक्षणार्थ अरब जय्यत तयार ठेवले आहेत. अरब चाफेलीला—सफेली–तटाची भिंत चाफेलीला–सफेलीला. रेखला—रोखला. नव्हते किल्ल्याचें लगीन लागले बाशिंग बांधले रणमंडळाला—किल्ल्याला वेढा पडून त्यावर शत्रूचे गोळे पडल्याखेरीज किल्याचें लग्न झाले असे समजत नसत

चौभोंवतेनें घालून वेढा वाजवी तबूर । अकरासें पलटण शिवाय दुरेखान सरदार । तुरुप स्वाराने वेंठ उठविला तोफ किल्यासमोर । व्यर्थ जिवासीं तुह्मी का मरता धाडा मनसुबदार । सल्यामामल्यासाठीं फिरगी चालून गेला म्होर इश्वासाने आत घेतला सागतसे मुजकुर । अवघी दखन घेतली तुह्मी कायल बहुत आह्मावर । गडकिल्ले सोडून पळाले बातमी दुरवर । किल्लेदाराने धरून फिरगी कापल शीर । वेशीवरते शीर ठेविलें पाह्यातसे लष्कर । आग तळव्याची गेली मस्तका लईन पुढें तंबूर । रेवनीला होता आरव तोफखान्यासमूर । खनखन तलवार झडली एक सवा पार । सतरा हजार अरब छाटिला जालासे धुदकर । पाच पलटन घायाळ झाली डोली

---

रणमडळ—सोलापूरच्या किल्ल्यातील एका बुरजाचे नाव आहे त्या बुरुजावर निशाण उभे केले म्हणजे त्यास वाशिंग बाधले ? तबूर—Tamboorin चा मराठी अपभ्रश. ड्रम वगैरे नगाऱ्यासारखे इग्रजी रणवाद्य. तुरूप स्वार—ट्रूप स्वार म्हणजे घोडदळ वेंठ उठविणें—हल्ला करणे. तोफ किल्यासमोर—किल्ल्यासमोर मराठ्याकडील लोक तोफा डागीत होते त्या तोफावर तुटून पडण्याच्या इराद्याने इग्रजी ट्रुप स्वारानी हल्ला चढविला व्यर्थ जिवासि इत्यादि—हा इग्रजाचा किल्लेदारास निरोप मनसुबदार–मनसुबेदार मनसुबा जाणणारा म्हणजे तहरहाचे बोलणे करणारा कोणी जाणता शहाणा माणूस पाठवा. थोडक्यात तहास या सल्या मामल्यासाठी—तहरहासाठी आत घेतला—पाढरे निशाण देऊन इग्रजानी आपला माणूस निरोप कळविण्यासाठी किल्लेकऱ्याकडे पाठविला होता. असले निशाण ज्याचे जवळ असते त्यावर गोळा टाकू नये असा तेव्हा सर्वमान्य रिवाज होता कायल—रुष्ट, हैराण, विरुद्ध अवघी दखन आम्ही घेतली आता तुम्हीच तेवढे आह्माशी विरुद्ध का जाता ? धरून फिरगी कापले शिर—वास्तविक जो माणूस मारला तो हिंदूच होता. पोवाड्याची प्रस्तावना पहा लईन पुढे—तबूर वाजवीत इग्रजाची लेन म्हणजे पलटण चालून आली. रेवनी—रेवणी Ravelin चा अपभ्रश भुइकोट किल्ल्याचे तटाबाहेर जी मातीची भर घालतात ती रेवणी–(शास्त्री कोश) पार—प्रहर पावून—पाहून जन—

करा तयार । त्या वेळेला खासा पडला फिरंग्याचा सरदार । घायाळ मुडदे पावुन कयकजन नवस करती पिराला । येवढी लढाई पार पडू दे करीन कदुरी तुला ॥ २

तोफा बाणाच्या माळा ओढुनी नेल्या लष्करांत ॥ भर दुपारा हल्ला नेमिला आला किल्याभोवत ॥ रणमंडळाहून तोफ सोडिली गोळा लष्करांत ॥ दिल्या मुडयावर हात फिरंगी शिरला गोळा पुरात ॥ दुल्लेखानाने लूट घेतली जलमाची सगत ॥ सावकाराने प्राण सोडिला होईल कोणची गत ॥ गल्लोगल्लीने पडले मुड्याचे पर्वत ह्याकाळ बुरुजावरून बळावली तोफचि विपरीत । खुर्दा घालुनी तोफ ठांसली धरी मुजरा पेठेत । हजार बाराशे लष्किन उडाली पावएक घटकेत । दरवाज्याला जाऊन भिडले शिड्या लावी खदकांत । किल्यामधिं झाला फितुर मग पडली मसलत । ठाणे मोकळें करून देतों वाट द्यावी आम्हांला । सोडून किल्ला जाला वायला ॥ नीर फुटला लोकाला ॥ ३

दखनेमधिं पयस फिरविला राजे आले हाताला । सातारा देश प्रांत चांगला दिला गरुड सायबाला । गराड साहेबाची फार चौकशी जाहिरनामा

---

जण, कैकजन कैकजण नवस करिती पिराला—किल्ल्यात नवसास पावणारा प्राचीन पीर आहे. कंदुरी—नवसाची जत्रा बकरे कापणे वगैरे. दिल्या मुडयावर हात फिरंगी शिरला गोळा पुरात—*गोळापुरांत ही वाचनाची चूक आहे सोलापुरात असे मुळात असले* पाहिजे. दिल्या मुडयावर हात याचा अर्थ काय? दिला मुड्यावर हात असे तर नसेल? हल्ला करून जाताना तरवारी धरलेले हात उगारल्यासारखे वर केलेले असतात. किंवा कप्तानाने हात वर उचलून हल्ल्याचा हुकूम केला असाही अर्थ होईल. जलमाची संगत—जन्मभर पुरून उरेल इतकी लूट दुल्लेखानाने केली. खुर्दा—रेजगण, धातूचे तुकडे, खिळे इत्यादि घालून. मुजरा धरणें—नेम धरणे. जाला वायला—निराळा झाला. किल्ला सोडून मोकळा झाला. नीर फुटला—झाडून सर्व लोक किल्ला सोडून गेले. पयस—प्रेप फितूर. राजे—सातारकर छत्रपति. गरुड—ग्रँट साहेब. गराड सायबाची फार

फिरविला। चौहप्त्याने यावा पैसा कौल दिला रयतेला। गड किल्ले हे आड बावड्या चट माडाया लागला। झाड्युड मुलमाणस चट लिह्या लागला। चाक घेऊनी गोरा हिंडतो जमीन मोजियला। इरबावतीने कुळ रक्षिलीं तावीद शेकदाराला। लाचलुच जो म्याल खाल तर वतन पडल जप्तीला। हजार रुपये अम्हि वसुल करावे काय प्राप्ति आम्हाला। तपकीरीला पैसा मिळेना व्यर्थ जाच लिह्याला। तुरा लावुनी रयत हिंडतो दु ख जमेदाराला। वाघाहातची भढी सुटली मारि पजा धरणीला। असे युक्तीने राज्य चालवा गरड सायब तो भला। व मजकुरी सगे शिपाई रत्नराव बोलला। भैरव नाथ गर्जे सभेला त्याने पवाडा केला॥ ४

---

चौकशी इ —हा सबद चौथा चौक प्रक्षिप्त वाटतो त्याचा सोलापूरच्या लढाईशीं काहा एक सबध नाहीं सातारा प्रात हातीं आल्यावर मँट साहे बान प्राताची व्यवस्था कशी लावली, झाडून माणसाकाणसाची, आड बाव ड्याची, घरादाराचा टीप घेऊन गणती कशी केली, चाक घेऊन म्हणजे टेपान सव जमिनीचा मोजणा कशा केली, शेकदारादि सव जुन्या वतनदारांचें बड कस मोडलें व रयत त्याच्या जुलमातून कशी सोडविली, त्यामुळे पूर्वी रयत जमे दाराचा गुलामच असे, तो मुक्त होऊन ऐटाने मान वर करुन कसा वागू लागला व जमेदाराची कशी हानि झाली, लांचलुचपत कडक हुकूम काढून कशी बद पाडली, एकंदरीत रयत कशी सुखी केली त्याच या चौकांत वणन आहे

दुसऱ्या बाजीरावींत रूपरामानें त्रिंबकचा किल्ला नगरकरांकडून जिकणें, कोरीगड जिंकणें व खानदेशांतील पेंटाऱ्यांचा बंदोबस्त राखणें इत्यादि कामें केलीं. यशवंतराव होळकराच्या पुण्यावरील चढाईनंतर बाजीराव कोंकणांत पळून गेला. तेव्हां महाडापर्यंत रूपराम त्याच्याबरोबर होताच. पुढें वसईचा तह होऊन बाजीराव पुनः पुण्यास परत आल्यावर त्यानें त्यावर कृपाळू होऊन सिंहगड, पुरंदर, त्रिंबक, कांगोरी वगैरे किल्ले त्याचेकडे देऊन शिवाय तीनचार लक्षाच्या मामलतीहि त्याला सांगितल्या. यानंतर वेलस्लीसाहेब पुण्याहून गाविलगडच्या स्वारीस निघाला तेव्हां बाजीरावानें त्याजबरोबर जी स्वतःची फौज मदतीस दिली तींत विंचूरकर व बापू गोखल्याबरोबर रूपरामहि होता. ती फौज खानदेशांत गाळण्यानजिक असतां बाह्मणवाड्यापासून नाशिक, त्रिंबक, खानदेशपर्यंत भिल्लाचे दंगे सुरू झाले. त्यांच्या बंदोबस्ताचें काम रूपरामाकडेच आलें व तेंहि त्यानें मेहनत करून बरोबर बजाविलें भिल्लाच्या ज्या जागा होत्या त्या जाळून पोळून त्यांचा रामनगरपर्यंत सतत दोनतीन वर्षेपर्यंत पाठलाग करून भयंकर उग्र शासनें करून त्यानें भिल्लाचें बंड मोडून टाकलें! यानंतर दोन तीन वर्षांनीं रूपराम पुण्यात आजारी होऊन वारला.

# रूपराम चौधरी याचा पोवाडा

## ऐतिहासिक माहिती

रूपराम चौधरी याचा मुलगा रामचंद्र चौधरी यानेच ता. ८ सप्टेंबर १८३२ रोजीं रूपरामाची सर्व हकिकत मुंबईच्या गव्हर्नरास लिहून दिली. ती पेशवा रोजनिशी मालेतील 'कैफियत यादी' या खंडांत छापली आहे. तीवरून पुढील माहिती साराश रूपाने पुढे दिली आहे

(१) थोरल्या माधवरावाच्या कारकीर्दींत प्रथम रूपराम पेशव्यांच्या तोफखान्याच्या चौधरकीचे काम पहात असे. पुढे तो रघुनाथरावाचा पक्षपाती झाला नारायणरावाच्या खुनानंतर रघुनाथराव स्वारीस निघाला तेव्हां रूपरामाकडे रथखाना व तोफखाना यांची मुखत्यारी देऊन त्याने त्याला बरोबर घेतला. त्रिंबकराव मामा पेठ्याचा रघुनाथरावानें मोड करून त्यास पकडलें, त्या सागोल्याच्या लढाईंत रूपरामाने चागला पराक्रम केला. पुढे रघुनाथरावाबरोबरच रूपराम सुरतेस इंग्रजाच्या आश्रयाने होता. शेवटीं रघुनाथरावाला पेशव्यानीं कोपरगावीं कायमचे नजरबंद करून ठेवले तेथेंहि रूपराम त्याच्याजवळच राहिला

रघुनाथराव वारल्यावर पेशव्यांनी रूपरामास आपल्या नोकरींत घेऊन राघो विश्वनाथ गोडबोले याच्या रिसाल्यात लोकसुद्धा नेमले. रूपरामाच्या तोफखान्याच्या पथकात चागले ४००-५०० कवायती कुडतीवाले होते बदामीच्या वेढ्यात रूपरामाने चागली कामगिरी केल्यामुळे पेशव्यांनी आणखी ५००-६०० लोक त्याच्या पथकात भरती करण्यास मजुरी दिली. त्यानतर श्रीरंगपट्टणचा वेढा व सुप्रसिद्ध खर्ड्यांची लढाई यांतहि त्याच्या पथकाने चागली मर्दुमकी गाजविली. वजीराला पुण्यास कैद करून आणले तेव्हां त्याला बदोबस्ताने आणावयाचे काम रूपरामाकडेच होतें

दुसरा बाजीराव गादीवर आल्यावर त्यानें रूपराम हा वडिलार्जित एकनिष्ठ सरदार म्हणून त्यावर साहजिकच विशेष लोभ केला व त्याकडे एक स्वतंत्र पलटणच नेमून दिलें. यानतर थोड्याच दिवसांनीं मनोहर गीर गोसावी याचेंहि पलटण त्याजकडे दिलें. तसेंच तोफखान्याचें काम व १०० स्वारांची पागाहि सांगितली व या सर्वांसाठी साडेतीन लक्षाचा सरजाम आणि जात खर्चासाठीं १३००० चा सरजाम दिला.

दुसऱ्या बाजीरावांत रूपरामाने त्रिंबकचा किल्ला नगरकरांकडून जिंकणें, कोरीगड जिंकणें व खानदेशांतील पेंढाऱ्यांचा बंदोबस्त राखणें इत्यादि कामें केलीं. यशवंतराव होळकराच्या पुण्यावरील चढाईनंतर बाजीराव कोंकणांत पळून गेला. तेव्हां महाडापर्यंत रूपराम त्याच्याबरोबर होताच. पुढें वसईचा तह होऊन बाजीराव पुनः पुण्यास परत आल्यावर त्यानें त्यावर कृपाळू होऊन सिंहगड, पुरंदर, त्रिंबक, कांगोरी वगैरे किल्ले त्याचेकडे देऊन शिवाय तीनचार लक्षाच्या मामलतीहि त्याला सांगितल्या. यानंतर वेलस्लीसाहेब पुण्याहून गावीलगडच्या स्वारीस निघाला तेव्हां बाजीरावानें त्याजबरोबर जी स्वतःची फौज मदतीस दिली तींत विंचूरकर व बापू गोखल्याबरोबर रूपरामहि होता. ती फौज खानदेशांत गाळण्यानजिक असतां ब्राह्मणवाड्यापासून नाशिक, त्रिंबक, खानदेशपर्यंत भिल्लांचे दंगे सुरू झाले. त्यांच्या बंदोबस्ताचें काम रूपरामाकडेच आले व तेंहि त्यानें मेहनत करून बरोबर बजाविलें. भिल्लांच्या ज्या जागा होत्या त्या जाळून पोळून त्यांचा रामनगरपर्यंत सतत दोनतीन वर्षेपर्यंत पाठलाग करून भयंकर उग्र शासनें करून त्यानें भिल्लांचें बंड मोडून टाकलें ! यानंतर दोन तीन वर्षांनीं रूपराम पुण्यांत आजारी होऊन वारला.

बाजीरावानें त्याचा मुलगा रामचंद्र याच्याकडे रूपरामाचीच कामें ठेवलीं. त्याच्यासंबंधी सांगण्यासारखी गोष्ट ही कीं, १८१८ सालीं इंग्रजांनीं सिंहगड जिंकला, त्यावेळीं किल्लेदार रामचंद्र चौधरी हाच होता व त्यानें दहा दिवसपर्यंत किल्ला नेटानें लढविला. 'पेशवाईची अखेर' या विश्वसनीय साधनग्रंथांत "रूपराम चौधरी जेष्ठ व॥ ३० स मृत्यु पावले. त्यांस दत्तक पुत्र रामचंद्र चौधरी केलें." अशी शके १७३६ ची नोंद आहे. त्यावरून १८ जून १८१४ ही रूपरामाची मृत्यू तारीख ठरते.

(२) "रूपराम चौधरी यांजकडे पलटणें व पलटणांतील तोफांचे वेगमीस व गाड्यांचे रोजमऱ्याबद्दल महाल व गांव सरंजामास लाऊन दिल्हे. छ १७ जमादिलावल शके १७२४ (१५-९-१८०२)"
[पेशवाईची अखेर, पृष्ट ११६.]

---

# रूपराम चौधरी याचा पोवाडा

## ऐतिहासिक माहिती

रूपराम चौधरी याचा मुलगा रामचंद्र चौधरी यानेच ता. ८ सप्टेंबर १८३२ रोजीं रूपरामाची सर्व हकिकत मुंबईच्या गव्हर्नरास लिहून दिली. ती पेशवा रोजनिशी मालेंतील 'कैफियत यादी' या खंडात छापली आहे. तीवरून पुढील माहिती साराश रूपाने पुढे दिली आहे.

( १ ) थोरल्या माधवरावाच्या कारकीर्दींत प्रथम रूपराम पेशव्यान्या तोफखान्याच्या चौधरकीचें काम पहात असे. पुढे तो रघुनाथरावाचा पक्ष पाती झाला नारायणरावाच्या खुनानतर रघुनाथराव स्वारीस निघाला तेव्हा रूपरामाकडे रथखाना व तोफखाना याची मुखत्यारी देऊन त्यानें त्याला बरोबर घेतला त्रिंबकराव मामा पेठ्याचा रघुनाथरावान मोड करून त्यास पकडले, त्या सागोल्याच्या लढाईत रूपरामानें चागला पराक्रम केला पुढे रघुनाथरावाबरोबरच रूपराम सुरतेस इग्रजाच्या आश्रयानें होता. शेवटीं रघुनाथरावाला पेशव्यानीं कोपरगावीं कायमचें नजरबद करून ठेवले तेथेंहि रूपराम त्याच्याजवळच राहिला.

रघुनाथराव वारल्यावर पेशव्यानीं रूपरामास आपल्या नोकरींत घेऊन राघो विश्वनाथ गोडबोले याच्या रिसाल्यात लोकसुद्धा नेमले. रूपरामाच्या तोफखान्यान्या पथकात चागले ४००-५०० कवायती कुडतीवाले होते बदामीच्या वेढ्यात रूपरामानें चागली कामगिरी केल्यामुळे पेशव्यानी आणखी ५००-६०० लोक त्याच्या पथकात भरती करण्यास मजुरी दिली. त्यानतर श्रीरगपट्टणचा वेढा व सुप्रसिद्ध खर्ड्याची लढाई यातहि त्याच्या पथकाने चागली मर्दुमकी गाजविली मशीराला पुण्यास कैद करून आणलें तेव्हां त्याला बदोबस्तानें आणावयाचें काम रूपरामाकडेच होतें

दुसरा बाजीराव गादीवर आल्यावर त्याने रूपराम हा वडिलार्जित एकनिष्ठ सरदार म्हणून त्यावर साहजिकच विशेष लोभ केला व त्याकडे एक स्वतत्र पलटणच नेमून दिलें. यानतर थोड्याच दिवसानीं मनोहर गीर गोसावी याचेंहि पलटण त्याजकडे दिलें. तसेच तोफखान्याचें काम व १०० स्वाराची पागाहि सांगितली व या सर्वासाठीं साडेतीन लक्षाचा सरजाम आणि जात खर्चासाठीं १२००० चा सरजाम दिला.

दुसऱ्या बाजीरावांत रूपरामाने त्रिंबकचा किल्ला नगरकरांकडून जिंकणें, कोरीगड जिंकणें व खानदेशांतील पेंढाऱ्यांचा बंदोबस्त राखणे इत्यादि कामें केलीं. यशवंतराव होळकराच्या पुण्यावरील चढाईनंतर बाजीराव कोकणांत पळून गेला. तेव्हां महाडापर्यंत रूपराम त्याच्याबरोबर होताच. पुढे वसईचा तह होऊन बाजीराव पुनः पुण्यास परत आल्यावर त्यानें त्यावर कृपाळू होऊन सिंहगड, पुरंदर, त्रिंबक, कांगोरी वगैरे किल्ले त्याचेकडे देऊन शिवाय तीनचार लक्षाच्या मामलतीहि त्याला सांगितल्या. यानंतर वेलस्लीसाहेब पुण्याहून गाविलगडच्या स्वारीस निघाला तेव्हां बाजीरावानें त्याजबरोबर जी स्वतःची फौज मदतीस दिली तींत विंचूरकर व बापू गोखल्याबरोबर रूपरामहि होता. ती फौज खानदेशांत गाळण्यानजिक असतां ब्राह्मणवाड्यापासून नाशिक, त्रिंबक, खानदेशपर्यंत भिल्लांचे दंगे सुरू झाले. त्यांच्या बंदोबस्ताचे काम रूपरामाकडेच आले व तेहि त्यानें मेहनत करून बरोबर बजाविले. भिल्लांच्या ज्या जागा होत्या त्या जाळून पोळून त्यांचा रामनगरपर्यंत सतत दोनतीन वर्षेपर्यंत पाठलाग करून भयंकर उग्र शासनें करून त्यानें भिल्लांचें बंड मोडून टाकलें ! यानंतर दोन तीन वर्षांनीं रूपराम पुण्यांत आजारी होऊन वारला.

बाजीरावानें त्याचा मुलगा रामचंद्र याच्याकडे रूपरामाचींच कामें ठेवली. त्याच्यासंबंधीं सांगण्यासारखी गोष्ट ही कीं, १८१८ सालीं इंग्रजांनीं सिंहगड जिंकला, त्यावेळीं किल्लेदार रामचंद्र चौधरी हाच होता व त्यानें दहा दिवसपर्यंत किल्ला नेटानें लढविला. 'पेशवाईची अखेर' या विश्वसनीय साधनग्रंथांत "रूपराम चौधरी जेष्ठ व॥ ३० स मृत्यु पावले. त्यांस दत्तक पुत्र रामचंद्र चौधरी केले." अशी शके १७३६ ची नोंद आहे. त्यावरून १८ जून १८१४ ही रूपरामाची मृत्यू तारीख ठरते.

(२) "रूपराम चौधरी यांजकडे पलटणे व पलटणांतील तोफांचे बेगमीस व गाड्यांचे रोजमऱ्याबद्दल महाल व गांव सरंजामास लाऊन दिल्हे. छ १७ जमादिलावल शके १७२४ (१५-९-१८०२)"
[पेशवाईची अखेर, पृष्ठ ११६.]

# रूपराम चौधरी याचा पोवाडा

## १२

श्रीमत बाजीराव कन्हया श्रीकृष्ण आठवा आवतार जन सेवक स्वामीच्या प्रसगी आयेकुन ध्यावे निरतर ॥ रामभकत रुपराम चौधरा सावळी मूरत मणुहार। धने शुर रणशूर पाडववशामाधि पारथवीर॥ दादा (सा) यबासगे लडाया घेतल्या रावाबरोबर। निज्यामआली ज्यार केला पाहा राक्षेसभवनावर ॥ कोपरगावी भील कापले नाही राहिला ठिकाना। येकायची रतण हारपले कसे कोपला भगवाना ॥ ध्रुपद ॥ १

---

मूरत—मूर्ती मणुहार—मनोहर. धने—धन्य पारथवीर—अर्जुन दादासायबासगे इत्यादि—दादासाहेबाच्या बाजून रावा बरोबर म्हणजे थोरल्या माधवरावाबरोबर लढला . कापरगावी भिल्ल कापले इत्यादि—*कोपरगावाआसपास भिल्लांचीं बंड झालीं ती रुपराम* चौधरा यानें निग्रहपणें मोडून काढून भिल्लाचा अगदा नायनाट केला त्याचा ठिकाणा म्हणजे पत्ता मुद्दासुद्धा शिल्लक उर दिला नाही अशा कत्तली केल्या

श्रीराम

राजश्री त्रिबकराव शकर ठाणे पेमगिरी गोसावी यास अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य राजश्री रुपराम चौधरी रामराम विनती उपरी तालुक रतनगड वगैरे महाली चोरटे लोकाचा वगैरे उपद्रव होतो त्यापैकी पेमगिरीचे गावी येक दोघे चोरटे आहेत ह्मणोन राजश्री रामचद्रराव आणा नगरकर याजकडून याद आली त्यावरून हे पत्र लिहिले अस तर चोरट्यास धरावयास त्याजकडून स्वारी येइल त्याजला तुम्ही अडथळा करू नये ते चौकसी करणे ती तिथे पाहूनच करतील रवाना छ २४ रमजान सुरू इहिदे अशर मया तैन व अलफ बहुत काय लिहिणे हे विनती ( २४ १० १८१० )

वरील पत्र आम्हास कान्हुर पठार येथील नगरकराच्या दप्तरात सशोधन करताना उपलब्ध झालें त अप्रसिद्ध असल्यामुळे मुद्दाम उध्दृत केले आहे रामभक्त रुपराम चौधरी अशी जी पोवाड्याच्या सुरुवातीसच शाहिरान ख्याती गाइली आहे ती या पत्रकावरील श्रीकारावरूनही सिद्ध होत आहे पूर्वी पत्रलेखक आपल्या उपास्य दैवताच नाव पत्रावर लिहात पदरी कारकून

सुभेदार रुपराम चवधरी च्यातुर यक मोतीदाना। येकायकी रतण हारपले कसे कोपला भगवाना॥ मिरजवाले राव रास्ते गुण घेती सिंदेस्याइ। ईंचुरकर आणि बापु गोखले रणि जानती होलकर स्याई॥ रुपरामचा सर्मजाम बिनमोल कृत ठाइ ठाइ। रेणु रेखले सतर शुतारनाला तो मिगता नाई॥ छोटेखानी बाग बनविला फुलबागाची चेतुराई। नेला बब नळ बाढुन

---

वगैरे असलेले सरदार लोक पत्र दुसऱ्यानें लिहिले तरी स्वहस्ते तो श्रीकार काढीत असत नुसत्या श्रीकारावरूनहि इतिहास-संशोधकाना ऐतिहासिक पत्रलेखकाची वर्गवारी पुष्कळदा करता येऊ शकते गणराज असले की पटवर्धनाचे '*श्रीकृष्ण*' असले की दीक्षित पाटणकराचे इ सुभेदार—हा रुपरामाचा किताब मराठशाहींत मल्हारराव होळकर व पिलाजा जाधवराव अशा फारच थोड्या सरदाराना सुभेदार या बहुमानवाचक किताबाने गौरविले जात अस चातुर—चतुर यक—एक म्हणजेच अपूर्व असामान्य मोतीदाणा—मोत्याच्या दाण्यासारखा, विशेष महत्त्वाचा पुरुष मिरजवाले राव रास्ते इत्यादि—वेळोवेळीं रुपराम चौधरा आपल्या तोफखान्यासह मिरजकर पटवधन, रास्ते, शिंदे, विंचुरकर, होळकर आणि बापू गोखले यांच्यावरोबर लढायात कामकाजास होता व त्या लोकाना त्याच्या कामगिरीची चागली माहिती आहे असा भावाथ शिंदेशाही म्हणजे शिंद्याचे सैन्य सर्मजाम—सरजाम म्हणजे तोफखान्याचा सरजाम बिनमोल—उत्तम स्थितींत ठेवलेला कृत ठायीं ठायीं—रुपरामाचा तोफखाना व जिनसी सामान निरनिराळ्या गावीं '*डेपो*' ठेवलेले असे रेणु रेखले—रेणु या शब्दाचा अर्थ लागत नाही कदाचित रणरेकले असा शब्द असेल. रण रेकला म्हणजे रणगाडा रेक्ला किंवा रणगाडा असे शब्द जुन्या ऐतिहासिक पत्रातून वाचनात आहेत परंतु रणरेकला असा शब्द येथेच प्रथम आढळला सतर—सत्तर(?) शुतार नाला—शुतरनाळी बंदुका किंवा तोफा शुतरनाला म्हणजे उंटावरची तोफ तो मिगता नाई—? छोटेखानी बाग बनविला—रुपराम चौधराचा बाग पुण्यात प्रसिद्ध होता नेला बब नळ—पूर्वी मोठमोठे सरदार लोक पुण्यात आसपासच्या ठिकाणा

आणिला सेहर पुन्यामधि सवाई ॥ मुरत गेली किरत राहिली हेच मागणे श्रीकृष्णा ॥ २

डोळ्यास आणुन पानी आपा दादासी बोलाविले । आता आम्ही काही वाचत नाही ब्रह्मलिखत करमी लेहिले ॥ श्रीमतासी करा हिनती माहाल मुलुक घ्यावे आपले । सोडचिठ्या आपहास्ते दिधल्या । पाळिक लोक मनिं घाबरले ॥ बाबासाहेब धनी कृपाळू पत्र पाहताच सतोसले । त्याहानपनाची रीत वळकली सवस्थान राखुन ठेविले ॥ उमाबाई व रमाबाईला सांगा नका करू रोजना ॥ ३

श्रीमताने वस्त्र दिले बोलावुन रामचद्रासी । सिरी ठेविला हात. 'शुर्की सभाळावे सवस्थानासी'। हि ... ... आखर जाला र पडरीन्या राना ॥ शुभेदार रुपराम चौधरी च्यातुर यक मोतीदाना । येकायकी रतन हारपले कसे कोपला भगवाना ॥ ४

---

हून स्वतःसाठी पाण्याचे मोठमोठे नहर किंवा नळ बाधून आणीत; पुण्यांतील नाना फडणिसांचे सदाशिव आणि पुष्करणीच्या हौदाचे नळ, पेशव्यान्या कात्रेजेचे नळ व घाशिराम कोतवालाचा नळ हे प्रसिद्धच आहेत नळ म्हणजे नहर. बब म्हणजे मोठा. बंब is freely used to express thickness stoutness or largeness. etc. 'त्याचे येवढे हो बब शरीर हे' किंवा 'बारीक चार वासोळ्या घातल्या त्यापेक्षा एकच मोठा बब वासा घातला म्हणजे काम झाले' (मोल्सवर्थ). मौजे कोंडवे येथून रुपराम चौधरी याने पुण्यात नळ बांधून आणला होता. (पुणे नगर सशोधनवृत्त पुणे म्युनिसिपल दप्तरातील उतारा पृ. १५?) सवाई—नळाचे विशेषण. सवाई म्हणजे जुने कोणी कोणी नळ आणले होते त्याहून मोठा असा. हिनती—विनति. पाळिक लोक—आश्रित. बाबासाहेब—दु. बाजीराव. सस्थान राखुन ठेविले—सरदारी रुपरामान्या घराण्यांतच दत्तक देऊन कायम ठेवली. रोजना—शोक. शुर्की—सुर्खी, सुरेख, सुखाने. आखर—अत पडरीन्या—पटरीच्या (?)

# पेशव्याच्या शुक्रवार वाड्याचा पोवाडा

सदर पोवाडा श्री शकरराव जोशी यानी सोलापुरास मिळविला व तो भा इ स मडळाच्या त्रैमासिकात आठ–दहा वर्षांपूर्वी प्रसिद्ध केला त्यांनी पोवाड्यास ' शनिवार वाडा वणन' असे नांव दिलेलें असले तरी ते नक्की कोणच्या वाड्याच वर्णन आहे हे ओळखण्यास गमक पोवाड्यांत सांपडत नाही पण तें शनवार वाड्याचे वणन मात्र खास नसावे अस वाटते कारण दुसरा बाजीराव पहिल्या एकदोन वर्षानंतर शनवारवाड्यांत रहात नसे त्याने स्वत करिता शुक्रवार, बुधवार आणि विश्रामबाग असे वाडे किंवा दौलतखाने बांधले व पुण्याजवळ कोथरूड येथे चैनीकरिता एक जलमदिर व विलासगृह बाधले.

प्रस्तुत पोवाड्यात जलमदिराचा उल्लेख आहे त्यावरून कदाचित पोवाड्यातील वर्णन त्या कोथरूडच्या बागेंतील बगल्याच असाव अस वाटण्याचा सभव आहे शिवाय मदिर असाहि शब्द त्यात रामजोशी वापरतो व सामान्यत रूढ अथ देवाच मदिर किंवा लहानशी कलाकौशल्ययुक्त शिल्पाची इमारत असा आहे पण सस्कृतात मंदिर हा शब्द राजवाडा या अर्थीहि वापरला जातो व व्युत्पन्न रामजोशाने तो तसा येथ वापरला असण अशक्य नाही तथापि मदिर म्ह राजवाडा असला तरी शनिवारवाडा खास नव्हे

पोवाड्यात एके ठिकाणीं पुण शहर ह एक सरोवर व पेशव्याचा वाडा ह त्यातील कमल असें रूपक रामजोशाने केल आहे त्या अर्थी कोथरूडचे जलमदिर ह त्याला अभिप्रेत असाव पण कोथरूड पुण शहरात त्यावेळी व आजहि जमा होत नाही. पोवाड्यात गोकुळ अष्टमीचा समारभ वर्णिला आहे व पेशवे दप्तरातील नोंदीत बाजीरावाने गोकुळाष्टमी निमित्त रामजोशाच्या कथाहि करविल्याचें उल्लेख सापडतात पण तेवढ्यावरून तो अष्टमीचा उत्सव शनवारवाड्यातलाच अस निश्चित म्हणता येत नाही कारण पेशव्याना कुळाचार म्हणून गणेशोत्सवही दुसऱ्या बाजीरावाने केव्हा कोपरगावासही साजरा केल्याचे उल्लेख आहेत

पोवाडा शुक्रवार वाड्यासबधी असावा अस आमच मत आहे त्यासबधी बाजीरावान स्वहस्त लिहिलेल्या खासगी जमाखर्चात तिस्मा मया

सेन शके १७३० श्रावण उफ जमादिलाखर छ २३ जमादिलाखर या तारखेस पुढील नोद आहे

"१०० रु. रामजोसी सोलापूरकर याणी गाकुला अस्टमीस शुक्र वारचे वाड्यात कथा केली सबब पारण्याचे दुसरे दिवशी त्यास भोजनास बोलावून १०० रु. दक्षिणा दिला"

## रामजोशी चरित्रावर आणखी प्रकाश

आमच्या ऐतिहासिक पोवाड्याच्या पहिल्या भागांत आम्ही राम जोशाचें विस्तृत चरित्र दिल आहे आता १९२८ नतर चौदा वर्षांच्या काळात रामजोशाच्या चरित्रासबधीं उपलब्ध झालेले विश्वसनीय माहितीचे नवे कण एकत्र करून देता ते कणच आहत तथापि महत्वाचे आहेत रामजोशी याची उत्तम कीतनकार म्हणून पुण्यात १७९३ पासूनच ख्याति भाली हें पुढील जमाखर्ची नादीवरुन कळेल तालेवद खासगत गोविंदराव बाजी जोशी मु॥ पुण मुरु आबा तिस्सैन मया व अलफ इ॥ छ २४ सवाल वैशाख मास अवलसाल ता॥ छ ५ जिलकाद वगैरे

### देहनगी खर्च

२ रामजोशी सोलापुरकर याचे कथेचे
दिवसी गुरव आसामी २ पखवाज वाज
वावयासी बोलाविले त्यास

दुसऱ्या बाजीरावाची त्यावर बहाल मर्जी बसली ती कशा प्रकारची हाती हें पेशवे दप्तरांतील बाजीरावान स्वहस्ते लिहून ठेवलेल्या स्वत च्या खाजगी जमाखर्चावरून व बाजीरावाचा दिवाण सदाशिव माणकेश्वर याच्या जमा खर्चांतील नोदावरून चांगल कळून येते बाजीरावाच्या समान मर्यातेन जिल्हेज ऊर्फ माघमास या तारखेची नोंद अशा—"१०० रु रामजोसी सोलापूर कर यांचे बिऱ्हाडीं जेवावयास गेलों तेथे देवापुढे दक्षिणा ठेवली छ २ जिल्हेज" [ ३१ १ १८०८ ] त्यानतर त्याच महिन्यात पुन ११ जिल्हेज

(१) तिसा मयातेन शके १७३० जमादिलावल ऊर्फ आषाढ—२०० रुपये रामजोसी सोलापूर यास धर्मदाय दिल्हे. छ. १ जमादिलावल (२६-६-१८०८)

(२) तिसा मयातेन शके १७३० श्रावण ऊर्फ जमादिलाखर—१०० रु. रामजोसी सोलापूरकर याणी गोकुला अस्टमीस शुक्रवारचे वाड्यांत कथा केली. सबब पारण्याचे दुसरे दिवशी त्यास भोजनास बोलावून १०० रुपये दक्षिणा दिली. छ २३ जमादिलाखर (१६–८–१८०८)

(३) येकादसीस रामजोसी सोलापूरकर याणी कथा केली. सबब द्वादसीस त्यासी १०० रुपये दक्षिणा दिल्ही. छ. २५ जमादिलाखर (१८-८-१८०८).

या नोंदींवरून बाजीरावाची रामजोशावर कशी मर्जी बसली होती व तो त्याच्या घरीं मेजवानी घेण्याराहि कसा गेला होता तें कळतें.

बाजीरावाने राम जोशाला कारणपरत्वे दिलेल्या बिदागीखेरीज त्याला दरमहा २५ रुपयांची नेमणूकहि करून दिली होती. तसेच त्याच्यासाठीं महालानिहाय थोडीबहुत पट्टीहि जमा करून दिली होती हें बाजीरावाचा दिवाण सदाशिव माणकेश्वर याच्या जमाखर्चातील नोंदीवरून दिसेल.

"तालेबंद खासगत रा.सदाशिव माणकेश्वर सु॥ तिसा मयातेन व अलफ सन १२१८ इ॥ छ. १ माहे मोहरम फाल्गुनमास त ॥ छ. ३० माहे रबिलावल उर्फ वैशाखमास येकूण माहे तीन. स्वारी कोपरगांवास जाऊन पुण्यास येतो पावेतो (त्यांपैकी नोंदी १६–२–१८०९ ते १५–५–१८०९).

७५ रामजोसी सोलापुरकर यांस पेशजी दिनानाथ नाईक यांजकडून दोनसे रुपये देविले होते ते धर्मादाव खर्ची लिहिले. त्याची करारानी यादी कार्तिक मासीं जाली. पुढे रामजोसी यांची पटी गावगना धर्मादाय व॥ केली. त्यात दोनसे रुपये वजा करून घ्यावयाचे त्यांपैकीं वसूल आले ते जमा वि॥ गोविंद गोपाल माहे मोहरम फाल्गुनमास.

'ऽ चांदेले व तांदेये
२५ मौजे लोम

२५ मौजे आवसरी भोंडगांव वगैरे देहे ४ पे ॥

१० मौजे जकेली व घोटी
१० कसबे वावडे.

५० रामजोसी सोलापूरकर दरमहा नेमणूक रुपये २५ प्रा। तीन माही रु ७५ पो फालगुन मासाव ॥ माघ मासचे सुडात खर्ची लिहिले ते वजा रु. २५, बाकी चैत्र वैशाख दुमाही.

(२) तालेवद खासगत राजश्री सदाशिव माणकेश्वर इ॥ छ १० रजब भाद्रपद मास शु॥ ११ सुरुसमान मयातैन व अलफ सन १२१७ ता॥ सन सलास अशर मयातैन व अलफ सन १२२२ जा॥खर छ ५ जेष्ठ शुद्ध ७ अखेर किता जमा रुपये

१४५० पटी माहाला निहाये रामजोसी सोलापूरकर याजबद्दल विद्यमान व्यकाजी सदाशिव चादवड रुपये खेरीज मुशाहिरा धर्मादाय १३९६ रामजोसी सोलापूरकर

( २० ७ १८१२ ते ५ ६ १८१३ पर्यंत )

महाराष्ट्र सारस्वतकार कै. वि ल भावे याच्या सारस्वताच्या भाग २, तिसऱ्या आवृत्तींत पुढीलप्रमाणें लिहिले आहे. " एके वेळीं आपण काशीयात्रेस जावें असें मनात येऊन जोशीबोवानीं आपली ही इच्छा लोकास दर्शविली. तो स्वराज्याचा आबादानीचा काळ आणि त्यात अशा गुणिजनाची मागणी मग काय उणे ! लगेच पधरावीस हजारांची परडी जागच्याजागीं जमली. परतु जोशीबोवाना काशीयात्रेचा योगायोग नव्हता लवकरच दुखणें येऊन शके १७३० मध्ये विभवसवत्सरीं चैत्र शु १ जोशीबोवानी पुण्यासच देह ठेविला " वरील माहिती देऊन त्या पानाखाली मुद्दाम पुढील टीपही त्यांनी लिहिली आहे. " सुमारे वीस

बावीस वर्षांपूर्वी सोलापूर येथे जोशी बुवांच्या घरचे दप्तर पहावयास गेलो असता त्यांचे वशज रा. श्रीपाद गोपाळ जोशी यांनी सांगितलेल्या हकीकती-वरून वरील मजकूर व जोशीबुवांचा मृत्युकाळ दिला आहे. छापील पुस्तकांत मृत्युकाळ शके १७३४ हा आढळतो."

श्री भावे यांच्या वर दिलेल्या दोनही अवतरणांपैकीं रामजोशांनी काशी-यात्रेस जाण्याची इच्छा दर्शविली होती एवढा भाग पूर्णपणे बरोबर आहे. बाकी जागच्या जागीं १५–२० हजारांची परडी जमली वगैरे अतिशयोक्ति आहे त्याचप्रमाणे पूर्वीच्या लोकांनी दिलेलें मृत्यूचें साल भावे यांनी त्यांना मिळालेल्या नव्या माहितीवरून चूक ठरविलें आहे. पण अलीकडे आम्हास उपलब्ध झालेल्या व वर दिलेल्या जमाखर्ची अस्सल पुराव्यावरून भावे हेच चूक ठरतात त्यांपैकीं एका नोंदींत १४५० व १३९६ रुपये रामजोशास दिल्याचा उल्लेख आहे. ती नोंद २०–७–१८१२ ते ५–६–१८१३ या कालखंडातील आहे. अर्थात् रामजोशी ५ जून १८१३ पर्यंत तरी खास मेलेला नाही. सारांश मूळ शालिग्राम वगैरे चरित्रकार, किंवा रामजोशाचे खुद्द वशज श्री. गो जोशी व तिथीसुद्धा तपशील देणारे सारस्वतकार भावे हे सर्वच चूक ठरत आहेत. रामजोशाचा मृत्यु ५ जून १८१३ नंतर केव्हां तरी झाला इतकी पक्की गोष्ट या विवेचनावरून निष्पन्न होते. भारतवर्ष पतप्रधान शकावलींत सलास अशर मयातैन व अलफ १२१३ सालीं "सोलापूरकर रामजोशी मेले यांचा जन्म १७६२" अशी नोद आहेच.

पधरावीस हजाराची परडी जागच्याजागीं जमली हेंही विधान अति शयोक्त आहे असें आम्ही वर जो जमाखर्च दिला आहे त्यावरून दिसतेंच. आमचा पोवाड्याचा पहिला भाग प्रसिद्ध झाल्यानतर सुप्रसिद्ध महामहोपाध्याय रगानाथ रघुशास्त्री यांनी खुद्द रामजोशाच्या घरची त्याने स्वहस्ते लिहून ठेव-लेलीं काहीं काव्याचीं जीर्ण बाडे आम्हास दिलीं होतीं व त्यावरून पुष्कळसा भाग आम्ही नकलूनहि ठेविला होता पुढे तीं बाडे श्री. रघु यांनी श्री. लाड यास देण्यासाठीं आमचेकडून परत नेलीं. आम्ही नक्कल करून ठेवलेल्या रामजोशाच्या कवनापैकीं कांहीं भागच सर्वस्वी नवीन व पुराव्याचा म्हणून पुढें उतरून घेतो. त्यावरून काशीयात्रेस जाण्याबद्दल रामजोशांनी बाजी

XXXXXXजीस भेटले ॥ मग पाहुनी सताजी बावा आनद फर्दा छेदी देही पाहीले ॥ सीवाये रास्ते XXXXXX गुणात कस्ते XXXX

गौडमैथिली द्रविड कराडे ॥ कोकणस्थ देशस्तXXराडे ॥ रामानुज तैलग कानडे ॥ दुलभ ते बनवळXXX कासीकर मग ॥ ठासी कर मग उज्जैनकर मग बराणपुरकर सीन्नरकर । कालपी नगरकर । नासीक XX मग पुणतावेकर । जीतीकर मग बेतुरकर । कोपरगावकर । द्विजे सगमनेरी । येवलेकर वैदिक नादेडकर । XX प्रवरा सगम टोकेकर । कायेगावकर पैठणकर मनरथ XXXXX र ॥ राक्षसभुवनकर द्विजे अंबेड कर खेडकर । नाXXXXकर जालनेकर सोन पेटकर तसे मानवतकर XXX देकर आवढेकर ॥ परळीकर मुग्दलकर ॥ बीड

पैउनि हृदये विचारा ॥ तदुप XX दक्षीत नाना तारा ॥ बोला याच्या सुक्ष्म विच्यारा ॥ श्रीमताना करूनी XX रा ॥ हा भज बांधुनी दिधला धारा ॥ मीही बोलाया नीर्धारा ॥ श्रौत सुमडित खडमड पाधखडित ॥ XXX परशराम यज्ञेश्वर शास्त्री ॥ सूर्याभीद सिधेश्वर शास्त्री ॥ तिर्मिगळाचार्य नृसिंव्ह शास्त्री ॥ गुर्जर मग नारायेण शास्त्री ॥ विठ्ठल पंडित पढरपुरकर ॥ उपाध्याये भुपतींचे दादा ॥ करवे यासी बरवेपण सपादुनि जोसी ॥ विद्याधर निळकठ जोसी ॥ चांदेकर मग शकर जोशी ॥ नाम XXX इगेळ मयूर जोसी.



रावाकडे व पुण्यांतील त्याच्या आश्रित विद्वानांकडे सूत्र कसे लावले, त्याची सांपत्तिक स्थिति कशी होती हे कळून येते. मात्र त्या निमित्ताने तत्कालीन विद्वान लोकांचीहि नांवनिशी कळते हाहि एक लाभ आहे. वाडातील पानें अगदीं जीर्ण फाटून गेलेलीं. त्यांत उरला तेवढा मजकूर नकल केला.

॥ श्री ॥

आले राव बाजीपासीं ॥ या कविस घडावी कासी ॥ धृ ॥

धणिकाला मद्गुणचि कळेना ॥ कळते त्याला धनचि मिळेना ॥ ज्ञाता तरी शेठ तो निवळेना ॥ ग्राम्य जनाला हे आकळेना ॥ कोणासही मद्गुणची कळेना यासाठीं × × मर्म जाणता ॥ धर्मज्ञ प्रभु कर्मठ दादा ॥ नर्मरसिक क ×× चें मैं आसावा ॥ चेमे ×× कधी पाहावा ॥ तछनी ×– … … व मनोरथ आपुला ××

× … … नो वि हारा ॥ याणे साडि … . भाऊ जोग … … त इष्क रसीकाचा प्यारा ॥ त्या

( २ )

… .. .. … … सोलापुरकर जोशी

. . … . . घरा फिर्तांना थकलो ॥

… … अजिवात झुकलो ॥ काव्य कराया नाही चुकला काये करू लोभाला विकलो ॥ रात्रदिस घरदारा चुकलों ॥ वर्षं जाहाले–उन्हात पिकलो ॥ कर्ज खाऊनी येथे टिकलों ॥ परंतु आहे प्रथम दिवस हे भिक्षुक मडळी सुक्ष्म मधुर बोलती ॥ मत्कार्यावर नेत्रुन पडती ॥ तथे नृपतींची बडती ॥ शुभा-शुभे दैवानें घडती ॥ श्रौत सुमडित खडमड पक्ष्यखडित ॥ मल्हार श्रोती यांसी भेटलो ॥

( वरील पानाची पाठवाजू )

मग पाटकजीचे नंद व पौराणीक अणा ॥ चीमण भट ते आनद भट ब्रह्मगी मग सखाराम पौराणीक तुळसीबागेतील ॥ यवलेकर वैद्य पाहीले ॥ भाऊ वैद्य ही चीक सारे ॥ त ( उत्तम ? ) जाणते तपस्वी ॥ गोपाळाभिद गोसावी ॥ सखाराम गोसावी ॥ गायेक सीनरकर गोसावी ॥ नाना त्रिंबक आत्माराम पाहीले ॥ बापु वर्तक ठाकुर्दास तसे नारायण

xxxxxxजीस भेटलो ॥ मग पाहुनी सताजी बावा आनंद फदी छेदी हेही पाहीले ॥ सीवाये रास्ते xxxxxx गुणात कस्ते xxxx

गौडमैथिली द्रविड कराडे ॥ कोकणस्थ देशस्तxxराडे ॥ रामानुज तैलग कानडे ॥ दुर्लभ ते बनब्रह्मxxx कासीकर मग ॥ ठासी कर मग उज्जैनकर मग वराणपुरकर सीन्नरकर । कालपी नगरकर । नासीक xx मग पुणतांबेकर । जीतीकर मग बेतुरकर । कोपरगावकर । द्विजे सगमनेरी । येवलेकर वैदिक नादेडकर । xx प्रवरा संगम टोकेकर । कायेगांवकर पैठणकर मनरथ xxxxxर ॥ राक्षसभुवनकर द्विजे अंबेड-कर खेडकर । नाxxxxxकर जालनेकर सोन पेटकर तसे मानवतकर xxx देकर आवढेकर ॥ परळीकर मुग्दलकर ॥ बीड

घेउनि हृदये विचारा ॥ तदुप xx दर्क्षीत नाना तारा ॥ बोला याच्या सुक्ष्म विच्यारा ॥ श्रीमंतानीं करूनी xx रा ॥ हा मज बांधुनी दिधला धारा ॥ मीही बोलाया नीर्धारा ॥ श्रौत मुमडित खडमड पायखडित ॥ xxx परशराम यज्ञेश्वर शास्त्री ॥ सुर्याभीद सिधेश्वर शास्त्री ॥ तिर्मिगळाचार्य नृसिंव्ह शास्त्री ॥ गुर्जर मग नारायेण शास्त्री ॥ विठ्ठल पडित पंढरपुरकर ॥ उपाध्याये भुपतीचे दादा ॥ करवे यासी वरवेपण सपादुनि जोसी ॥ विद्याधर निळकंठ जोसी ॥ चांदेकर मग शकर जोशी ॥ नाम xxx डगेळ मयूर जोसी.



# पेशव्यांच्या शुक्रवार वाड्याचा पोवाडा

## १३

## ( शाहीर—रामजोशी )

कृष्णजन्म आनद वाटतो गोकुळ अज हे पुणे ॥ श्रीमताचे मदिर काही वसुदेवाहुनि उणे ॥ ध्रु ॥ अद्भुत कविचा वार पहा हो कृतमदिर चातुरी ॥ काय कल्पना अचाट शोभा बाहेर तसि भीतरी ॥ १ ॥ जिकडे तिकडे रग कटाडी खिडक्या जाळ्यावरी ॥ ज्याणे जेथें बसुनि पहावे तेथे सुख अतरी ॥ २ ॥ ठाई ठाई इवुद जळाचे अमृतरसाचे परी ॥ स्नाने करिती सध्या जपतप किति विप्राच्या हरी ॥ ३ ॥ जेथे नर नारायण पूज्या सांबासह आदरी ॥ प्रभुच्या हस्ते विप्रभोजने भोजन

---

*कृष्णजन्म आनंद वाटतो*—कृष्णजन्माचे वेळीं साऱ्या गोकुळात जसा आनदीआनद झाला व मोठा उत्सव आबालवृद्ध गोपगोपींनीं केला तसाच प्रकार आज पुणे शहरांत दिसत आहे. श्रीमतांचें मंदिर—मंदिर म्हणजे राजवाडा असा अर्थ; मात्र तो शनिवारवाडा नव्हे बाजीराव, पहिले फारच थोडे दिवस शनिवारवाड्यांत राहिला. त्यान शुक्रवार व विश्रामबाग हे दोन नवे राजवाडे स्वत.स राहण्याकरिता बाधले होते. त्यापैकीं कोणता तरी एक वाडा येथे कवीस अभिप्रेत असावा श्रीमंतांचे मंदिर कांही वसुदेवाहुन उणे—वसु म्ह. संपत्ति वसुदेव म्हणजे कुबेर. पेशव्यांचा राजवाडा अर्थात् कुबेराच्या भांडारासारखा सपन; मग तथे कशाची उणीव भासणार? असा अर्थ घेता येईल. अद्भुत कविचा वार— ? कृतमंदिर चातुरी—मंदिर किंवा राजवाडा बाधण्यातले कौशल्य. भीतरी—आत. रचनेत आत बाहेर अशी कल्पकता दाखविली आहे कीं कोठूनहि अमूप शोभाच दृष्टीस पडावी. कटाडी—मूळ शब्द कठाड किंवा कठारा म्हणजे कठडा ( a railing or paling (मोल्स) हरी—हारी, रागा. नर नारायण पूज्या सांबासह आदरी—राघोबाच्या वेळेपासून नरनारायण व साब यांची पूजा केली जात असे. बापाचें ते व्रत दुसऱ्या बाजीरावानेंहि यथासाग चालविलें होंते. रघुनाथराव व बाजीराव यांच्या सबधीच्या अनेक ऐतिहासिक पत्रातून साबाची पालकी किंवा नरनारायणाची पालकी असे उल्लेख येतात स्वारींत हे देव पालख्यातून बरोबर चालवीत त्यास अनुलक्षून साबाची पालकी असा शब्द येतो.

ऐका तरी ॥ ४ ॥ साम गर्दळी-दले तयावरि पक्वरस साखरपुरी ॥ भात

" शिवरात्रीचे दिवशीं मध्यरात्रीस सांबाची पूजा जाली ते समयी पांच तोफा जाइल्या.

[ १२ मार्च १७९६ खरे पत्र नं. ३७१० ]

छ. १७ जिल्हेजीं कूच करून पुण्यास स्वारी आली. श्रीमंताजवळ मुतसद्दी अथवा राऊत जवळ नसावा. दोन बाणाचे लांबीनें चालावें. बरोबर बाळाजीपंत अथवा रामचंद्र गवई तिसरा कोणी नाही. जिलबीचे लोकहि व लग्या नसतात. सांबाचे पुढे जिलब चालतात.

[ ८ मार्च १७९६ खरे पत्र नंबर ३७०४ ]

त्याजवरून सहा घटका रात्रीस श्रीमंताचे डेऱ्यास गेलो. तो श्रीमंत स्नान करून धोत्रे नेसत होते. मला पहातांच 'नमस्कार करू नका, कपाळी कांही लाविले नाही' म्हणोन आज्ञा जाली. धोत्रे नेसून कुदल्यांत जाऊन सध्येस बसले. मला राजश्री आपाजी राम सहस्रबुद्धे घेऊन सांबाचे दर्शनास राहुटीत गेले. सांबाचे दर्शन जाले. पंचमुखी स्फटिकाचे लिंग बहुत अपूर्व आहे. गवई यांचे गाणे होत होते.

[ ५ मे १८०१ खरे पत्र न. ६०५१ ]

श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांची स्वारी पौष शु॥ १४ पुण्यांत आली. रात्रौ विश्रामबागांत स्वारी होती. पौर्णिमेचे दिवशी मो॥ रा॥ वैजनाथ भट भागवत याचे घरी इष्टी करून फराळ करून सासवडास भोजनास गेले. भोजन पुण्यात न करावयाचे कारण सांब सासवडास राहिले. स्वारी-बरोबर आणले नाही. पूजा करून मग भोजन करावे याप्रमाणे नेम आहे. याजकरिता माघारी स्वारी गेली.

[ २ जानेवारी १८०१ खरे पत्र न. ५९९५ ]

वद्य ७ शुक्रवारी १२ घटिका दिवसास मुहूर्त होतां तेव्हां निघोन पर्वतीस गेले. [ दुसरे बाजीराव ] जरिपटका व साहेब नौबत हत्तीवर दिली. सायंकाळचे सहा घटिका दिवसास मुहूर्त. मग जामदारखाना व सांबाची देवपूजेची भांडीं वगैरे झाडून पुढे रवाना केली... ...

[ १ ऑगस्ट १८०१ चे पत्र खरे भाग १४
प. न. ६१०८. ]

# पेशव्यांच्या शुक्रवार वाड्याचा पोवाडा

## १३

## ( शाहीर–रामजोशी )

कृष्णजन्म आनद वाटतो गोकुळ अज हे पुणे ॥ श्रीमताचे मदिर काही वसुदेवाहुनि उणे ॥ ध्रु ॥ अद्भुत कविचा वार पहा हो कृतमदिर चातुरी ॥ काय कल्पना अचाट शोभा बाहेर तसि भितरी ॥ १ ॥ जिकडे तिकडे रग कटाडी खिडक्या जाळ्यावरी ॥ ज्याणे जेथें वसुनि पहावे तेथे सुख अतरी ॥ २ ॥ ठांई ठांई दवुद जळाचे अमृतरसाचे परी ॥ स्नाने करिती सध्या जपतप किति विप्राच्या हरी ॥ ३ ॥ जेथे नर नारायण पूज्या सांबासह आदरी ॥ प्रभुच्या हस्ते विप्रभोजने भोजन

---

कृष्णजन्म आनंद वाटतो—कृष्णजन्माचे वेळीं साऱ्या गोकुळात जसा आनदीआनद झाला व मोठा उत्सव आबालवृद्ध गोपगोपींनीं केला तसाच प्रकार आज पुणे शहरांत दिसत आहे. श्रीमतांचें मंदिर—मदिर म्हणजे राजवाडा असा अर्थ; मात्र तो शनिवारवाडा नव्हे. बाजीराव, पहिले फारच थोडे दिवस शनिवारवाड्यांत राहिला. त्यानें शुक्रवार व विश्रामबाग हे दोन नवे राजवाडे स्वतःस राहण्याकरिता बाधले होते. त्यापैकीं कोणता तरी एक वाडा येथे कवीस अभिप्रेत असावा श्रीमंतांचे मंदिर कांहीं वसुदेवाहुन उणे—वसु म्ह. संपत्ति. वसुदेव म्हणजे कुबेर. पेशव्यांचा राजवाडा अर्थात् कुबेराच्या भांडारासारखा सपन्न; मग तेथे कशाची उणीव भासणार? असा अर्थ घेतां येईल. अद्भुत कविचा वार— ? कृतमंदिर चातुरी—मादिर किंवा राजवाडा बांधण्यांतलें कौशल्य. भीतरी—आंत. रचनेत आत बाहेर अशी कल्पकता दाखविली आहे कीं कोठूनहि अमूप शोभाच दृष्टीस पडावी. कटाडी—मूळ शब्द कठाड किंवा कठारा म्हणजे कठडा (a railing or paling (मोल्स). हरी—हारी, रांगा. नर नारायण पूज्या सांबासह आदरी—राघोबाच्या वेळेपासून नरनारायण व सांब याची पूजा केली जात असे. बापाचें ते व्रत दुसऱ्या बाजीरावानेंहि यथासांग चालविलें होतें. रघुनाथराव व बाजीराव यांच्या सबधींच्या अनेक ऐतिहासिक पत्रातून सांबाची पालकी किंवा नरनारायणाची पालकी असे उल्लेख येतात. स्वारींत हे देव पालक्यांतून बरोबर चालवीत. त्यास अनुलक्षून सांबाची पालकी असा शब्द येतो.

केसरी भभुनि वाये सर्व वरपिती खिरी ॥ ५ ॥ पक्कदळाचे विडे सुवसनेज्या त्यावरि भर्जरी ॥ हारगळ्यामधे तुरे लटकती ज्याच्या त्याच्या शिरी॥६॥ गीत कला नतने दिवानिशी सदैव रसमाधुरी ॥ राजसु जाहालायेक वेळहा नित्योत्सव मदिरी ॥ ७ ॥ ज्या ज्या रुतुचे जसे यथोचित

---

नरनारायणासबधा पुढील नाद पाहा तालेवद माहाल जामदारखाना खासगी स्वारी राजश्री पतप्रधान स्वारी जुमर इ॥ छ २६ जिलकाद अश्वीन मास तागायत छ ३ जिल्हेज कार्तिक मास शके १७३८ धातनाम सवत्छरे सुरुसबा अशर मयातेन व अलफ या मथळ्याखाली नरनारायणासबधी पुढील उल्लेख आहे

१० छ २९ रोज वोवाळणी ७ सौ
दुर्गाबाई गोखली यास, १ सहलखच छ
३ जिल्हेज, ३ श्रीसाब व नरनारायणा
कडे ३ छ १ रोज मोहोरा १७.

---

२४

[ इतिहास सशोधक मडळ दप्तर, श्री स ग जोशी रुमाल ]

गर्दळी दळें—कर्दळी दळ म्हणजे कदलादल, केळीचीं पानें साभ्र म्हणजे सबध ठाव वायें सर्वे वरपिति खिरि—सनई वगैरे वाद्याच्या गोड आलापासह खिरी ओरपतात, म्हणजे ताडाने गोड पक्काने सेवन करतात व कानान त्याच वेळी मधुर सगीत श्रवण करतात वरपणे म्हणजे ओरपणे भुरके मारीत चव घेत खाणे सुवसने—याचा सबध विड्याकडे आहे नुसत्या पिकल्या पानाचे विडे नव्हत तर त्या विड्यावर सोनेरी वर्ख गुडाळ लेला असे वर्ख हे विड्याचे भरजरी सुवसन किंवा वस्त्र हार गळ्या मध्ये वगैरे—ब्राह्मणाचा हारतुरे घालून सन्मान करण्याचा परिपाठ अद्यापहि वसतपूजेच्या वेळी दिसून येतो ती जुनीच पेशवाईतील प्रथा आहे दिवानिशि—अहोरात्र राजसु—राजसूय यज्ञ राजसूय यज्ञाचा महोत्सव एकदाच काय तो धमराजाचे वेळी झाला पण बाजीरावा च्या कारकीर्दीत रोजच राजसूय यज्ञासारखा महोत्सव सुरू आहे

केसरी भशुनि वार्ये सवै वरपिती खिरी ॥ ५ ॥ पक्वदळाचे विडे सुवसने ज्या त्यावरि भर्जरी ॥ हार गळ्यामधे तुरे लटकती ज्याच्या त्याच्या शिरी॥६॥ गीत कला नर्तने दिवानिशी सदैव रसमाधुरी ॥ राजसु जाहाला येक वेळ हा नित्योत्सव मदिरी ॥ ७ ॥ ज्या ज्या रुतुचे जसे यथोचित

---

नरनारायणासवधी पुढील नाद पाहा तालेबद माहाल जामदारखाना खासगी स्वारी राजश्री पतप्रधान स्वारी जुन्नर इ॥ छ २६ जिलकाद अर्श्वीन मास तागायत छ ३ जिल्हेज कातिक मास शके १७३८ धातनाम सवत्छरे सुरुसबा अशर मयातेन व अलफ या मथळ्याखाली नरनारायणासबधी पुढील उल्लेख आहे

> १० छ २९ रोज वोवालणी ७ सौ दुर्गाबाई गोखली यास, १ सहलखच छ ३ जिल्हेज, ३ श्रीसाव व नरनारायणा कडे ३ छ १ रोज मोहोरा १७.

---

२४

[ इतिहास सशोधक मडळ दप्तर, श्री स ग जोशी रुमाल ]

गर्देळी दळें—कर्दळी दळ म्हणजे कदलीदल, केळीचीं पान साम्र म्हणजे सबध ठाव वार्ये सवै वरापिति खिरि—सनई वगैरे वाद्याच्या गोड आलापासह खिरा ओरपतात, म्हणजे तोंडाने गोड पक्वान सेवन करतात व कानान त्याच वेळीं मधुर सगीत श्रवण करतात वरपणे म्हणजे आरपणे भुरके मारीत चव घेत खाणें सुवसने—याचा सबध विड्याकडे आहे नुसत्या पिकल्या पानाचे विडे नव्हत तर त्या विड्यावर सोनेरी वख गुडाळ लेला असे वर्ख हें विड्याच भरजरी सुवसन किंवा वस्त्र हार गळ्या मध्ये वगैरे—ब्राह्मणाचा हारतुरे घालून सन्मान करण्याचा परिपाठ अद्यापहि वसतपूजेच्या वेळी दिसून येतो ती जुनीच पेशवाईतील प्रथा आहे दिवानिशि—अहोरात्र. राजसु—राजसूय यज्ञ राजसूय यज्ञाचा महोत्सव एकदाच काय तो धर्मराजाचे वेळीं झाला पण बाजीरावा च्या कारकीर्दीत रोजच राजसूय यज्ञासारखा महोत्सव सुरू आहे

विलास नाना परि ॥ भागवताचे थवे नवे किति कीर्तनरस [illegible]
तळीं धरुनिया शिरों मंदिरा पर्यंकहि येकसरी ॥ [illegible] कुल रेशमी बिछौने
जरबावीं झालरी ॥९॥ कविनें मंदिर कमळ म्हणावें जर ही सरसी पुरी ॥
पंकज मंदिर खरे न कमला राती कमलोदरी ॥१०॥ या सदनामध्ये निरंतर
श्री दिवाराति साजिरी ॥ संधेपासुनि निशांत शोभा दीप तिमिर सहरी ॥११॥

---

भागवत—भगवद्भक्त–हरदास. कीर्तनकार, पुराणिक वगैरे लोक [illegible] धरुनिया शिरों मंदिरा पर्यंकहि येक सरि—! कुल—सर्व, एकंजात, एकूण एक. बिछौने—बिछाने जर्बावी—जरीचे किंवा भरजरी. मू. श. पर्शिअन जरबाव म्हणजे जरतारी विणेचें भर्जरी वस्त्र असा आहे. सर्व पडदे व बिछाने रेशमाचे व त्याच्या झालरी भर्जरीच्या असा थाट. "कविनें मंदिर" पासून "कमलोदरीं" पर्यंत—जर ही (पुण्य) पुरी सरसी (मानली) तर कवीनें हें मंदिर कमळ आहे असें म्हणावें; आणि हें मन्दिर हेंच खरें पंकज; कारण कमला (लक्ष्मी) कमलोदरींच राहते हें प्रसिद्ध आहे. सरस म्हणजे मोठें तळें किंवा जलाशय (गीर्वाण लघुकोश) पुरीचें तें विशेषण करून संस्कृत पद्धतीनें ते स्त्रीलिंगी सरसि असें बनविलें आहे. राति–राहाति किंवा राहाते. कमला राते म्हणजे कमला राहाते. पुण्यनगरी किंवा पुणे शहर हा एक सुंदर जलाशय असून त्यांत विकास पावलेलें कमनीय कमळ म्हणजे हा पेशव्याचा राजवाडा असें रूपक करून कवि म्हणतो की या राजवाड्याला., कमळच म्हणणें योग्य कारण लक्ष्मी ही कमळांतच निवास करते. सर्व वैभवसंपन्नता येथे आहे. श्री—शोभा. संधे पासुनि—संध्याकाळपासून. निशान्त—निशेचा अन्त होईपर्यन्त म्हणजे उजाडेपर्यंत. फाणस—कंदील. मूळ पर्शिअन शब्द फानुस असा आहे. पोत—A link composed of rolls of coarse cloth. This portion together with the बिडी or iron handle constitute the मशाल or torch. दुशाखा—मूळ शब्द दुशाख (f) a stick with two or more curved iron-spikes fixed at the extremity for the reception of wicks, forming

फाणस कंदिल पोत दुशाखा हिलाल समया तरी ॥ समया अगणित मेणबत्तिचा प्रकाश अत पुरी ॥१२॥ सायकाळी सुवास लक्ष्मीसमा फिरति सुदरी ॥ दात मचकी किती कितिक त्या डोले घरि नागरी ॥ १३ ॥ ज्याच्या दामल मुक्ता सत्वुच कदुक शोभति उरी ॥ आनदे क्रीडती नारि किति न कळत या किनरी ॥ १४ ॥ सुभोवत्या अप्सरा पहा हो चिन्ह भासते कसे ॥ सूक्ष्म दृष्टीने पाहिल त्याला सत्याचि सर्वहि दिसे ॥ १५ ॥ यास्तव या घरि कृष्णजन्म हे सत्याचि लटिके नसे ॥ टाळ विणे किती रबाब भेरी वाद्यें वाजति रसे ॥ १६ ॥ दानधर्म आनद पहा हो किति निशिदिनि होतसे ॥ जेथे नरनारायण वसले स्वये भक्तिच्या गुणे ॥ ते मदिर कविराय वर्णितो नको म्हणावे कुणे ॥ १७ ॥

---

a sort of torch on occassions समया—समयास म्हणजे प्रसग विशेषीं राजवाड्यात फाणस, कदील, पोत, दुशाखा, हिलाल आणि समया सारख्या तेवत असतातच, त्याचा सदैव प्रकाश असतोच तथापि प्रसगविशेषीं अन्त पुरात म्हणजे दिवाणखान्यांत बैठक किंवा मेजवानी किंवा कांही समारभ असेल त्यावेळीं हड्यांतून हजारो मेणबत्त्या लावून लखलखाट केला जातो सुवसना—सुदर वस्त्र परिधान केलेल्या. दात—हस्तीदती असा अर्थ सस्कृत कोशात सापडतो दात मचकी म्हणजे हस्तीदती पलगावर डोले—डोलती (?) नागरी—पुरस्त्रिया किंवा नगरातील स्त्रिया दामल मुक्ता—मोत्याच्या माळा. ज्याच्या उन्नत वक्षस्थळावर मोत्याच्या माळा लोळत आहेत अशा स्त्रिया किन्नरी—यक्ष किन्नरी अप्सरा—या शब्दावर श्लेष असावा अप्सरा म्हणजे सुदर स्त्री, पण अप्सरा म्हणजे मुळांत पाण्यापासून जन्मलेली किंवा कमळ असाहि अर्थ आहे कवीनें पुण्याला सरोवराची उपमा वर दिलीच आहे तेव्हां पुण्यातील पेशव्याच्या वाड्यांतील या सुदर स्त्रिया म्हणजे अप्सरा किंवा कमळच होत हे सूक्ष्म दृष्टीनें पाहील त्याला पटेल असें कवी सांगतो. रबाब—A kind of fiddle, a rebeck, कुणे—कुणी, कोणी.

# पेशवाईचा पोवाडा

## १४

## ( शाहीर प्रभाकर )

श्रिमंत झाले लोक श्रिमंतापासुन लक्षावधी ॥ दुरावले श्रीमंत आपल्या दृष्टिस पडतिल कधीं ॥ ध्रुवपद ॥

शिंदे होळकर उत्तरेस पश्चिमेस सेनापती ॥ पूर्वेकडे भोसले, मिरजकर दक्षिणचे अधिपती ॥ हरीपंत नानाच्यापुढे किति बुद्धिवान लोपती ॥ बृहस्पती अणि शुक्र जसे काय तारांगणि तळपती ॥ विपूल त्या रास्त्याच्या घरीं आजवर संपत सततीं ॥ इचलकर्जिकर बारामतिकर सोयऱ्यांत

---

*'श्रिमंत झाले' येथपासून 'दृष्टिस पडतील कधीं' पर्यंत*—श्रीमंतांपासून म्हणजे पेशव्यांपासून सर्वसामान्यतः 'स्वामी' किंवा 'महाराज' हा किताब छत्रपतीसाठीं व 'श्रीमंत' हा किताब पेशव्यांसाठीं वापरला जाई. पेशव्यांच्यामुळे अनेक सरदार महत्पदास चढले. ते सरदार शिल्लक राहिले आहेत. परंतु ते पेशवे मात्र नष्ट झाले आहेत! "या पेशव्यांच्या कृतीवर बावन सरदार शिंदे होळकर वाढले भारी" ( पोवाडा ) *दुरावले इत्यादि*—पेशव्यांस दूर ब्रह्मावर्तास नेऊन ठेविलें त्यास अनुलक्षून.

*पश्चिमेस सेनापती*—सेनापति म्हणजे वास्तविक दाभाडे. पण पुढे सेनापतिपद किंवा सेनाखासखेली गायकवाडांकडे गेली. गायकवाडांचा मुलूख गुजराथ–काठेवाड पश्चिमेस आहे. *हरीपंत नानाच्या पुढे*—हरीपंत आणि नाना फडणिसांच्या पुढे.

*बृहस्पती*—गुरु. *विपुल त्या रास्त्याच्या घरीं आजवर संपत संतती*—पेशवाईतील सर्व सरदारांत रास्ते फार धनत्तर होते. मूळ ते सावकारी करीत असत. गोखल्यांचे रास्ते झाले इत्यादि दंतकथा उपलब्ध आहे ती याच घराण्याबाबत. नानासाहेब पेशव्याची बायको गोपिकाबाई ही रास्ते घराण्यांतीलच *सोयऱ्यांत धनपती*—पेशव्यांच्या घराण्यांत ज्या सोयरिकी झाल्या त्या बहुधा अत्यंत मातब्बर धनत्तर सावकार घराण्यांतील. उदाहरणार्थ, बारामतीकर जोशी, वासकर जोशी, कोल्हटकर, दीक्षित ( पटवर्धन ), साठे, थत्ते. थत्त्यांना तर 'नवलाखे थत्ते' असेच म्हणत असत. शरीरसंबंधामुळे पेशव्यांचे आप्त बनलेले हे सर्व लोक श्रीमंत होतेच.

धनपती ॥ ( चाल ) ॥ पाहा कृष्णराव चासकर ॥ कोकणचे कोल्हटकर ॥ महाशूर सोलापूरकर ॥ दीक्षित पेठे साठे ओक ओंकार सभाग्यामाधि ॥ फाटक थत्ते बरवे देवधर, पेशव्यांची रित सुधी ॥ १ ॥ दुरा० ॥

---

तथापि कर्तबगार, नामांकित मुत्सद्दी व लढवय्येही होते. बाळाजी विश्वनाथाची मुलगी अनुबाई ही इचलकरंजीकर घोरपड्यांना दिली होती. कोंकणचे कोल्हटकर—कृष्णाजी मोरेश्वर कोल्हटकर कसबे पेण याची कन्या भाऊ साहेब पेशव्यास दिली होती नाव पार्वतीबाई पेशवे ( पे. द. भाग ४४ पृष्ट ३२ ). सोलापूरकर—बाबूजी नाईक व आबाजी नाईक जोशी. राघोबादादाची मुलगी दुर्गाबाई ही बाबूजी नाइकाचा पुत्र पांडुरंग-राव यास दिली होती दीक्षित—दीक्षित-पटवर्धन; विश्वासराव पेशव्याची बायको लक्ष्मीबाई ही या दीक्षितांच्या घराण्यातली. पेठे—हे भाऊसाहेब पेशव्यांचे मामा लागत. पेठे आणि पटवर्धन यांची आपसांत चुरस असे. आणि पटवर्धन मंडळी पेठ्यांच्या पेशव्यांशी असलेल्या नात्याचा उल्लेख करून पेठ्यांना टोमणे देत असत. कर्नाटकच्या स्वारीत सेनापतिपद पेठ्यांकडे थोरल्या माधवरावाने दिले तेव्हां पेठे सांगतील ती हलकी कामगिरीहि पटवर्धनाना बजावावी लागली. त्या वेळीं पुरुषोत्तम दाजी पटवर्धनाने "श्रीमंत भाऊसाहेब यांचे मामा ते साऱ्या राज्याचे मामा!" असा टोमणा त्यास दिला होता.

त्याचप्रमाणे दुसरे एका प्रसंगी "आम्ही कांहीं लेकी अथवा बहिणी देऊन रोजगार मिळवून श्रीमंतांची कृपा सपादिली असा अर्थ नाहीं" असे मामाच्या तोंडावर त्यास चोख उत्तर दिले होते. चिमाजीअप्पास त्रिंबक-राव मामा पेठ्यांची बहीण दिलेली होती. (हरिवंशाची बखर पृ. ३५ व ३७) साठे—नारायणराव पेशव्याची बायको ही साठ्यांची मुलगी. लग्न १७६३ साली सिंहगडावर मोगलांच्या दंग्याच्या वेळीं झाले. ओक—प्रसिद्ध आनंदीबाई पेशवीण ही ओक घराण्यांतील. ओंकार—थोरले चिमाजी अप्पासाहेब पेशवे यांची मुलगी बयाबाई ही ओंकार घराण्यांत दिली होती. फाटक—दुसऱ्या बाजीरावाची चौथी बायको वाराणशीबाई ही नाना रास्ते फाटक वाईकर यांची कन्या. लग्न ता. ११-६-१८०६. थत्ते—

भागवत मंडलिक दामले रामदुर्गकर बळी ।। आपा बळवत पारजाइ

सवाई माधवरावाचे पहिलें लग्न १०-२-१७८३ रोजीं झालें. वधू रमाबाई ही केशव नाईक थत्ते ठोकेकर याची मुलगी. नाईक हा शब्द ऐतिहासिक कालीं सावकाराना लावीत असत. बर्वे—बाळाजी विश्वनाथ पेशव्याची बायको राधाबाई ही डुबेरकर बर्वे घराण्यातील. देवधर—दुसऱ्या बाजीरावाची पांचवी बायको. वेणूबाई ऊर्फ कुसाबाई ही हरी रामचंद्र देवधर (ढमढेरे) याची कन्या. पेंडसे—बाजीरावाची सहावी बायको सरस्वतीबाई ही बळवतराव पेंडशाची कन्या. भागवत—धोंडभट भागवत याची मुलगी शके १७०६ सालीं दुसऱ्या बाजीरावास दिली (पे द भाग ४४ पृ. २५). मंडलीक—सुप्रसिद्ध रावसाहेब मंडलीक याचे आजे धोंडोपंत मंडलीक याची कन्या दुसऱ्या बाजीरावास दिली होती. लग्न १८।६।१७९३ रोजी झालें. दामले—दुसऱ्या बाजीरावाचा भाऊ चिमणाजी अप्पा याची बायको सीताबाई ही मोरोपंत दामले याची कन्या

सोनवणी—महादजी सोनवणी हे सवाई माधवरावाच्या हुजुरपागेकडे चाबुकस्वार म्हणून कामास होते ते अखेरपर्यंत पेशव्यास एकनिष्ठ राहिले व ब्रह्मावर्तासहि बाजीरावाबरोबर गेले. तिकडेच ते वारले. अडेल मोठे खळी—म्हणजे गाडून उभे राहून लढणारे. दृढनिश्चयाने, चिकाटीने, प्राण पणास लाऊन लढणारे. रामाजी महादेव हे फार लढवय्ये व मुत्सद्दी गृहस्थ होते. त्याच्याकडे कोंकण सुभा असे. प्रथम ते वसई मोहिमेत पहिल्या बाजीरावाच्या वेळीं उदयास आले जजिरा घेण्याबाबत व आंग्रयाविरुद्ध मोहिमा करण्याबाबत याचाच पुढाकार असे कल्याणास याचे आडनाव सुभेदार असेच पडले आहे. हमेशा कार्लेकर देती भिल्ल कोळ्यांना गळी—या कार्लेकराचे नाव गंगाधर राम कार्लेकर पाहा, सवाई माधवराव पेशवे रोजनिशी vol. II पान १५९ नोंद ३६१ (७४३ अ) "सताजी सिरकदा कोळी याचें नावे अभयपत्र कीं तुवा कोळी मेळवून मुलखात धामधूम करीत होता. त्यास बजीद होऊन तुवा अर्ज केला की 'मागील अन्याय सरकारांतून माफ जाहल्यास हुजुर येऊन येकनिष्ठेने नोकरी करीन' म्हणून गंगाधर राम

रणांत फोडुन फळी ।। रामाजी माहादेव रणागणीं अडेल मोठे खळी ।। हमेशा

कालेकर याणी विदित केले त्याजवरून तुझे बजिदीवर नजर देऊन मागील अन्याय माफ करून हे अभयपत्र सादर केल असे तरी तुवा बेसवास सरकारात येऊन एकनिष्ठेने वर्तणूक करणे ''

कौल १ ( पेशव्यानी दिलेला कौल ) इसने समानीन २ रबिलावलचा हुकूम याचप्रमाणे तसलाच एक कौल त्याच भागातील पुढील पृष्ठावर छाप लेला आहे नोंद न ६५२ (७४४) पृ १६० गळी देणें—फाशी देण, फासावर चढविणे हमेशा—नेहमी भिल्ल कोळी वगैरे जाता पूर्वापार चोरट्या व उपद्व्यापी त्याचा मुलूख जगलाद्र्याखोऱ्यातील अडचणीचा न ते वन्य लोक यामुळे सध्या आफ्रिडी लोकाचे दगे ज्याप्रमाण सरहद्दावर सतत सुरू असतात व इग्रज सरकारला ते दूर प्रयत्नानी मोडून काढावे लाग तात त्याप्रमाणें तेव्हाहि पेशव्यांना कडक उपाय योजावे लागत कोळी, भिल्ल याचा बदोबस्त करणें फार कष्टाच काम आहे शिवाय त्या वेळीं सध्यासारखी शस्त्रास्त्राची किंवा वाहतुकीच्या यात्रिक साधनाची सोय नसल्यामुळे वाटेल त्या उपायानीं बडखोरावर जरब बसविणें एवढाच एक उपाय असे व तो शिवाजापासून सव लहान थोर ब्राह्मण मराठे सरदाराना नाइलाजान अमलात आणावा लागे उदाहरणार्थ, तिसैनमया व अलफ १ रजब ( १७८९ ९० ) या तारखेचा पेशव्याचा हुकूम पाहा

" ६५६ [ १००७ ] भिल्लानी मुलकात दगा केला कण्हेरा किल्ला घेतला सबब त्याचे पारिपत्यास सरकारातून फौंज पाठवून पारिपत्य करून किल्ला सरकारात घेतला तेथून भिल्ल पळोन गेले आणि बचाद होऊन सरकारात भिल्लाना बाळाजी भिकाजा व बाजी नारायण यांचे मारफतीन माहादाजी अनत याजपाशी बोलण लाविल कीं, पूर्वी श्रीमत कैलासवासी बाजाराव-साहेब याणी तह ठरावून गावगना हक्क द्यावा, भिल्लानीं जागल गावगन्ना करावी, याप्रमाणें करार केला आहे त्याप्रमाणें हालीं चालत नाही, त्यास रहिवी कृपाळू होऊन आमचा हक्क गावगन्ना चालवावा मुलखात दगा करणार नाही म्हणोन, त्याजवरून भिल्लांचे नाइकापासून मुचलका सरकारांत लेहून घेतला की, रानांत व डागरात हद्द्या आहेत त्या मोडाव्या गावगन्ना राहून जागल करावी हक्क पूर्वीचे कराराप्रमाणें गावगन्ना सुदामत घ्यावा

कोरळकर देती भिल्ल कोल्यांना गळीं ॥ झांशिवाले बिनिवाले बुंदेले रिपु खांडेकर छळी ॥ कितीक लक्षाधीश प्रतिष्ठित ही घरचीं मंडळीं ॥ चाल ॥ मर्दाने विंचूरकर भरपूर नारो शंकर ॥ विश्वासुक ओढेकर ॥ चाल ॥ नाय-

---

हत्यार तरवार बंदूक चालगूं नये. कमठा व तीर दरगांवीं जागलीस व वाटघाट चालवावयास बाळगावा; आणि लाखेचा लाखोटा गळ्यांत सरकारचे मोहरेचा बाळगावा व मोहरेचे लाखोट्याशिवाय भिल्ल राहील त्याचें पारिपत्य करावें. याप्रमाणें करार करून सरकारांतून तीर्थस्वरूप कैलासवासी बाजीरावसाहेब यांणी गांवगन्ना हक्क चालावयाचा करार केला आहे त्याप्रमाणें हल्ली करार करून भिल्लापासून गावगन्ना जागलीची व वाटघाट चालवावयाची चाकरी घेऊन व गळ्यांत लाखेचा लाखोटा सरकारचे मोहरेचा बांधून हक्क पूर्वीपासून चालत असेल, त्याचा भोगवटा मनास आणून गांव-गन्ना रयत निसबत ताकीद करून सुदामतप्रमाणे हक्क चालवीत जाणें म्हणोन महालानिहाय वगैरे यांचे नांवें चिटणिसी पत्रें.

[वाटकृत—पेशवा डायरी, सवाई माधवराव भाग २ पृ० १६८.]

झाशीवाले—नेवाळकर बिनीवाले—विसाजी कृष्ण बुंदेले—गोविंदपंत बुंदेले आडनांव खेर. रिपु खांडेकर छळी—बुंदेले, बिनीवाले झाशीवाले आणि खांडेकर यांनी शत्रूला जर्जर केले. खांडेकरांचे मूळ अर्जक पुरुष दोन. गणेश संभाजी व गोपाळ संभाजी. पथ पिंपळोदची जहागीर मूळ मंडावळ परगण्यांतील. पेशव्यांनी तो *मुलुख जिंकून धारकर पवारांना दिला; पण पुढें १७६५ सालीं पथ पिंपळोदची जहागीर मात्र* निराळी काढून घेऊन खांडेकरांच्या हवाली केली. विंचूरकर—विठ्ठल शिवदेव. नारोशंकर—राजेबहादर मालेगांवकर. ओढेकर—रंगराव ओढेकर. मूळ पुरुष शिवराव शंकर पाहिल्या बाजीरावा-जवळ शिलेदार होता. दाभाड्याशीं जी डभईची लढाई झाली त्या वेळेस त्याने आनंदराव पवारास फोडून आणलें म्हणून बाजीरावानें पुढें त्यास आनंदरावाची दिवाणगिरी दिली. शिवराव शंकरचा ज्येष्ठ पुत्र रंगराव ओढेकर. तो कुंभेरीचे वेढ्यांत जाटांच्या छाप्यांत मारला गेला. नंतर त्याचा भाऊ त्रिंबकराव शिवदेव सरदारी करूं लागला. ओढेकरास पवा-

ळकर नाईक धायबर पाटणकर फाकडे ॥ मुधोळ गुत्ती गजेंद्रगडकर स्वस्थानीं घोरपडे ॥ गुजर घाटगे माहाडिक मोहिते विचारे शिर्के बडे ॥ चाल ॥ बाद्द माने म्हसवडकर ॥ आठवले उबरखेडकर ॥ रणनवरे राजवडकर ॥ पिसाळ

---

भाऊसाहेब याजपासी (पानपतास) सेवा मेहनत जे करावयाचे ते केली. निदान समई घोडा तेथेच ठार जाहाला आणि तीर्थरूप महिपतराव बाबर व लिंबाजी बाबर सतर असामी जागाचवरी राहिली ।। परंतु ईश्वरे माव राहिली नाहीं. माघारा येती तरी श्रीमंतांचे पायाजवळ सार्थकच होते. परंतु ईश्वराचे चितास न आले." (पेशवे दप्तर, भाग ३८, प. न. २१, पृ. १८)
या घराण्यांत नारायणजी बाबर व आनदराव बाबर हे नामांकित सरदार होऊन गेले. *या घराण्याचा मूळ पुरुष अबोजी विन जैतोजी. त्याचा मुलगा* बहिरोजी. हा बहिरोजी बाळाजी विश्वनाथापासून पेशव्यांचा सरदार होता. त्याचे ५०० स्वारांचें पथक असून त्यास पालखीचा मान होता. शिंदांना जामगांव जहागिर दिले, त्याच्या आर्धी ते गांव बहिरोजीलाच सरजामात दिलें होते. हा बहिरोजी पानपतच्या युद्धांत ठार झाला. याला दोन मुलगे. एक नारायणजी बाबर व दुसरा आनदराव बाबर. बापाप्रमाणेच हे दोघेहि स्वामीसेवा वजावीत असतां धारातीर्थी पतन पावले. नारायणजी बाबर शके १७१२ त *टिपूच्या स्वारींत* धारवाडच्या वेढ्यांत पडला. नारायणजी बाबराकडे मौजे सातर्डी, रहटी मौजे साकत परगणे जामखेड व रतलगांव परगणे पांडे पेडगांव व मौजे शिरसोफळ तर्फ पाटस, सरंजामास दिलेले होते. आनदराव बाबर हा बापू गोखल्याबरोबर अष्टी–येवतीच्या लढाईत मेला.

नारायणराव बाबर १७९० साली नोव्हेंबरांत धारवाडच्या वेढ्यांत गोळी लागून मेला. किल्लेकऱ्यांच्या तोफा काबीज करावयाच्या होत्या तेव्हा परशुरामभाऊ पटवर्धन यांनीं ती महत्त्वाची कामगिरी नारायणजी बाबर व *सखोजी काटे या नामांकित पथक्यांना सांगितली होती. नारायणजी* बाबराबद्दल सेनापती परशुराम भाऊंना किती आदर होता हे पुढील समकालीन पत्रावरून कळेल. " तों जिकडे या दोन्ही पागा गेल्या होत्या त्याजवर किल्यावरून गोळे मारीतच होते. तेथे एक गोळा येऊन खुद्द नारायणजी बाबर

*शितोळे वाघ आयतुळे लढाईला ते आधीं ॥ शाहामिरखा रोहिले, फिरंगी,* पठाण, आरब, सिधी ॥ ३ ॥ दुरा ० ॥

---

यासर्चा बसला. डावे हातचे फऱ्याजवळ मागेसी बसला. तो उजवे कुशीस पार होऊनि गेला मशार निल्हे ठार झाले हे वर्तमान आले. तेव्हां यजमान बहुत कष्टी झाले. *नारायणजी बावरासारखा मनुष्य जाया होऊन* जर काम काहींच न जाले तर ठीक नव्हे असे मनात आणून कप्तान लिटलीस सागितले कीं, खामखा आम्हापुढे तोफा आल्या आहेत त्या पाडाव कराव्या तुम्ही करीत असल्यास बरे, नाहींतर आम्ही गाडदी उठवितों, आणि फौजाहि उठवितो " ( खरे पान ४२९८ )

आनदराव बाबर अष्टीस लढताना मेला त्याच्या पराक्रमाचा उल्लेख प्रभाकर शाहीराने पुढीलप्रमाणे केला आहे

" माघ शुद्ध पौर्णिमेस बापूसाहेब रणीं भिडले । जखम करून जनिलास फिरता जन म्हणती पडले । गोविंदराव घोरपड्याचे दोन हात भले झडले । आनदराव बाबर ढिगामधिं खुप जाऊन गडले " आपा बळवत-- बळवतराव मेहेंदळ्यांचा मुलगा. मूळ पुरूष हरीहरेश्वरास राहाणारे बहिरव भट त्याना दोन मुलगे. एक विश्वनाथ भट व दुसरा गणपत राव हे दोघे बाळाजी विश्वनाथाच्या सख्खे बहिणीचे लेक म्हणजे भाचे लागत होते पुढे बाळाजी विश्वनाथाने गणपतरावास पागत नोकरीस घेतले गणपतरावाचा मुलगा रामचद्र ऊर्फ बळवंतराव तो पानपतावर पडला त्याचा मुलगा तो आपा बळवत. पेशव्यानी स्वाऱ्या केल्या, तितक्यात आपा बळवतानी चागली कामगिरी केली ( कैफीयती वाड पा. १७२ )

रामाजी माहादेव--रामाजी माहादेव बिवलकर हा कल्याणचा पहिला सुभेदार. यानें देवळे, विहिरीही बरींच बांधिलीं. लोहगडनजीक डोंगरगांव येथील विहिरीवर खालील लेख आहे.

" रामाजी महादेव बिवलकर श. १६८८ व्ययनाम संवत्सरे चैत्र अधिक प्र॥ " श. १६८१ च्या पूर्वी १२ वर्षांपासून रामाजी माहादेव सुभेदार होता. चार पिढ्या या घराण्यात सुभेदारी चालली. वशावळ

ताकपीर थोरात पांढरे स्वामीपदिं सादर॥ घुळप यांचा इम्रज

---

येणेप्रमाणे—रामाजी महादेव—आनंदराव राम—रामराव अनंत—आनंदराव राम.

रामाजी महादेव शके १६९४ च्या श्रावण महिन्यांत पुणे मुक्कामी वारला व त्याची बायको श. १६९७ च्या आश्विनांत वारली. (पेशवाईच्या सांवलींत, प्रस्तावना पृ. ५). स्वस्थानी—सस्थांनी. शहामीरखा—१७८० साली जनरल गॉडर्ड यांशी कोंकणांत मराठ्यांच्या लढाया झाल्या, तेव्हा नाना फडणिसांनी ईर्षेने इग्रजी पायदळाशीं बरोबरीने लटणारे येलके देशी पायदळ चाकरीस ठेवले. त्या कणखर व कजाख लोकांपैकींच शाहामीरखान पठाण होता. त्याच्या हाताखाली एक अरब पलटण असे. खर्ड्यांच्या लढाईतहि तो होता. प्रभाकर शाहिराने आपल्या खर्ड्याच्या पोवाड्यांत तिसऱ्या चौकांत शहामतखा नांवाच्या, किराणी सरदाराचा उल्लेख केला आहे, तो हाच. नाना फडर्णीस मेल्यावर दुसऱ्या बाजीरावाने त्याच्या पक्षाचे मुत्सद्दी व सरदार कैद करविले. शनवारवाड्यांत (१४ जून १८०० सालीं) हा प्रकार केला तेव्हा लगेच त्या सरदारांच्या पदरीं असलेल्या जबरदस्त अरब पठाणांनी निकराचे युद्ध केले. तरी त्यांवर सवाई जबरदस्ती करून सर्व अरब काढून टाकण्यांत आले. नाना चक्रदेव याला शनवारवाड्याच्या आरसे महालांत कैद केले तेव्हां त्याच्याबरोबर आलेल्या शहामीरखानाच्या तीनशे लोकांनी दगा केला. त्यावेळी त्यांची कशी तरी समजूत काढण्यांत आली. पुढे नानाचे वाड्यांत राहून अरबानी दगा केला तेव्हां बाजीरावाने वाड्यावर तोफा लावल्या त्यात अरबाचे दहा व पेशवे शिंदे यांचे वीस माणूस ठार झाले. भवानी पेठेंत शहामीरखानाचा वाडा होता तोही लढला. शे-दीडशे माणूस जखमी झाले. शहामीरखानाचा लेकही पडला. नतर शहामीरखान आपल्या हाताने आपल्या बायकास मारून वाड्याबाहेर आला. त्यावेळीं त्याच्या मांडीस गोळी लागली. पुढे शिंद्यांनी मध्यस्थी करून स्वतः जामीन राहून अरबांच्या पगाराचा पेशव्यांकडून फडशा करवून देऊन अखेर शाहामीरखान वगैरे अरब पुण्याबाहेर घातले. (खरे पान ६४५० ते ६४५५).

टोपी काढुन करति आदर ॥ श्रीमंतांचे प्रतिबिंब अली बाहादर समशेर बाहादर ॥ कुशावा हैबतशिंग सजेले काय रूप सुंदर ॥ सातारकर पोतनीस मुख्य चिटणीस लेखक नादर ॥ छत्रपतिस विनवून देविती श्रीमंतांस चादर ॥ चाल ॥ निळकंठराव धारकरी । संनिध त्यांची चाकरी ॥ मोहीम हैबतराव करी ॥ बाबुराव हरि सखाराम हरि शूर वीरांचे क्षुधी ॥ अहकारी मल्हारराव जगजीवन नसे परबुधी ॥४॥ दुरा०॥

धन्य प्रभु पेशवे ज्याचे ऐश्वर्य बघुन मन रिझे ॥ परशत्रूचें शौर्य ठांइच्या ठांई प्रसर्गी थिजे ॥ सुखी लोक मुलखांत केशरी शाल घरोघर शिजे । गृहस्थ भिक्षुकांचें गौरवे तुपांत मनगट भिजे ॥ तीर्थोतीर्थी निल्य शेरभर सोनें सकाळीं झिजे ॥ नाहिं दुःख कोणास पलगीं आनदांत जन निजे ॥ चाल ॥ ईश्वरा असे हे धनी ॥ महा पराक्रमी साधनी ॥ सर्वत्र सगुण शोधुनी ॥ गगु हैबती म्हणे जयाचे विघ्न गजानन वधी ॥ महादेव गुणि प्रभाकराचें कवन शर्करा दुधीं ॥ श्रिमत झाले लोक श्रिमंतांपासुन लक्षावधी ॥ ५ ॥

---

श्रीमंतांचे प्रतिबिंब—कुशावा हैबतसिंग सजेले काय रूप सुंदर—हें सर्व पेशव्यांचे लेकावळे म्हणजे उपास्त्रियांचे पुत्र. समशेर बहाद्दर हा मस्तानीपासून झालेला मुलगा. त्याचा मुलगा अली बहाद्दर, पुन्हां त्या अलीबहाद्दरचा मुलगा समशेर बहाद्दर. हैबतसिंग, कृष्णसिंग व लक्ष्मणसिंग हे नानासाहेब पेशव्याचे लेकावळे. कुशावा म्हणजेच कृष्णसिंग. कृष्णसिंगाचा मुलगा कोंडीरामसिंग. हैबतसिंगाच्या मुलाचें नांव ठाऊक नाहीं. पण खंडेराव व गणपतराव हे हैबतसिंगाचे नातू होते. हैबतसिंग हा सन १८३२ सालीं वैशाख व ॥ ३० स वारला. त्याच्या आधीं लक्ष्मणसिंग १८३१ सालीं भाद्रपद मासीं वारला होता. लक्ष्मणसिंगाला दोन मुलगे होते. पहिल्या बाजीरावसाहेबांचे व पेशव्यांचे हे लेकावळे फार दूर होते. त्यांची बरदास्त औरस पुत्रामारखीच ठेवण्यांत येत असे.

# आप्पा देसाई निपाणकराचा पोवाडा

आप्पा देसाई याचें खरें नांव शिधोजीराव नाईक निंबाळकर. नणंदीकर देसाई म्हणून जें पुरातन लिंगायत घराणें होतें, त्यापैकींच हा होय. या घराण्याचा मूळ पुरुष शिदगवडा. हे घराणें आदिलशाही कारकीर्दीपासून शिरगुप्पी व निपाणी या गांवांचे इनामदार होते. हे घराणें मूळचे लिंगायत असून मराठशाहींत मराठे झाले. शिदगवडाचा मुलगा रघुनाथराव. रघुनाथरावाचा मुरारराव. मुररारावास दोन बायका होत्या. थोरलीला एक पुत्र, व धाकटीला तीन झाले. थोरलीचा पुत्र तोच पोवाड्याचा नायक शिधोजीराव ऊर्फ आप्पा देसाई.

त्याचा जन्म शके १६९६ म्हणजे सन १७७४ साली झाला. शिधोजीरावाची आई आणि कोल्हापूरकर छत्रपती शिवाजीराजे यांची राणी या सख्या बहिणी होत्या. अर्थात् शिधोजीरावाचें लहानपणापासूनच छत्रपतींच्या कुटुंबांत फार जाणें येणें असे. किंबहुना महाराज त्याला पुत्रासारखें वागवीत व हाही त्यास वडिलाप्रमाणे मानी. शिधोजीराव लहानपणापासून कोल्हापुरींच राहिला होता. तो अत्यंत धाडसी व शूर शिपाई असल्यामुळे महाराजांनीं त्याला आपल्या खास एकांडे मानकऱ्यांत जागा दिली होती. असे असतांही एक गोष्टीमुळे शिदोजीरावाचें व छत्रपतीचें कायमचें हाडवैर पडण्याचा योगायोग आला,

त्याचें कारण असें की शिदोजीरावाचें लग्न गजेंद्रगडकर घोरपडे अमीर उल उमराव यांच्या मुलीशीं व्हावयाचें ठरलें; परंतु पुढे कांहीं कारणानें महाराजांनीं तें मोडून ती मुलगी हिम्मत बहाद्दर चव्हाण उमदेतुल उमराव या मदरच्या कुलवंत सरदारास दिली. या अपमानामुळें शिधोजीरावास भयंकर द्वेष आला व त्यानें सूड घेण्याचा मनांत निश्चय केला व आतां प्रत्यक्ष छत्रपतीची मुलगीच बायको करीन तर नांवाचा शिधोजीराव अशी शपथ वाहिली व तसें स्पष्ट बोलून दाखवून त्यानें कोल्हापूर सोडलें व कोल्हापूरकरांचे हाडवैरी सुप्रसिद्ध परशुरामभाऊ पटवर्धन यांच्या पदरीं तो जाऊन राहिला.

त्याच्या शिपाईगिरीबद्दल वादच नव्हता. भाऊनें त्याला आपल्या सैन्यांत सरदारी दिली. मंतर पट्टणकुडीच्या सुप्रसिद्ध लढाईंत व त्यानंतर पट्टण कुडीचा सूड घेण्याकरितां झालेल्या कोल्हापूरवरच्या दुसऱ्या स्वारींत शिधोजीराव हजर होता. पुढे या अफाट माणसाचें दुसऱ्या एका अफाट माणसाशीं सूत्र

जमले. तो मनुष्य म्हणजे प्रसिद्ध सर्जेराव घाटगा. हे दोघेही जितके धाडसी तितकेच कृतघ्न, उलट्या काळजाचे क्रूरकर्म होते. कोल्हापूरच्या सन १८०० मधील स्वारीनंतर घाडग्याच्या अनुमताने याने मिरज वगैरे पटवर्धनांवरच सारख्या स्वाऱ्या करून मिरजेपासून विजापूरपर्यंतचा प्रदेश उध्वस्त करून सोडला. धोंडजी वाघाविरुद्ध झालेल्या मोहिमेत वेल्सले बरोबर निपाणकर होता. तसेच १८०३ नंतर शिंद्याविरुद्ध झालेल्या लढाईत असई येथे पेशव्यांतर्फे हजर होता. इंग्रजांनी बाजीरावाजवळ त्याची शिफारस केल्यामुळे त्यास पेशवे सरकारचे सरलष्करपद देण्यात आले तसेच त्याचा ३ लक्ष २८ हजार रुपयांचा सरंजाम कायम करण्यांत येऊन सरलष्करीबद्दल जादा २१३१२० रु. नवीन सरंजाम देण्यात आला. त्याखेरीज नवीन २००० स्वारांची फौज ठेवण्यासाठी चिकोडी व मनोळी हे दोन तालुके लावून देण्यांत आले निपाणकराने आपल्या लष्करांत अरब लोकांचा पुष्कळच भरणा केला. बाजीराव पेशव्यांची बहाल मर्जी असल्यामुळे त्याने जुलमजबरदस्तीची सीमा करून सोडली. आधीच भूत आणि त्याला बाजीरावासारख्या भूतनाथाचा वरदहस्त. यामुळे सर्जेराव घाडग्याप्रमाणेच याने उत्पातांची परिसीमा केली. कोल्हापुरकराचा सूड घेण्याचा त्याचा कृतनिश्चय असल्यामुळें पेशव्यानी चिकोडी व मनोळी हे जे कोल्हापूरकरांचे दोन तालुके निपाणकरास लावून दिले होते ते त्याने जबरदस्तीनें ताब्यांत घेण्यास सुरवात केली तेव्हा छत्रपतीलाहि युद्धास तयार होणें भाग पडलें. सावगांव येथे दोघांची निकराची लढाई ता. ४ फेब्रुवारी १८०८ रोजीं झाली. यांत छत्रपतीची दाणादाण उडाली. निपाणकराने छत्रपतीचीं सुमारें दोन हजार माणसें मारलीं, अडीच हजार जखमी केलीं व चारपाच मोठमोठे सरदार पाडाव नेले. खुद्द महाराजांना वेढून त्याना जखमा केल्या. पण रायाजी जाधव यांनी त्यास मोठ्या शर्तीने रणांतून बाहेर काढून वांचविले. या पराभवामुळे चिकोडी मनोळी व हुक्केरी परगणाहि निपाणकराने कबजांत घेतला.

अखेर कांही तरी करून निपाणकराचें भूत कायमचें शांत केलें पाहिजे म्हणून छत्रपतींनी पेशव्यामार्फत तहाचे बोलणें लावलें अर्थात निपाणकराने पहिलीच अट ही घातली की छत्रपतींची राजकन्या आधी

मजला द्यावी तर पुढे इतर बोलणें! नाइलाज होऊन महाराजांना रुकार द्यावा लागला व शके १७३० वैशाख शुद्धपक्षी विवाह ठरला. पण झाला तो सारा राक्षस विवाहाचाच प्रकार झाला. उभयपक्षीं दग्याची भीति यामुळे निपाणकरानें आर्धा हिंमत बहाद्दर चव्हाणास आपलेकडे ओलीस ठेवून घेतले. नंतर निपाणकर आपली निवडक फौज घेऊन करवीरास आला व शहरचीं नाकेबंदी करुन त्याने वाड्याभोवती नागव्या तलवारींचा व तोंडे पेटवून जय्यत केलेल्या बंदुकबारदारांचा पहारा ठेवला व अशा रीतीने एकदांचा विवाह २१ जून १८०८ रोजीं झाला. सांगण्यासारखी आणखी विशेष गोष्ट ही कीं लग्नसमारंभाचे वेळीं कांहीं दगा असल्याचा संशय निपाणकरास आला त्याबरोबर त्याने अक्षत, पडतांच नवरी घेऊन तावडतोब निपाणी गांठली.

हा राक्षस विवाहाचा समारंभ जितका भयंकर तितकाच करुण व तितकाच विनोदीहि होता. पुढे दिलेल्या पोवाड्यांत शाहिराने केलेलें वर्णन वाचतांना एकाच वेळीं या तिन्ही रसांचा कांहीं विचित्र अनुभव आल्याखेरीज राहणार नाही. सुप्रसिद्ध त्राटिका नाटकांतील प्रतापरावाच्या जबरदस्तीच्या लग्नसोहळ्यानीं त्या प्रसंगीं आठवण होणे अपरिहार्य आहे. तथापि प्रतापरावाचा क्रूरपणा वरपांगी खोटा असल्यामुळें त्राटिकेच्या दृष्टीनें करुणरस निर्माण होत असला तरी प्रेक्षकाच्या दृष्टीनें विनोद किंवा हास्यरसच निर्माण होतो. पण येथे करुण व भयानक हेच रस उत्कट होते. शाहिराने प्रत्यक्ष लग्न सोहळ्याचे जें वर्णन केले आहे ते मात्र विनोदी आहे.

"कुठे आहे माझी सुंदरा वोढा बाहीर ॥ दरारारा मुलगी वोढुन बाहीर उभा कर ॥ गरारारा त्यानें आरब बसविले सार ॥ नाही बोवले मांडव जमिनीवर ॥ त्यांनें उगाच रेघा ओढिल्या भिंतीवर ॥ नाही भट विरामण कुणी बलाविला म्होर ॥ भटास विचारतो मोलुर लबाडसार ॥ ती आपल्या रांड करतो बोवल्यावर ॥ सारे लोक उभे केले भोवत्या भोर ॥ दिले एकेकाला तांदुळ मुठमुटभर ॥ सोभेदान कुणाला येईना अक्षर ॥ कोणी म्हणतात दीन दीन हरहर सार ॥ दिले तांदुळ टाकून वर कीं झाले नवर ॥ मी जन्मून आलों त्याच वेळेवर ॥ आहे

म्म्हाचा म्होतूर माझेबरोबर ॥ नाही गेला मारुतीला वरात बाहीर ॥ नाही सोडल काकण उचलली नार ॥ नार घेऊन घोड्यावर, उडवीला बोर ॥ निपाणीला परत गेला माघार ॥"

निपाणकर परत गेल्यावर पुन त्याने कोल्हापूरकरावर स्वाऱ्या घाल ण्यास सुरवात केली व १८११ साली फिरुन एकदां महाराजाचा त्यान पराभव केला अखेर इग्रजाना मध्यस्थी घालून महाराजांनीं निपाणकराशीं १ ऑक्टोबर १८१२ रोजीं तह करून घेतला त्या तहान चिकोडी व मनोळी या तालुक्यावरील हक्क महाराजाना सोडावा लागला यावेळीं निपाणकर हा १०–१२ लक्षांचा मातबर सरजामदार व फौजबद सरदार बनला होता पण पुढीलच सालीं ते दोन तालुके बाजीरावाच्या सागण्यावरून त्यास सोडावे लागले यामुळे मनातून निपाणकर पेशव्यावर रुष्ट झाला पुढे पेशव्याची व इग्रजाची अखेरची लढाई सुरू झाली तेव्हा मन्रोन कोल्हापूरकर अगो दरच इग्रजास मिळाले असल्यामुळे चिकोडी व मनोळी हे तालुके कोल्हापूर कराच्या हवाली केले त्याला पेशव्यातर्फे निपाणकरांनीं हरकत घेतली पण खुद्द निपाणीसच इग्रजांनी वेढा देण्याचें मुक्रर कल्यामुळ व एकदर रागरग पाहून निपाणकरान इग्रजाशीं स्वतन्त्र तह करून घेतला ।

"इग्रजी झाल्यावर देसाई आपणाजवळचे स्वार, पढारी व आरब लोक यांस सोडून देऊन कार्याकारण लोकानिशी निपाणीचे जुन्या किल्ल्यात राहू लागले पुढ एक नवा मोठा किल्ला बाधण्यास आरभ केला परतु तो बाधू नये म्हणून एल्फिन्स्टन साहेबांचा हुकूम झाल्यावरून तसाच राहिला नतर त्यानी निपाणीस बराच मोठा सुदर वाडा बाधला वाड्यातील त्याचे महाल व मॅडेची स्थळ अद्याप पाहण्याजोगी आहेत शिधोजाराव अगाने धिप्पाड, धष्टपुष्ट बळकट व शूर जवान होते त्यानी स्वपराक्रमाने व आपल्या मनगटाच्या जोराने जहागीर सपादन केली त्यांचे अगी विलक्षण शक्ति होती त्याची स्वारी साधारण घोड्यावर निभावत नसे त्याची बदुक किंवा तरवार दुसऱ्यास झेपत नसे त्याची जोडी व करेला अद्याप निपाणी च्या वाड्यात दाखवितात त्यावरून त्याचे सामर्थ्य विलक्षण असावे असे अनुमान होतें परतु त्यांचा शीलस्वभाव फार दुष्ट होता ते स्वभावाने क्रूर, निदय व रानदाडगे असे होते कोणतेंहि कृत्य करण्यास ते मागेंपुढे सरत

नसत. सखाराम घाडगे, घाशीराम कोतवाल वगैरे जे महान दुष्ट मराठ्यांच्या कारकीर्दीत झाले त्यांच्यांतच यांची गणना करतात. प्रजेवर जुलूम करणे, नोकरांस मरेमरेपर्यंत मारणें, श्रीमान लोकांस दंड बांधून नागविणें वगैरे गोष्टींनी त्यांचा दरारा आसमंतात इतका होता कीं, लोक त्यांचें नांव ऐकून थरथर कापत. ज्या ज्या ठिकाणीं यांनी अंमल सर केला त्या त्या ठिकाणच्या श्रीमान सावकारांनी त्यांच्या मागण्याप्रमाणे द्रव्य दिलें नाहीं म्हणजे त्यांस कैदेंत टाकावे याप्रमाणे यांचे कैदेंत शेंकडो लोकं दहा–दहा, बारा–बारा वर्षे होते. कित्येक तर यांच्या निर्दयपणास बळी पडले असे सांगतात. जनरल मन्रो साहेब निपाणी नजीक फौज घेऊन आले तेव्हां त्यांनी पुष्कळांस मुक्त करविलें.

श्रीमान् लोकांप्रमाणे सुंदर स्त्रियांवरहि यांचा डोळा असे व त्यांसहि धरून कारागृहांत टाकण्याचा यांचा परिपाठ होता. यामुळे अशा दीन स्त्रिया याजपाशीं पुष्कळ होत्या. पुढे तर या दीन अबलांवर भलत्याच प्रकारचा जुलूम करू लागले असें म्हणतात. त्यांचे वाड्यांत सज्जाचेखाली जलक्रीडेकरिता एक लहानसें सरोवर आहे. सज्जास कठडा नाही. त्या सज्जावर सुंदर तरुण स्त्रियांस ओळीनें उभ्या करून त्यांपैकीं एकादीस पटकन खाली कृत्रिम सरोवरांत ढकलून देऊन ती बुडून कशी मरते व तिचे हाल कसकसे होतात ते पाहत राहत. तसेंच एका प्रसंगीं दोघे नोकर, नोकरी करण्यांत चुकले त्यांस त्यांनी इतके मरेमरेपर्यंत मारिलें कीं त्यांपैकीं एक तत्काळ मेला व दुसऱ्याची बरेच दिवस आशा नव्हती. असो, याप्रमाणे त्यांच्या क्रूरपणाविषयीं इंग्रज ग्रंथकारांनी अनेक गोष्टी प्रसिद्ध केल्या आहेत. त्या एकतर्फी आहेत व या कारणास्तव त्यांवर अक्षरशः भरवंसा ठेवितां येत नाही. निपाणीचे लोक शिपोजीरावांच्या शूरत्वाच्या, पराक्रमाच्या, त्यांच्या धैर्याच्या व अलौकिक सामर्थ्याच्या जितक्या गोष्टी सांगतात तितक्या त्यांच्या निर्दयत्वाच्या सांगत नाहींत. इतके खरें आहे की, शिपोजीरावांचा आसमंतात भारी धाक व दरारा असल्याचीं मात्र प्रमाणे आढळतात. "

" यांनी अपरंपार संपत्ति जवळ गोळा केली होती. खर्च बाताबेतानें करून सग्रहीं द्रव्य व दागदागिने फार केले होते. निपाणीच्या दागिन्याची

आल्या तर परवांपर्यंत होती. याच्या लग्नाच्या एकदर एकवीस स्त्रिया होत्या! त्या प्रत्येकीच्या अगावर भारी दागिने होते. इतक्याहि स्त्रिया असून शिधोजीरावास पुत्र नव्हता. यामुळे पुढे दवलत खालसा होईल या चिंतेत पडून अखेरीस त्यांची वृत्तीही बदलली. अखेर अखेर तर वायूचा विकार होऊन फेपरे येऊ लागलें. पुढें याच्या पत्नींपैकीं एक ताईबाई इने आपणांस खोटा पुत्र निर्माण करण्याचा यत्न करून एका विधवेचा पुत्र आपणांस झाला असें उठविलें व त्या विधवेस ठार मारिलें व ही गोष्ट शिधोजीरावाच्या समतानें झाली असें निमित्त करून पोलिटिकल एजण्टांनी निपाणी सरजाम खालसा करण्याविषयीं शिफारस केली. निपाणकरांचा वृद्धापकाळ व त्यांनी ब्रिटिश सरकारास वेळोवेळीं केलेली मदत मनात आणून ब्रिटिश सरकारने दवलत एकदम खालसा न करता त्याचे तहाह्यात मात्र चालेल आणि पुढे त्याचे पोटच्या किंवा दत्तक पुत्रास चालणार नाही असा ठराव केला. पुढें शिधोजीराव सन १८३९ सालीं निवर्तले व दवलत खालसा झाली." ( मोडकांचा इतिहास ).

आप्पा देसाई निपाणकर हा शूर उलट्या काळजाचा खरा. परतु *तितकाच नीच आणि विश्वासघातकी होता. त्याच्या विश्वासघातकीपणाचा* कळस म्हणजे त्याने खडकीच्या लढाईपासून आंतून इग्रजाशी स्नेह करून बाजीरावाची सर्व बातमी इग्रजांस कळविण्याचे शतकृत्य केलें हीं होय! त्यानेच छत्रपतीस दग्याने इग्रजांच्या हवाली करविलें व त्यानेच अखेर बाजीरावास जाळ्यांत अडकवून अशीरगडाजवळ माल्कमच्या हातावर स्वराज्याचें उदक सोडण्याचा प्रसग आणला. प्रभाकर शाहीरोन " कोणी कसून लढेना क्रियेस जागेना " किंवा " फितुर करुनि सर्वांनी असलें राज्य मात्र बुडविलें " असे उद्गार काढले ते यथार्थ होते. उदाहरणार्थ—३१ जुलै १८१८ तारखेचे केसो गगाधर यांचे पुढील पत्र पहा.—

श्री सवत १८७५ आषाढ—

व॥ १४ ( ३१ जुलै १८१८ )

साहेबाचे सेवेसी अज्ञाधारक केशो गगाधर कृतानेक सां॥नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता। आषाढ व॥ १४ रोज शुक्रवार पावेतों स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असें. विशेष. साहेबाकडेस दोन रवानग्यापत्रे

पा।। तों पावलींच असतील त्याजवर कालपक्षेण वरून घरू माणसें आलीं त्यांणीं सांगितलें कीं कनिष्ट साहेब याणी त्या प्रांतांत जमाव बहूत केला होता परतु दैव सानुकूल नसले म्हणोनें सगळे प्रतिकूल होते तसे थोरल्याकडील सरदार जितके उठून गेले तितके त्याजजवळ सामील जहाले त्यांणीही जमाव करण्याचा विचार चागला योजिला होता परतु अस्तनींतून आम्र निघाली त्यास (उ) पाय नाहीं निपाणकर याणी आठ महिने जाहले जलचरासी मिळून पनास लक्ष रुपये घेतले आणि उभयतास हस्तगत करोन द्यावे म्हणोन पंदरपे उद्योगात होते जी मसलत याणी केली तें वर्तमान जलचरास मसलत समजावी त्याणी क्षागाव तिकडाल बघन करीत असावे हे सैन्य घेऊन तिक डेस गेले नाहीत तो जलचरानी जाऊन पोहोचाव यापे।। हष्टीस पडू लागले ते समइ चौकशी केली कीं आपली मसलत त्यास कशी समजते तेव्हां शोध करिता वरकड सरदार मडळींत गलबल नाहीं निपाणकर छेटाने उतरत होते त्याजकडे हलकारे जातात व येतात हृ पक्षेपण लक्षात आणिल आणि त्यास आणून विच्यारिल कीं हृ काय आहे ? त्यांनीं ते वेळेस तरी उडवाउडवीने भाषण करोन उठून गेले ते निपाणकर याच्या चित्तात राहून बहुत लगट केला तो थोरले तरा इकडेस हजार स्वार व अरब नवें ठेऊन धुळकोटावर येऊन दाखल जाहले त्यांची येवस्था पेशजी लिहिली आहे त्यास पुढे आपल्याकडेस येत आहे तिकडील वृत्त साहेब लिहितील तेव्हा समजेल

निपाणकर याणी सातारकर महाराज यास तरी जलचराचे हवाली करोन दिल्हे हे त्याणा नेतान मुक्कामी नेऊन गादीवर बसविले आणि तमाम सरदार यास पत्र लिहिलीं कीं हे (पेशवे) बड ! याणी आम्हास कैद केले होते तो कपणींनीं दोस्ती करोन आम्हास जागेवर आणिले त्यास तुम्हीं त्यास सामील न राहता उठून कपणीस येऊन मिळावे हे न केल्यास सरजाम जप्त करोन पारिपत्य केलें जाइल असी पत्र जाताच सगळ्याचे होप उडाल याजकरिता सगळे उठउठून चहूकडेस गेले बाकी डगळे व कनिष्ट तव्यावर राहिले पलीकडेस निपाणकर होते त्यांणीं जलचरास आणून उभयता धणी चाकर यास हस्तगत केले त्यात डगळे याच हातास चमाच्या थैल्या घातल्या आहेत दुसऱ्यानी भोजनास घालावे आणि म्यान्यात ठेवून बाहेर कुलूप लावात आहेत जावता बहुत करीत आहेत कनिष्टास (चिमणाजी आप्पास)

वसईस नेऊन ठेविले. कोकण पट्टीतील दुर्ग सगळे जलचराकडेस जाहले. मावळे माणसे काढून येक येक गोरा व पाच पाच माणसे त्याणी ठेविली आहेत. मालवणचे दुर्ग सुभ्याची जागा केली आहे. वसई सुभा मोडिला. सातान्यास येक गोरा वर ठेविला आहे. सातारचे महाराजास मुक्कामीच ठेविले आहे. सरदार सगळे जवळ गेले आहेत

निपाणकर इतके शिष्टकुल करोन सरजामसह निपाणेस गेले त्याच्या मागोन पलटणे (इग्रजाची) लागली आहेत ते थेट गेले तेथे मोर्चे लाविले आहेत. कारण की तुम्ही हरामखोर. पन्नास लक्ष रुपये घेऊन आजपावेतो ज्याचे म्हणविला त्याचा घात करावयासी चुकला नाही तेव्हा तुम्ही काफर आहात. याजकरिता ऐवज माघारी देणे. यास्तव त्याच्या मागे शुक्लकाष्ठ लागले आहे.

(शिंदेशाही इतिहासाची साधने पृ २५६–५७ लेखाक १८०)

---

# आप्पा देसाई निपाणकराचा पोवाडा

## १५

### (शाहीर—नागनरू)

[ हा पोवाडा घालवाड पेटा शिरोळ येथें बाबाजी एसबा शिंदे यानें म्हणून दाखविला. —शितूत ]

धनी निपाणकर आपासाहेब सरदार। ते राज्य करून गेले हिंमत-बहादर ॥ धृपद ॥

धनी आकुलजीचे देसाई वतनदार। एका घोड्यावरला स्वार होता

---

एका घोड्यावरला स्वार होता बिनघोर—सामान्य शिलेदार होता. शिलेदाराला स्वतःचे घोडें बाळगून नोकरी करावी लागे. शिलेदाराला आणखी दहावीस घोडीं बाळगून चाकरीस आणण्याची पथक्याची कामगिरी मिळाली तर मात्र त्याच्यामागें म्हणण्यासारखा घोर किंवा काळजी उत्पन्न होई. कारण तितकीं घोडीं व शिलेदार जमविणें, त्यांचे मनोधारण करणे व लढायांत शिलेदारांची घोडीपिडी किंवा पानपडताळे गमावलीं, तर तीं मुख्य सरदाराकडून किंवा सरकारांतून भरपाई करून देणें इत्यादि अनेक जबाबदाऱ्या येत. पण नुसताच साधा शिलेदार असेल, तर तो या व्यापापासून मुक्त व पूर्णपणें बेजबाबदार. आज या मालकाचें पटलें नाहीं तर खुशाल आपल्या घोड्यानिशीं दुसऱ्या मालकाकडे जाऊन नोकरी धरावी. सारांश, सामान्य शिलेदार असेल, तर तो पथक्यापेक्षां बिनघोर हें खरें. तथापि शिलेदारापेक्षांसुद्धा बारगीर असेल, तर तो अधिक बिनघोर. कारण घोडे व हत्यारपात्यार त्याला मालकाकडून मिळे. यामुळें घोडे राखण्याची काहींच जबाबदारी त्याच्यावर नसे. उलट सामान्य शिलेदार झाला, तरी त्याला नेहमीं घोडे बचावण्याची काळजी; त्याचें घोडे लढाईत पडलें, तर त्या घोड्याची मालकाला खरी सर्व किंमत सरकारांतून बहुधा कधींच मिळत नसे. कारण ते पंचायतीचें काम. म्युनिसिपालिटीनें किंवा सरकारनें एखाद्याची जागा सक्तीनें घेतली, तर ज्याप्रमाणें पंचाकडून मालकाला खरी किंमत कधींच मिळूं शकत नाहीं तोच प्रकार त्या बाबतींत होई. यामुळें येथे बिनघोर हा शब्द सार्थ करावयाचा, तर शिलेदारापेक्षां बारगीर असाच अर्थ घेणें युक्त होईल.

बिनघोर । रघुनाथ देसाई पिता वडील तो थोर । वेणूबाई माता दिसे देव अवतार । नाना बाबा दादा बधू ते चार । हा मधला आपा आला जानीचा बाहार । बारा वर्षाची उमर जानीचा बाहार । आली आपाच्या मनात करावी तलवार । रघुनाथ देसाई होते सदरेवर ॥ कर जोडून आपा गेले त्याच्या समोर ॥ ही वडीलाची भाकरी खाऊ कुठवर ॥ मला हुकूम द्या मी करतो रोजगार ॥ रघुनाथ म्हणतो मुला नेणते पोर ॥ नको जाऊ देशावर मुलूख दुरवर ॥ द्याये वडलाची भाकरी जमीन चावर ॥ नाहीं देणें घेणे कवणाचें कशाचा घोर ॥ तुम्ही स्वस्थपणाने खेळून राहावे घर ॥ मोठा क्रोध आला आपाला दांत करकर ॥ नाही तुझ्या वशी जन्मलो कुणाचा तस्कर ॥ गरारारा मागे उलटे माघार ॥

---

पिता वडील तो थोर—पिता व वडील अशी निष्कारण पुनरुक्ति आहे. थोर याचा अर्थ मनाने थोर असा घ्यावा

आला जानीचा बहर—वयांत आला; उमेदवार झाला; वास्तविक सर्व शाहिरी वाङ्मयांत बारा वर्षाच्या उमरींत जानीचा म्हणजे जवानीचा भर आला म्हणून कौतुकानें फक्त स्त्रियांचेच वर्णन करतात. बारा वर्षाची उमर म्हणजे स्त्रीच्या यौवनाचा पहिला सर्वोत्तम बहर, असे ऐतिहासिक काळीं समजलें जाई, हें लावण्याच्या अभ्यासकाच्या पूर्ण परिचयाचे आहे. येथें तेंच वर्णन बारा वर्षाच्या मुलाला लावले आहे; यामुळे तें थोडें विचित्र वाटतें. मात्र मराठशाहींत बारा-बारा वर्षाच्या लहान लहान मुलांनींही प्रत्यक्ष रणांगणावर चाकऱ्या-उमेदवाऱ्या केल्याचे शेकडो दाखले आहेत आतासारख्या शाळा व त्यांचें पुस्तकी शिक्षण तेव्हां नसे. प्रत्यक्ष अनुभव तीच शाळा; यामुळे ब्राह्मणाचा मुलगा असेल, तर तो कारकुनीपणात व मराठ्याचा मुलगा असेल, तर तो आपल्या बापा भावाबरोबर लष्करात उमेद वारासारखा अगदीं अल्पवयांतच जाऊं लागे. येथें शाहिराने बारा वर्षाची उमर सांगितली आहे, ती अर्थात् अतिशयोक्ति धरावयाची. सदरेवर—कचेरींत. आली आपाच्या मनांत—आले आपाच्या मनात. मुला नेणतें पोर—मुला ! तू नेणतें पोर आहेस. वडिलाची भाकरी—वाडवडिलांनी मिळवून ठेवलेली वतनी, इनामी अशी चावरभर जमीन; चावर—चाहूर ह्मणजे १२० चौरस बिघे इतकी जमीन. घर—घरीं. नाही तुझ्या वंशीं जन्मलों कोणाचा तस्कर—बापाचा तो उपदेश

वेणूबाई माता होती खोलीच्या दार ।। हा चरणावरते जाऊन, ठेविले शिर।। पंचामृताची मला पाजली धार ।। बाई तुमच्या ह्या दुधाचा झाला मला उपकार ।। मला निरोप द्या मी जाऊन करतो रोजगार ।। मी आणून दस्ता ठेवीन आपल्या म्होर ।। तवा हा दुधाचा फिटेल उपकार ।। वेणूबाई माता म्हणते नेणते पोर।। नको जाऊ देशावर मुलुख भेसूर ।। हाय वडलाची भाकरी जमीन चावर ।। नाही देणे घेणं कवणाचें कशाचा घोर ।। नाही मातेचे ऐकले उलटे माघार ।। गेला घोड्याच्या पागेत हिंडे चौफेर ।। पासमूर होता घोडा कुमाईत बोर ।। त्यावरते टाकिला खडा की पाठीवर ।। तडाडाडा उडाला घोडा वरच्यावर ।। ह्या घोड्यावरती बरी लाविली नदर ।। ह्या घोड्यावरती होईल माझी तलवार ।। केले सामान बदोबस्त लेस तयार ।। *दिला पाय रिकीबांत झाला स्वार ।। गेला नगरामधि हिंडून पाहातो चौफेर ।।* केले गैबीचे दर्शन उलटे माघार ।। आला आपुल्या वाड्यापुढे दरवाज्या म्होर ।। तो वडील बाबाबधू बोलाविला म्होर ।। त्याला नानापरीचे सागतो अक्षर । तुम्ही वडीलपणाने करा आपला ससार ।। ह्या वडीलावरती फार

---

*ऐकून आयतें मिळणारे मेलेले अन्न खाण्याची अगदीं चीड आलेला* आपाजी बापाला सतापून एकदम म्हणाला, "ज्याअर्थी असला नादान उपदेश तुम्ही मला करता, त्याअर्थी तुम्ही माझे बाप नव्हेत. मला तस्करासारखे तुम्ही कोठून तरी पळवून आणले असाव " खोलीच्या दार— बापलेकाचे भांडण चालले असता आई वेणूबाई खोलीच्या दाराआड येऊन ऐकत उभी होती सदरेवर घरातील स्त्रियानी बाहेर लोकादेखत न *जाण्याना जो जुन्या कुलवान घराण्यातील दडक असतो त्यास अनुसरून-* रोजगार—नोकरी. दस्ता—मोडीवाचनाची चूक 'द' व 'ब' चा घोटाळा बस्ता असा। मूळ शब्द असावा , बस्ता—थैली, गाठोडे भेसुर—भयासुर, भयकर, कठिण. ऐकला—ऐकलें. पासमूर—समोर (?) कुमाइत बोर —कुमाइत व बोर या घोड्याच्या विशिष्ट जाति आहेत

लेस—तयार. बदोबस्त व लेस हे दोन्ही एका अर्थी शब्द वापरले आहेत. अक्षर—मजकूर. गोठण—गावाबाहेर गुरें चरावयास

असावी नदर ॥ दादाच काम कोठचिं त्याचे न्यार ॥ नानास दबावू नका नेणते पोर ॥ केली तार्नीद बदोबस्त निघाला बाहीर ॥ दिली टाच त्या घोड्याला उडविला बोर ॥ गेला गोठणाच्यावर ॥ करी विचार कुणीकडे जाव कुण्या देशावर ॥ धनि निपाणकर० ॥ १

त्यानी पाहिल पुण पुढें सातार ॥ त्यांनी पाहिले जी काबूलकधार ॥ रूम पाहिले पाच्छाईचे नगर ॥ चिनी मुगी पैठण शार पाहिलें सार ॥ सातपुडे उतरून बारी झाला पार ॥ ह्या आपाला नाहीं कुठे कुठे रोजगार ॥ झाला काळा मोरा उलटला माघार ॥ काय ताड दावीत जाऊ वडिला म्होर ॥ त्यानीं मनामधि शोध केला विचार ॥ ह्राय छत्रपतीचें गाव पुढे करवीर ॥ बर जाता जाता तिथे करून जाऊ मुजरे ॥ जर असेल माझी भाकरी तिथ एक कोर ॥ वरी जगदंबेचे देणे तूच देणार ॥ फरारारा उडीवला घोडा कुमाइत बोर ॥ ह्रा भर गुजरीचा धरला सुमार ॥ भर गुजरी घोडा उडवितो

---

जाताना किंवा सायकाळीं चरून आल्यावर गावात परत येताना ज्या विशिष्ट जागीं गुरं एकत्र जमतात ती जागा

काबूल, कधार, रूम, चिनी—ही सर्व अतिशयोक्ति कधार हे शहर निजाम राज्यात आहे वास्तविक शाहिराला निपाणकर हा सातारा, पुणे, अहमदनगर, पैठण व निजामचे राज्य इतक्या मुलुखात रोजगारा निमित्त हिंडला असे म्हणावयाचें, पण तो रोजगाराकरिता अगदी लाब लाब जाऊन आला हें वर्णन करण्याच्या झोकात काबूल, कदाहार, रूम, शाम पर्यंत गेला अशी अतिशयोक्ति केली चिनी मुगी पैठण—वास्तविक मुगी चिनापट्टण असें पाहिजे शार—शहर काळामोरा—गोरामोरा मोरा—पाढरे व काळ ठिपके याचे मिश्रण असलेला सध्या आपण गोरामोरा म्हणतो त्याचा अर्थ खजील झाल्यामुळे किंवा घाबरल्यामुळें कावराबावरा झालेला असा असतो येथें इतके फिरूनही मनासारखी नोकरी मिळाली नाही म्हणून तो काळजीनें काळवडला असा अर्थ घ्यावा कोर—चतकोर गुजरी—बाजार पेठ नानापर—नाना प्रकारांनी आपल शिलेदारीचें कौशल्य दाखवितांना मराठे स्वार नाना चालीवर घोडीं दौडवून दाखवीत सैन्याचा तळ हालला म्हणजे

असावी नदर ॥ दादाचे काम कोठीचे त्याचे न्यार ॥ नानास दबावू नका नेणते पोर ॥ केली ताकीद बदोबस्त निघाला बाहीर ॥ दिली टाच त्या घोड्याला उडविला बोर ॥ गेला गोठणाच्यावर ॥ करी विचार कुणीकडे जावे कुण्या देशावर ॥ धनि निपाणकर० ॥ १

त्यांनी पाहिले पुणे पुढे सातार ॥ त्यांनी पाहिले जी काबूलकधार ॥ रुम पाहिले पाच्छाईचे नगर ॥ चिनी मुगी पैठण शार पाहिले सार ॥ सातपुडे उतरून बारी झाला पार ॥ ह्या आपाला नाहीं कुठे कुठे रोजगार ॥ झाला काळा मोरा उलटला माघार ॥ काय तोंड दावीत जाऊ वडिला म्होर ॥ त्यांनीं मनामधिं शोध केला विचार ॥ हाय छत्रपतीचें गांव पुढे करवीर ॥ बरें जाता जाता तिथें करून जाऊ मुजरे ॥ जर असेल माझी भाकरी तिथ एक कोर ॥ वरी जगदंबेचें देणें तूच देणार ॥ फरारारा उडीवला घोडा कुमाईत बोर ॥ हा भर गुजरीचा धरला सुमार ॥ भर गुजरी घोडा उडवितो

---

जातांना किंवा सायकाळीं चरून आल्यावर गांवांत परत येतांना ज्या विशिष्ट जागीं गुरें एकत्र जमतात ती जागा.

काबूल, कंधार, रुम, चिनी—ही सर्व अतिशयोक्ति. कधार हे शहर निजाम राज्यांत आहे. वास्तविक शाहिराला निपाणकर हा सातारा, पुणें, अहमदनगर, पैठण व निजामचें राज्य इतक्या मुलुखात रोजगारानिमित्त हिंडला असें म्हणावयाचें; पण तो रोजगाराकरिता अगदी लांब लांब जाऊन आला हें वर्णन करण्याच्या झोकांत काबूल, कदाहार, रूम, शामपर्यंत गेला अशी अतिशयोक्ति केली. चिनी मुंगी पैठण—वास्तविक मुगी विनापट्टण असें पाहिजे शार—शहर. काळामोरा—गोरामोरा. मोरा—पांढरे व काळे ठिपके यांचें मिश्रण असलेला. सध्या आपण गोरामोरा म्हणतो त्याचा अर्थ खजील झाल्यामुळे किंवा घाबरल्यामुळे कावराबावरा झालेला असा असतो. येथे इतके फिरूनही मनासारखी नोकरी मिळाली नाहीं म्हणून तो काळजीनें काळवंडला असा अर्थ घ्यावा. कोर—चतकोर. गुजरी—बाजार पेठ. नानापर—नाना प्रकारांनीं. आपलें शिलेदारीचें कौशल्य दाखवितांना मराठे स्वार नाना चालीवर घोडीं दौडवून दाखवीत. सैन्याचा तळ हालला म्हणजे

नानापर ॥ शिवछत्रपती होते वगल्यावर ॥ धनी महाराजांची होती गुजेंद्रीवर नदर ॥ काय घोडा देखणा सवार उमतवार ॥ हाक मारली जासूदास पळ लौकर ॥ हा कोठून आला स्वार आंधळे हितवर ॥ गेलो जासुद धांवून केला आपाला मुजर ॥ चला हुकूम महाराजाचा चला तिथवर ॥ रादरादा हासले आपासाहेब सरदार ॥ वरें जगदंबेचें देणें तूच देणार ॥ गेले घोडा उडवीत गेले सदरे हौर ॥ धनी महाराजांनीं वरी लाविली नदर ॥ काय वम्र शिपाई झुरत अनिवार ॥ कारागरांड शीडावरते मारतो लहर ॥ हाय कुरुम डोळ्यामधिं भरपूर ॥ महाराज बोलते झाले परमेश्वर ॥ काय नाव तुमचें गांव कुठे राहणार ॥ वरी कवणीकडून आला कुठे जाणार ॥ तवा आपासाहेबानीं काय केला उत्तर । मी अक्लूजचे देसाई वतनदार । रघुनाथ माझा पिता तुमचा चाकर । माझे नांव आपा म्हणत्यात लहानथोर । फार मुलुख महाराज हिंडलो दूरच्यादूर ॥ मला ठेवाया सारखा नाही कुणी सरदार ॥ असा शब्द ऐकता राजास चढली ईर ॥ माझा लौकिक देवा होईल दुनयावर ॥ एक खेडे गेले म्हणीन वरीसभर ॥ एक तरी महिना ठेवीन हा चाकर ॥ धनी० ॥ २

---

दुसऱ्या तळावर जाताना वाटेत मराठे शिलेदार गमतीनें आपापल्या घोड्यांचीं कसब कशीं दाखवीत याचें वर्णन तत्कालीन युरोपियन लोकांनी केलेलें प्रसिद्धच आहे. सवार—स्वार. उमतवार—उमेदवार; जवान, हितवर—येथवर. वम्र शिपाई—वाघासारखा. झुरत—जुरत—शौर्य. लहर—तोंडावरचें तेज. कुरुम—पाणी. वरी—वरें. कवणीकडून—कोणीकडून. मला ठेवायासारखा कुणी सरदार—मला पदरीं ठेवून घेईल असा मातबर धनीच मला भेटला नाहीं. ईर—ईर्षा. दुनयावर—दुनियेवर, जगात. एक खेडें गेलें वरीसभर इ.—राजानें असा विचार केला कीं, असला हा नामांकित एकांडा आपण जवळ बाळगावाच. त्याच्या एकट्यासाठीं मलताच पगार द्यावा लागला तरी हरकत नाहीं. असला माणूस पदरीं आहे हाच लौकिक काय थोडा होईल? एका गांवाचा वार्षिक वसूल याच्या एकट्याच्या पगारांत खर्च होईल तो होईल. काय वाटेल तें होवो, एक महिनाभर तरी

असावी मदर ॥ दादाचे काम कोठवें त्याचे न्यार ॥ नानास दबावू नका नेणते पोर ॥ केली तार्कीद बदोबस्त निघाला बाहीर ॥ दिली टाच त्या घोड्याला उडविला बोर ॥ गेला गोठणाच्यावर ॥ करी विचार कुणीकडे जाव कुण्या देशावर ॥ धनि निपाणकर० ॥ १

त्यानी पाहिले पुणे पुढे सातार ॥ त्यांनी पाहिले जी काबूलकधार ॥ रुम पाहिले पाच्छाईचें नगर ॥ चिनी मुगी पैठण शार पाहिले सार ॥ सातपुडे उतरून बारी झाला पार ॥ ह्या आपाला नाहीं कुठे कुठे रोजगार ॥ झाला काळा मोरा उलटला माघार ॥ काय तोंड दावीत जाऊ वडिला म्होर ॥ त्यांनीं मनामधिं शोध केला विचार ॥ ह्राय छत्रपतींचें गाव पुढे करवीर ॥ बर जाता जाता तिथें करून जाऊ मुजरे ॥ जर असेल माझी भाकरी तिथ एक कोर ॥ वरी जगदबेचें देणें तूच देणार ॥ फरारारा उडींवला घोडा कुमाइत बोर ॥ ह्या भर गुजरीचा धरला सुमार ॥ भर गुजरी घोडा उडवितो

---

जाताना किंवा सायकाळीं चरून आल्यावर गांवात परत येताना ज्या विशिष्ट जागीं गुर एकत्र जमतात ती जागा

काबूल, कधार, रुम, चिनी—ही सर्व अतिशयोक्ति कधार हे शहर निजाम राज्यात आहे वास्तविक शाहिराला निपाणकर ह्या सातारा, पुणें, अहमदनगर, पैठण व निजामचे राज्य इतक्या मुलुखात रोजगारा

नानापर ॥ शिवछत्रपती होते बंगल्यावर ॥ धनी महाराजांची होती गिर्दफेर नदर ॥ काय घोडा देखणा सवार उमतवार ॥ हांक मारली जासूदासी पळ लौकर ॥ हा कोठून आला स्वार ओघळे हितवर ॥ गेलो जासुद धांवून केला आपला मुजर ॥ चला हुकूम महाराजाचा चला तिथवर ॥ खदखदा हांसले आपासाहेब सरदार ॥ बरें जगदंबेचें देणें तूंच देणार ॥ गेले घोडा उडवीत गेले सदेर ओरे ॥ धनी महाराजांनी वरी लाविली नदर ॥ काय वग्र शिपाई झुरत अनिवार ॥ कायरांचे तोंडावरते मारतो लहर ॥ हाय कुरम डोळ्यांमधिं भरपूर ॥ महाराज बोलते झाले परमेश्वर ॥ काय नांव तुमचे गांव कुठे राहणार ॥ वरी कवणीकडून आला कुठे जाणार ॥ तवां आपासाहेबांनीं काय केला उत्तर । मी अकलूजचे देसाई वतनदार । रघुनाथ माझा पिता तुमचा चाकर । माझें नांव आपा म्हणत्यात लहानथोर । फार मुलुख महाराज हिंडलो दूरच्यादूर ॥ मला ठेवाया सारखा नाही कुणी सरदार ॥ असा शब्द ऐकतां राजास चढली ईर ॥ माझा लौकिक देवा होईल दुनयावर ॥ एक खेडे गेले म्हणोन वरीसभर ॥ एक तरी महिना ठेवीन हा चाकर ॥ धनी० ॥ २

---

दुसऱ्या तळावर जातांना वाटेंत मराठे शिलेदार गमतीनें आपापल्या घोड्यांचीं कसबें कशीं दाखवीत याचें वर्णन तत्कालीन युरोपियन लोकांनी केलेलें प्रसिद्धच आहे. सवार—स्वार. उमतवार—उमेदवार; जवान, हितवर—येथवर. वग्र शिपाई—वाघासारखा. झुरत—जुरत—शौर्य. लहर—तोंडावरचें तेज. कुरम—पाणी. वरी—वरें. कवणीकडून—कोणीकडून. मला ठेवायासारखा कुणी सरदार—मला पदरीं ठेवून घेईल असा मातबर धनीच मला भेटला नाहीं. ईर—ईर्षा. दुनयावर—दुनियेवर, जगांत. एक खेडें गेलें वरीसभर इ.—राजानें असा विचार केला कीं, असला हा नामांकित एकांडा आपण जवळ बाळगावाच. त्याच्या एकट्यासाठी भलताच पगार द्यावा लागला तरी हरकत नाही. असला माणूस पदरीं आहे हाच लौकिक काय थोडा होईल? एका गांवाचा वार्षिक वसूल याच्या एकट्याच्या पगारांत खर्च होईल तो होईल. काय वाटेल तें होवो, एक महिनाभर तरी

हाक मारली मोतद्दारा हवाली कर ॥ हा घोडा नेऊनी लाव ठाण्यावर या भोजनाच्या वेळेला की तादावर ॥ केली ताकीद वदो बस्त खबरदार ॥ अस करता करता दिवस झाले च्यार ॥ आले दादवा

---

याला नोकरीस ठेवून पाहुणारच तुकोजीराव होळकराचा मुलगा मल्हारराव होळकर—ज्याचा दुसऱ्या बाजीरावींत पुण्याजवळ शिंद्याच्या फौजेने हल्ला करून वध केला—त्यानेंहि आपल्या पदरीं एक लाख रुपये पगाराचा एकांडा बाळगला होता, व त्यावरूनच त्या एकांडयाच लौकिकात 'लाख्या बारगीर' असें नाव पडल होतें, एक लाख रुपये महिना पगार ही अर्थात् अचाट अतिशयोक्ति होय आपण 'लाख माणूस' म्हणतों त्याच अर्थानें 'लाख्या बारगीर' होय मल्हारराव होळकराच्या पोवाडयात थेट निपाणकराच्या पोवाडयासारखेंच वर्णन आल आहे लाख्या बारगीर हिंडुन आला दरबारीं घेऊन सारी सेना ॥ लाख रुपये कुठून यावे हिंम्या कोणाचा होईना ॥ लाख्या बारगीर म्हणे मल्हारबा आलों मी तुमच्या दर्शना ॥ मल्हारजी होळकर बोलू लागला नाही लाखाचा परगणा ( चाल ) ज्यांने थोर हिंम्या केला । लाख्या बारगीर ठेविला ॥ एक घोडा बसाया दिला ॥ पन्नास माणूस दिमतीला ॥ दहा माणूस सेवेला ॥ किती जेवी त्यांच्या पंक्तीला ॥ पांचशे रुपये निवळ मोजून घातले त्याच्या पदरांत ॥ असे रुपये कितीक झाले करा वर्षाचे गणीत ॥ वाहवाजी मल्हार ॥ ( ऐतिहासिक पोवाडे, भाग १ पान ३२३ ) एकांडे—एकटे स्वार हे निधड्या छातीचे मर्द शिलेदार ब्राह्मण, मराठे रजपूत, मुसलमान वगैरे सव जातींचे असत सामान्य स्वाराचें वेतन जरी सालीना अडीचशे, तीनशे, चारशे रुपयेपर्यंत घोडे माणूस पाहून अस तरी सातआठशे पासून दोन दोन हजारापर्यंत तैनाता देऊन व पालख्या अबदागिऱ्या वगैरे बहुमान देऊन हे एकांडे प्रत्येक पथकांत व पागेंत दहावीस, पन्नास, शमर असे एकदर स्वाराच्या संख्येचें मान पाहून बाळगलेले असत आणीबाणीच्या वेळीं नेहमीं हे मोहरे अघाडीस असावयाचे हेच पुढ वढती मिळून पागे व पथके होत असत (खरे—इ व बखर, पान ३९ ) तादावर—पानावर बसलें असता भावार्थ अन्नाला साक्ष ठेवून दिवस झाले चार—कांहीं एक लाव—

साळुखे चाइडोर ॥ खूळ लागले राजाला साधु कुळवर ॥ बारा हजार दरमहा वसा केला बरोबर ॥ अशी आपानी कोठे केली तलवार ॥ कुठे लाव नाही लष्कर दुनयावर ॥ ह्या आपाला तुम्ही घाला वाघावर ॥ ह्या कोंकण खेड्याला त्याह्या तुम्ही पत्र ॥ कुठे असतील ढाण्या वग्र असावी नदर ॥ उद्यां महाराज शिकारीला खचीत येणार ॥ राजाच अंग सोन्याचे पितळकान खर ॥ हलकी गोष्ट ऐकून लिहिल बरोबर ॥ झाला हुकुम सैनेमधिं झडत नगार ॥ केली ताकीद ढालाईताला ढाल तयार ॥ ही ढाल चलावी राशिवड्यावर ॥ आगड धो धो डंके झडती घोड्यावर ॥ दलभार निघाले राजाचे लष्कर ॥ महाराज अबारींत हत्तीच्यावर ॥ दोई बाजूनें मोर्चाल उडे दरार ॥ झळझळा गगावन झळकते ढ्योर ॥ दल म्हाराजाचें निघाले लष्कर ॥ ३

गेली वस्ती करीत चालले ढ्योरे ढ्योर ॥ धीनफोड्या घाटावर ठोकले डेर ॥ महाराज डेऱ्यामाधि वसले देव अवतार ॥ आले कोकणे बहाद्दर लगोटे सार ॥ त्यांनी बाधून कबर केले मुजरे ॥ ह्या अश्वल

---

निशाण, लाव लष्कर असा शब्द ऐतिहासिक वाङ्मयांत पुष्कळ वेळा येतो त्याचा अर्थ लष्कर व निशाण असा असतो. भावार्थीनें लावलष्कर म्हणजे सैन्य सरजाम. दुनयावर—दुनियेवर एक लाख रुपये आपा खाणार पण सारे जग शोधले तरी त्याच्या जमावाची किंवा निशाणाची निशाणी कोठें आढळत नाहीं. अशा उपटसुभाला दर महा एक लाख! वग्र—वाघ राजाचे अंग सोन्याचे पितळ कान खर—राजा उदार, गुण ग्राही इतर दृष्टीनें सारा सोन्यामारखा आहे पण हलक्या कानाचा आहे. शाहीराने उपयोजिलेलें हे गांवठी सुभाषित फार सुदर आहे गाय साऱ्या अगीं पवित्र पण तोंडात अपवित्र, त्याप्रमाणे छत्रपति इतर सर्व दृष्टीनी चागला परतु हलकट लोकाची मसलत ऐकणारा असा भावार्थ. बरोबर—तसेच ठरल्याप्रमाणें ढाळ—निशाण दलभार—सैन्य, तुकड्या गंगावन झळकतें ढ्योर—चौऱ्या महाराजावर दोन बाजूनी मोर्चेले झळकत होतीं व चौऱ्या वारल्या जात होत्या धीन—(?) दीन असा शब्द असेल तर त्याचा सबध ढ्योर या शब्दाकडे घेता येईल ह्मणजे ढ्योर दिन ह्मणजे पुढील दिवशीं अश्वल खोरी—अस्वलदरा; अस्वलखोरें;

खोरीमध्ये वाघाचे घर ॥ तुम्ही लोक निवडा भलेभले उमेदवार ॥ ह्या माच्या वरते उभा करून धरा फर ॥ धनि महाराजांची दया कीं आपावर ॥ तुम्ही सभाळा आपला नेणते पोर ॥ मधि घालून आपाला सोभाळा सार॥ चारसे लोक निवडले कीं उमेदवार ॥ ह्या माच्यावरते उभा केले तयार ॥ खोरीत उतरले कोक्णे भले बहादर ॥ लोलो मारली बोंब केला गजर ॥ धडधडाडली खोरी हालले वम्र ॥ दरदरा वरते चढून आले डोंगर ॥ होते महाराज दूरच्या दूर कोसावर ॥ हत्तीला घातले अदू अबारीवर ॥ महाराज अबारींत बसले वर ॥ हाती घेतली दुर्बीण लावली नदर ॥ दरदरा वरती चढून आले डोंगर ॥ ह्या करवीरच्या लोकांनी पाहिले डोळेभर ॥ जसा फुटला वाजार पळाले सार ॥ तवां बघतो लिपाणकर मागे म्होर ॥ या ईश्वरा काय वेळ आली माझ्यावर ॥ माझे बाजूचे मानकरी पळाले सार ॥ घोड्यावरनें टाकली उडी पायउतार ॥ हांक मारली मोतदाराला येरे लौकर ॥ सभाळ माझा घोडा कुमाईत बोर ॥ कर वडलाचे हवाली नेऊन माघार ॥ घोड्याच्या पडता पाया तूच ईश्वर ॥ तुज माझे बाबा हुते आजवर ॥ ह्या विघ्नातुन होऊन येईन जर पार ॥ तर माझ्या बोरा मीच तुझा सरदार ॥ ह्या विघ्नामधिं होऊन जाईन जर ठार ॥ तर वडील बाबा बधू तुला बसणार ॥ घोड्याने टाकली मान खांद्यावर ॥ दळदळा गळती

---

जेथं अस्वलाची वस्ती आहे असें खोरें. माची—डोंगराच्या पायथ्याच्या उतारावरील मैदान "माचीतु उपत्यका" राजव्यवहार कोश. फर—फरे मूळ शब्द फरा-राग लोलो मारली बोंब केला गजर—हाका सुरू केला. सावज बाहेर हुसकण्यासाठी हाके लोक आरडाओरडा करून बोंबा मारून, डबे वाजवून काठ्या आपटून मुद्दाम गोंगाट करतात खोली—वास्तविक खोरी-खोरें असें पाहिजे धडधडाडली—दुमदुमली. हत्तीला अंदू घालणें—हत्ती पळून जाऊ नये, जागचा हालू नये म्हणून त्याचे पाय सासळदडान जखडून टाकणें. जसाफुटला वाजार—बाजार बुणग्याची पळापळ होते त्याप्रमाणे या ईश्वरा—हे ईश्वरा; हा ईश्वरा. पडता—पडतो असे पाहिजे. हुते—होते तुझा माझा इतके दिवस ऋणानुबंध होता, तो आज सपणार. तुला बसणार—तुझ्यावर

नेत्र पाण्याची धार ॥ रडू नकोस माझ्या बीरा हे ब्रह्माचे अक्षर चुकल कसें होर ॥ फरफरारला घोडा उलट माघार ॥ हातीं काडणी निघाला मोत-द्दार ॥ धनी० ॥ ४

खालीं ठेविली तलवार दर्शन कर ॥ वाई वडलाच्या हातची यश-शूर ॥ माझा प्राण बाई तुझ्या जिवावर ॥ आज पावेतोंर नाहीं मारले माजार ॥ मग उचलली समशेर पाय दिला म्होर ॥ तेव्हां मुंड्याला गुंडा-ळले धोतर ॥ चढीवली ढाल मुंढ्याला झाला तयार ॥ रघुनाथ देसाई नको म्हणत होते खर ॥ मी नाहीं ऐकलो तसाच आलों म्होर ॥ हे नाना बाबा बघू राहिले दूर ॥ ही वेणूबाई माता माझी अंतर ॥ मग पाय दिल्हा तो म्होर चालला वीर ॥ हाक मारली वघ्राला बलावी बहादर ॥ येक-येक तुटोनि या माझ्या आंगावर ॥ एक वघ्र तुटला किरण केले आपावर ॥ आपानें घेतली हुब लावी तलवार ॥ एक हातांत लेसणी दोनी तुकडे बरोबर ॥ सावभाला चढली यीर पाय उकर ॥ एकदांच किरण केले आपावर ॥ साहात मारिले पातें लवतां बरोबर ॥ सात वाघ मारून झाला पलीकडे पार ॥ धनी महाराजाची होती त्यावर नजर ॥ हत्तीचे काडले अंदू ढकलला होर ॥ इतक्यांत धांवत आले निपाणीकर॥ महाराज उतरले खाल हतीच्या होर ॥ तवा चरणावर-ते येवून ठेवले शीर ॥ तवा महाराजानी हात ठेविला शिरावर ॥ वाहवारे आपा नांव तुझे सरदार ॥ तुम्हां जनमल्याली वेळ नक्षीतर ॥ सांयावरते

---

वसणार. यशशूर—यशस्वी, यशदाती. दर्शन कर—प्रणाम करी. दळदळा—डळढळा वडिलांच्या हातची—वाडवडिलांपासून जवळ असलेली. माजार—मांजर. आप्पा देसायाच्या बोलण्याचा भावार्थ असा वाई समशेरी तुझ्याकडून लढायांत माणसें मारलीं पण कधी शिकार मारण्याचा प्रसंग आला नव्हता. पाय दिला म्होर—पविश्रा टाकला. मुंड्याला—डोस्याला. मुंढ्याला—पाटीला. अंतर—अंतरे, अतरली. एक हातांत लेसणी दोन्ही तुकडे बराबर—बोरू मोडून बरोबर दोन तुकडे करावे तसे त्यानें आपल्या पटयाच्या वारानें वाघाचे बरोबर दोन तुकडे केले. सावभ्राला—सा वघ्राला—सहा व्याघ्रांना, एक मारल्यानंतर उरलेल्या सहांना. यीर—ईर, इर्षा. पाय

टाकला झत दोघे बरोबर ॥ खुस मर्जी महाराजाची आपावर ॥ तवा मान कन्याची पोटे चावती सार ॥ झाली ह्या राजाजी दया आपावर ॥ राणू म्हात त्याला वलाविला लौकर ॥ हुता मगनमस्तति हत्ती अष्टौपार ॥ त्याला मगनमस्तीच्या गोळ्या चढीव दोनचार ॥ हे नुकते राजे बसतील गादीवर ॥ दे इतक्यांत हत्ती सोडून दे बाहेर ॥ धनी० ॥ ५

झालें कूच महाराजाचे उलट माघार ॥ केले अवेचें दर्शन उलट माघार ॥ हे नुगते राजे जाऊन वसले गादीवर ॥ केली ह्याताने गडवड झाले तयार ॥ दिला हत्ती सोडून जाऊन शिरला शाहार ॥ मारतो गुरे ढोरे अत ना पार ॥ पाडलीं अवघीं गरिबाचीं घरें दारें ॥ मारले गोरगरिब लेंकरें पोर ॥ गला गरीबाचा आरडा राजाम्होर ॥ दडदडा बडविती ऊर राजा म्होर ॥ आज गरिबाचा बुडाला ससार ॥ तुम्ही दयावत ह्याराज करा कृपा आम्हांवर ॥ द्यो आपला हत्ती नेऊन बाघा ठाणावर ॥ तेव्हा म्हारा जाच्या डोळ्या लागली धार ॥ हीं गरीव माझीं मारलीं लेकरें ॥ अरे उठा उठा मानकरी व्हावें तयार ॥ द्यो हत्ती नेऊन बांधा ठाणावर ॥ तेव्हां मानकऱ्यानी मसलद केली सार ॥ बारा बारा वर्षे राबतो तुमचे बरोबर ॥ वरें एका वर्षी नाही दिले शभर ॥ दिली कुडू पिकायाची खेडी भाळावर ॥

ही सावकाराकडे घाण पडली सार ॥ नाही पोटाला भाकरी अंगवस्तर ॥ कसें चालून जावें महाराज हत्तीवर ॥ दर महिना रुपये खातो बारा हजार ॥ *तो नेऊन हत्ती बांधील ठाण्यावर ॥ आपानी शब्द ऐके कानभर ॥ हे खचित* देवा आले की माझ्यावर ॥ दिला पाय रिकीबींत झाला स्वार ॥ धनी महाराज येऊन केला मुजर ॥ धर्ना ॥ नि० ॥ ६

धनी महाराजाची मजवर राहावी नजर ॥ मरून गेलों तर धुळ पायाचे खर ॥ इतक्यात हत्ती बांधीन ठाणावर ॥ केला महाराजाला मुजरा निघाला बाहिर ॥ हुता मैदान जागा गेला गोठणावर ॥ मध्ये रोवला भाला घोडा मडळ्यावर ॥ इतक्यात हत्ती आला त्याचे समोर ॥ मी देसायाचा *वीर आलो तुजवर ॥ चल गाडू भडव्या ये मज अंगावर ॥ का मारतोस* ढोरें गुरें गरीव लेकर ॥ हत्तीने ओळखला शब्द आपाचा खरा ॥ दरारा मोहरा केला आपावर ॥ आपाने उडविला घोडा बाजूवर ॥ दोघाची *लागली कुस्ती झाले दोन प्रहर ॥ कवणास कोण हटेना दोघे बरोबर ॥* काय तारीफ त्या घोड्याची नक्षेदार ॥ त्यानें बगलत मुंडा धरिला वरचेवर ॥ हत्तीला फावला वाव वर्सला वार ॥ तवां सोंड पोचू लागली डोईवर ॥ तवा महाराजाचे डोळ्या लागली धार ॥ अरे उठा उठा मान करी बाधा कवार ॥ पायात पेचला घोडा घात झाला वर ॥ आतां खचित मरतें देसायाचे पोर ॥ तवा आपा साहेबाने ऐकला उत्तर ॥ नका नका तुमचे मानकरी वसू दात सार ॥ म्हाराजाची बारीक राहावी नदर ॥ इत

---

गवती फूल कानभर—कान भरून, लक्ष लावून धूळ पायाचे खर—*महाराजानी आता माझ्या पराक्रमावर नजर ठेवावी मी फुकट १२ हजार* रुपये खात नाही मी हत्ती बांधीनच पण ते न साधले आणि मेलों तर मी काय बोलून चालून तुमच्या पायाचा धुरळा धुळींत धूळ मिळून जाइल घोडा मडळावर—*मैदानात मध्यावर भाला रोवून त्याच्या भोंवती* मडलाकार घोडा फिरवू लागला नक्षेदार—तारफेचें विशेषण तारीफ—कौशल्य त्यानें बगलेंत मुडा धरिला वरचेवर—घोडा *मागील दोन पायावर उभा होता त्याचे पुढचे पाय हत्ती आपल्या सोंडेने* पकडू पहात होता, म्हणून त्या घोड्यानें आपले पुढले पाय आखडून मोडून बगलेशी दाबून धरले बारीक रहावी नजर—

क्यात हत्ती बांधीन ठाणावर ॥ दिली धाप मानेवर घोडा हुशार ॥ फरारारा घोडा उडवला वरच्या वर ॥ च्यारा टापा उचलुन ठेविल्या पाठीवर ॥ दिला घोडा सोडून चाला हत्तीवर स्वार ॥ दिला मार अकुशाचा हत्ती चिर चिर ॥ दरारारा ओढून नेला ठाणावर ॥ पायात भरला बिंडा बांधून तयार ॥ केला म्हाराजाला मुजरा येऊन माघार ॥ झाली म्हाराजाची दया आपावर टाकी खांद्यावरते हात दोघे बरोबर ॥ माझ्या वाजूचा मानकरी भला बाहादर ॥ दिला लोड तक्या उजव्या बाजूवर ॥ तो उजव्या बाजूचा मानकरी भला बाहादर ॥ खुस मर्जी महाराजाची त्या आपावर ॥ असं करता करता महिना झाला पार ॥ केला जोहार म्हाराजाला मागे पगार ॥ बारा हजाराचा तोडा टाकला होर ॥ घ्या आपा मोजून खोटे खर ॥ सभाळा चुकू नका त्यात तिळभर ॥ कल पगतीचें ताट बरोबर ॥ केली आपाला वस्तरे जरीचे जरतार ॥ केला आपान कवरबस्ता चाला तयार ॥ पानाच्या देतो पट्या खिसमतगार ॥ केला मुजरा म्हाराजाला निघाला बाहेर ॥ छत्रपती महाराज बगल्यावर ॥ तेव्हा महाराजाची गेली आपावर नजर ॥ दडदडा वडीवता ऊर डोळ्याला धार ॥ माझ्या पागेतऩ रणशूर निघाला वाहीर ॥ शिनहाळ माझी पागा दिसता सार ॥ फिराफिरा

---

माझ्याकडे महाराजानी लक्ष देऊन पाहावे बिंडा—दोरी सूत इत्यादिकांचे बिंडोळें (महाराष्ट्र शब्दकोश) तृणैराविष्टते रज्जु यदा नागोपिबध्यते हत्तीचे पाय बाधावयाचें दोरखड बारा हजाराचा तोडा टाकला होर--सामान्यत हजार रुपयाचा एक तोडा अशी समजूत आहे पण अलीकडील इतिहास सशोधकांनी ती खोटी ठरविली आहे उदाहरणार्थ, ( भा. इ स मडळ त्रैमासिकातील ना गो चापेकर यांचा लेख पहा ) कवरबस्ता करणें—कवरपट्टा आवळून सिद्ध होणें शिनहाळ—शिनहाळ असा शब्द कोशात सांपडत नाही शाहिराच्या म्हणण्याचा रोंख 'तुझ्यावाचून माझी पागा ओकी, उदास विधवेसारखी दिसते असा आहे ' माझी पागा रांडावली आहे जुन्या काळीं रांड या शब्दास सध्यासारखा वाइट अर्थ नव्हता रांड म्हणजे विधवा, अगतिक झालेली स्त्री मराठी लष्कराच्या जमाखर्चात रांडरोटी असा शब्द नेहमी येतो तेथें त्याचा अर्थ मेलेल्या शिपायाच्या बायकाला दिलेले पेन्शन

आपासाहेब यावे माघार ॥ माझे सांगण्याचा मजकूर ऐका खिणभर ॥ असा दरमहा तुम्हाला नाही मिळायचा बरबर ॥ कारकून लुचे सारे करतील मागे म्होर ॥ तुम्ही वरे नव्हे गडी उठाल जीवावर ॥ एक गाव निपाणी देतो तुह्मा नादर ॥ दाह्यांविस खेडी आहेत भोवत्या भोर ॥ ते सारे मोडून एक वशिव जा शाह्र ॥ तीन कोसावरचे पाणी नळाचे सार ॥ आठ पेठा वशीव जा प्रत्यक्ष दिसावे करवीर ॥ सात रेवण्या खदक जोरावार ॥ चौकोनी बाद जा किल्ला नक्षीदार ॥ धनी० ॥ ७

तवा आपासाहेबानें काय केला उत्तर ॥ हे नेऊन लखोटा द्यावीन वडला ह्मोर ॥ त्यानीं जा म्हटले तर माघें येणार ॥ त्याने नको म्हटले तर तिकडेच राहणार ॥ आपसात लाखोटा येईल आपला माघार ॥ केला मुजरा ह्माराजाला उडविला वोर ॥ आला आपल्या गांवामधि उलट माघार ॥ रघुनाथ देसाई हुते उद्देरवर ॥ त्याने कवरबस्ता ठेविले वडिला ह्मोर ॥

---

असा असतो शिनहाळ हा शिंदळ किंवा शिंदाळ या शब्दाचाहि अपभ्रंश असू शकेल, व म्हणून त्याचा अर्थ विधवा असाच होईल. खिणभर—क्षणभर मागेह्मोर करणें—लबाडी करण. तुम्ही वरें नव्हे गडी उठाल जिवावर—तुम्ही इरईचे सरदार अहा प्रसगीं जीव द्यायलाहि तयार व्हाल नादर—अत्युत्कृष्ट, अपूर्व (मोल्स्वर्थ) राजाचा भावार्थ असा कीं तुम्हाला १२ हजार रुपये पगार दिला, पण तुम्ही शिपाइ गडी, तुमचे कारकून म्हणजे कारभारी, त्याची नाही नाही त्या सबबी काढून वासलात लावून पुन्हा तुम्हास कर्जबाजारीच ठेवतील म्हणून तुम्हास मी एक दहावीस खेड्याचा गावच इनाम देतो म्हणजे तो तुम्हास वंशपरपरा उपभोगिता येईल भोवत्या भोर—आसपास, सभोवार रेवण्या—मूळ शब्द रेवणी, हाही शब्द इग्रजी रॅव्हेलिन् या शब्दाचा अपभ्रंश आहे रॅव्हेलिन् म्हणजे–Earth heaped up slopingly against the outer side of the wall of a fort, or if there be a ditch, of the side of the ditch for protection against shot (2) the Counter scarp or the outer region around the ditch of a fort आपसांत—आपसूक कवरबस्ता ठेवले वडलां म्होर—कमरेचा पट्टा व तलवार काढून

क्यांत हत्ती बांधीन ठाणावर ॥ दिली धाप मानेवर घोडा हुशार ॥ फरारारा घोडा उडवला वरच्या वर ॥ च्यारी टापा उचलुन ठेविल्या पाठीवर ॥ दिला घोडा सोडून झाला हत्तीवर स्वार ॥ दिला मार अंकुशाचा हत्ती चिर-चिर ॥ दरारारा ओढून नेला ठाणावर ॥ पायांत भरला बिंडा बांधून तयार ॥ केला म्हाराजाला मुजरा येऊन माघार ॥ झाली म्हाराजाची दया आपावर टाकी खांद्यावरते हात दोघे बरोबर ॥ माझ्या बाजूचा मानकरी भला बाहादर ॥ दिला लोड तक्या उजव्या बाजूवर ॥ तो उजव्या बाजूचा मानकरी भला बाहादर ॥ खुस मर्जी महाराजाची त्या आपावर ॥ असें करतां करतां महिना झाला पार ॥ केला जोहार म्हाराजाला मागे पगार ॥ बारा हजाराचा तोडा टाकला झोर ॥ घ्या आपा मोजुन खोटे खर ॥ सभाळा चुकूं नका त्यांत तिळभर ॥ केलें पंगतींचें ताट बरोबर ॥ केली आपाला वस्तरे जरीचे जरतार ॥ केला आपानें कंवरवस्ता झाला तयार ॥ पानाच्या देतो पट्या खिसमतगार ॥ केला मुजरा म्हाराजाला निघाला बाहेर ॥ छत्रपती महाराज बंगल्यावर ॥ तेव्हा महाराजाची गेली आपावर नजर ॥ दडदडा वडीवतों ऊर डोळ्याला धार ॥ माझ्या पागेतला रणशूर निघाला बाहीर ॥ शिनहाळ माझी पागा दिसती सार ॥ फिराफिरा

---

माझ्याकडे महाराजांनी लक्ष देऊन पाहावे. बिंडा—दोरी सूत इत्यादिकांचें बिडोळें (महाराष्ट्र शब्दकोश) तृणैराविष्टिते रज्जुः यदा नागोपिवध्यते. हत्तीचे पाय बांधावयाचें दोरखंड. बारा हजाराचा तोडा टाकला झोर—सामान्यतः हजार रुपयांचा एक तोडा अशी समजूत आहे पण अलीकडील इतिहास संशोधकांनीं ती खोटी ठरविली आहे. उदाहरणार्थ, ( भा. इ. सं. मंडळ त्रैमासिकांतील ना. गो. चापेकर यांचा लेख पहा. ) कंवरवस्ता करणें—कंवरपट्टा आवळून सिद्ध होणें. शिनहाळ—शिनहाळ असा शब्द कोशांत सांपडत नाहीं. शाहिराच्या म्हणण्याचा रोंख 'तुझ्यावांचून माझी पागा ओकी, उदास विधवेसारखी दिसते असा आहे.' माझी पागा रांडावली आहे. जुन्याकाळीं रांड या शब्दास सध्यासारखा वाईट अर्थ नव्हता. रांड म्हणजे विधवा, अगतिक झालली स्त्री. मराठी लष्कराच्या जमाखर्चात रांडरोटी असा शब्द नेहमीं येतो तेथें त्याचा अर्थ मेलेल्या शिपायाच्या बायकोला दिलेले पेन्शन

आपासाहेब यावे माघार ॥ माझे सागण्याचा मजकूर ऐका खिणभर ॥ असा दरमहा तुम्हाला नाही मिळायचा वरवर ॥ कारकून लुच्चे सारे करतील मागे म्होर ॥ तुम्ही बरे नव्हे गडी उठाल जीवावर ॥ एक गाव निपाणी देतो तुह्मा नादर ॥ दाहाविस खेडी आहेत भोवत्या भोर ॥ ते सारे मोडून एक वशिव जा शाहर ॥ तीन कोसावरचे पाणी नळाचे सार ॥ आठ पेठा वशीव जा प्रत्यक्ष दिसावे करवीर ॥ सात रेवण्या खदक जोरावार ॥ चौकोनी बाद जा किल्ला नक्षीदार ॥ धनी० ॥ ७

तवा आपासाहेबांनी काय केला उत्तर ॥ हे नेऊन लखोटा दावीन वडला ह्मोर ॥ त्यानी जा म्हटले तर माघं येणार ॥ त्याने नको म्हटले तर तिकडेच राहणार ॥ आपसात लाखोटा येइल आपला माघार ॥ केला मुजरा ह्माराजाला उडविला घोर ॥ आला आपल्या गांवामधि उलट माघार ॥ रघुनाथ देसाई हुते रादरेवर ॥ त्याने कबरबस्ता ठेविले वडिला ह्मोर ॥

---

असा असतो शिनहाळ हा शिंदळ किंवा शिंदाळ या शब्दाचाहि अपभ्रंश असू शकेल, व म्हणून त्याचा अर्थ विधवा असाच होईल खिणभर—क्षणभर मागेम्होर करणें—ल्बाडी करण तुम्ही बरें नव्हे गडी उठाल जिवावर—तुम्ही इरईचे सरदार अहा प्रसगीं जीव द्यायलाहि तयार व्हाल नादर—अत्युत्कृष्ट, अपूर्व (मोल्स्वर्थ) राजाचा भावार्थ असा कीं तुम्हाला १२ हजार रुपये पगार दिला, पण तुम्ही शिपाइ गडी, तुमचे कारकून म्हणजे कारभारी, त्याची नाही नाही त्या सबबा काढून वासलात लावून पुन्हा तुम्हास कर्जबाजारीच ठेवतील म्हणून तुम्हांस मी एक दहावीस खेड्याचा गावच इनाम देतो म्हणजे तो तुम्हास वशपरपरा उपभोगिता येईल भोवत्या भोर—आसपास, सभोवार रेवण्या—मूळ शब्द रेवणी, हाही शब्द इंग्रजी रॅव्हेलिन् या शब्दाचा अपभ्रंश आहे रॅव्हेलिन् म्हणजे–Earth heaped up slopingly against the outer side of the wall of a fort, or if there be a ditch, of the side of the ditch for protection against shot (2) the Counter scarp or the outer region around the ditch of a fort आपसात—आपसूक कबरबस्ता ठेवले वडलां म्होर—कमरेचा पट्टा व तलवार काढून

क्यात हत्ती बाधीन ठाणावर ॥ दिली धाप मानेवर घोडा हुशार ॥ फरारारा घोडा उडवला वरच्या वर ॥ च्यारी टापा उचलुन ठेविल्या पाठीवर ॥ दिला घोडा सोडून झाला हत्तीवर स्वार ॥ दिला मार अंकुशाचा हत्ती चिर-चिर ॥ दरारारा ओढून नेला ठाणावर ॥ पायात भरला बिंडा बांधून तयार ॥ केला म्हाराजाला मुजरा येऊन माघार ॥ झाली म्हाराजाची दया आपावर टाकी सायावरते हात दोघे बरोबर ॥ माझ्या वाजूचा मानकरी भला बाहादर ॥ दिला लोड तक्या उजव्या बाजूवर ॥ तो उजव्या बाजूचा मानकरी भला बाहादर ॥ खुस मर्जी महाराजाची त्या आपावर ॥ असें करता करता महिना झाला पार ॥ केला जोहार म्हाराजाला मागे पगार ॥ बारा हजाराचा तोडा टाकला म्होर ॥ घ्या आपा मोजुन खोटे खर ॥ सभाळा चुकूं नका त्यांत तिळभर ॥ केले पंगतीचें ताट बरोबर ॥ केली आपाला वस्तरे जरीचे जरतार ॥ केला आपानें कंबरबस्ता झाला तयार ॥ पानाच्या देतो पट्या खिसमतगार ॥ केला मुजरा म्हाराजाला निघाला बाहेर ॥ छत्रपती महाराज वगल्यावर ॥ तेव्हा महाराजाची गेली आपावर नजर ॥ दडदडा वडीवतो ऊर डोळ्याला धार ॥ माझ्या पागेतला रणशूर निघाला बाहीर ॥ शिनहाळ माझी पागा दिसती सार ॥ फिराफिरा

---

माझ्याकडे महाराजानी लक्ष देऊन पाहावे. बिंडा—दोरी सूत इत्यादिकांचे बिंडोळें (महाराष्ट्र शब्दकोश) तृणैरावेष्टिते रज्जु यदा नागोपिवध्यते हत्तीचे पाय बांधावयाचें दोरखड बारा हजाराचा तोडा टाकला म्होर--सामान्यत हजार रुपयांचा एक तोडा अशी समजूत आहे पण अलीकडील इतिहास सशो धकांनी ती खोटी ठरविली आहे. उदाहरणार्थ, ( भा. इ स मडळ त्रैमा सिकातील ना गो चापेकर याचा लेख पहा. ) कंबरबस्ता करणें—कंबरपट्टा आवळून सिद्ध होणे. शिनहाळ—शिनहाळ असा शब्द कोशांत सांपडत नाही. शाहिराच्या म्हणण्याचा रोंख 'तुझ्यावाचून माझी पागा ओसं, उदास विधवेसारखी दिसते असा आहे' माझी पागा रांडावली आहे जुन्या काळीं रांड या शब्दास सध्यासारखा वाईट अर्थ नव्हता. रांड म्हणजे विधवा, अगतिक झालली स्त्री. मराठी लष्कराच्या जमाखर्चात राडरोटी असा शब्द नेहमी येतो तेथें त्याचा अर्थ मेलेल्या शिपायाच्या बायकोला दिलेल पेन्शन

आपासाहेब यावे माघार ॥ माझे सागण्याचा मजकूर ऐका खिणभर ॥ असा दरमहा तुम्हाला नाही मिळायचा वरवर ॥ कारकून तुचे सारे करतील मागे म्होर ॥ तुम्ही बरे नव्हे गडी उठाल जीवावर ॥ एक गाव निपाणी देतो तुझा नादर ॥ दाह्मविस खेडी आहेत भोवत्या भोर ॥ ते सारे मोडून एक वशिव जा शाहर ॥ तीन कोसावरचे पाणी नळाचे सार ॥ आठ पेठा वशीव जा प्रत्यक्ष दिसावे करवीर ॥ सात रेवण्या खदक जोरावार ॥ चौकोनी बाद जा किल्ला नक्षीदार ॥ धनी० ॥ ७

तवा आपासाहेबानें काय केला उत्तर ॥ हे नेऊन लखोटा दावीन वडला झोर ॥ त्यानीं जा म्हटले तर माघे येणार ॥ त्याने नको म्हटले तर तिकडेच राहणार ॥ आपसात लखोटा येईल आपला माघार ॥ केला मुजरा ह्माराजाला उडविला घोर ॥ आला आपल्या गांवामधि उलट माघार ॥ रघुनाथ देसाई हुते सदरेवर ॥ त्याने कबरबस्ता ठेविले वडिला म्होर ॥

---

असा असतो. शिनहाळ हा शिंदळ किंवा शिंदाळ या शब्दाचाहि अपभ्रंश असू शकेल, व म्हणून त्याचा अर्थ विधवा असाच होईल. खिणभर—क्षणभर मागेम्होरे करणें—लबाडी करणें. तुम्ही बरें नव्हे गडी उठाल जिवावर—*तुम्ही इरईचे सरदार अहा प्रसंगीं जीव द्यायलाहि तयार व्हाल* नादर—*अत्युत्कृष्ट, अपूर्व (मोल्स्वर्थ)*. राजाचा भावार्थ असा कीं तुम्हाला १२ हजार रुपये पगार दिला, पण तुम्ही शिपाई गडी, तुमचे कारकून म्हणजे कारभारी, त्याची नाही नाही त्या सबबी काढून वासलात लावून पुन्हा तुम्हास कर्जबाजारीच ठेवतील म्हणून तुम्हास मी एक दहावीस खेड्याचा गावच इनाम देतो म्हणजे तो तुम्हास वशपरपरा उपभोगिता येईल भोवत्या भोर—आसपास, सभोवार रेवण्या—मूळ शब्द रेवणी, हाही शब्द इग्रजी रॅव्हेलिन् या शब्दाचा अपभ्रंश आहे रॅव्हेलिन् म्हणजे-Earth heaped up slopingly against the outer side of the wall of a fort, or if there be a ditch, of the side of the ditch for protection against shot (2) the Counter scarp or the outer region around the ditch of a fort आपसांत—आपसूक कबरबस्ता ठेवले वडलां म्होर—कमरेचा पट्टा व तलवार काढून

येणूबाइ माता ह्मणे यशवत पुतर ॥ माझ्या वशाला जन्मला कीं रामचद्र ॥ मग बसले बाजूवर जरा खिणभर ॥ मीं जातों लिपाणीला पाहाया मजकूर ॥ फरारारा उडविला घोडा कुमाईत बोर ॥ निपाणीचा मारग धरिला झोर ॥ पाह्तो निपाणीला न्याहाळून चौफेर ॥ ल्हानस दिसतें भोवतें डोंगर ॥ हीं सारीं खेडीं मोडून वसवावे शाहार ॥ असा मनामधिं शोध केला विचार ॥ धनी० ॥ ८

ह्यो किल्ला बांधायाचा केला सुमार ॥ जिते दावील माझा घोडा तिथे तयार ॥ दिला लगाम टाकून ऐका मानेवर ॥ दिलीं टाच त्या घोड्यास उडविला बोर। भरधाव घोडा हिंडतो भोवत्या भोर। गप करून उभा राहिला जाग्यावर। खालीं उतरले सरदार घोड्याच्या झोर। त्यानी बोलाविले वड्ड कोरवी वेलदार ॥ खदकाचें लावले काम अचबर ॥ जिते पाणी खदकामधिं काळें भोर ॥ त्यामधिं सोडले मास कासाव सुसर ॥ सानरेवण्या खदक जोरावार ॥ किल्ल्याच लावले काम नक्षेदार ॥ गोरगरीब भरती पोटें अतनापार ॥ चौकोनी बांधला किल्ला नक्षेदार ॥ सदरेचें चाललें काम किल्ल्याझोर ॥ सुरुचे लावलें खाब बाजूवर ॥ वर वर्ख दिला सोनेरी नक्षेदार ॥ खिडक्या मोंवर आयने सार ॥ हीं नानापराचीं काढलीं चितर ॥ सांबर भेकर हत्ती सार ॥ चालले कीं शिलेदार माहालदार ॥ अशी नानापरींची काढिलीं चितर ॥ धनी० ॥ ९

सदरत बसलीं स्वारी देव अवतार ॥ त्यांनी सदरेमधि बसून लिवलीं पतर ॥ देशाला धाडून दिलीं कीं दुनयावर ॥ कोणी असाल वाणी उदमी शेटे सावकार ॥ कवलाने देतो पटे भरवा बाजार ॥ नाही जकात फसकी

---

वडलांच्या पायावर ठेविली बाजूवर—बाजूस, शेजारी सुमार—संकेत वड्ड, कोरवी, वेलदार—ह्या सर्व कनाटकातील जाती यांचें काम खाणी खणणें, दगड काढण, दगड फोडण इत्यादि असें ऐतिहासिक काळीं लष्कराबरोबर ही मडळी सध्याच्या सॅपर्स मायनर्सच काम करीत अचबर—आश्चर्य वाटण्याजोगे, अचबा वाटण्याजोगे मोंवर— (?) कौलानें देतों पट्टे भरवा बाजार—ऐतिहासिक काळी एखाद्या सरदाराला सरकाराबरोबर आपल्या गावात नवीन बाजारपेठ

घेत कुणा तिळभर ॥ तुम्ही स्वस्थपणाने विकावी ढोरगुर ॥ आठ पेठा केल्या प्रत्यक्ष करवीर ॥ तीन कोसावरनें पाणी नळाचें सार ॥ आठ पेठेत पाणी केलं अचंबर ॥ तिथे राज्य करतो धनी हा निपाणकर ॥ जसा जाळीमाधिं वघ्र तसा बिनघोर ॥ करवीरामधिं सोंदे लुच्चे सार ॥ तेन्हां महाराजाला शिकवतात वरवर ॥ ह्या आपाला तुह्मी दिलें निपाणी शाहार ॥ ह्यो वंशानवंशीं फुकट बसून खाणार ॥ अशी आपानें कुठे केली तलवार ॥ हे निपाणी सुटायाचा एक हुन्नेर ॥ आम्ही सांगतो तुह्मी ऐका राजेश्वर ॥ या दुनयामधिं मातले अनंतपूर ॥ तिथं धाडून द्यावा नाहीं मागे येणार ॥ तो मरून तिकडे होऊन जाईल ठार ॥ आपसांत निपाणी सुटेल आपले शार ॥ मोठा रम्य जागा आहे तो भेसूर ॥ दीन दीन रण खेळत अष्टोपार ॥ तिथें भोंग्याचा भडिमार नर्षतो फार ॥ तिथे गल्लिमाचा काठ नाही तिळभर ॥ धोंडे दगड पाठी लागलाती डोंगर ॥ मोठे राजे प्रजे पळून गेले सार ॥ मोठे रुमचे बाच्छा बारा वर्षे

---

बसविण्याची अनुज्ञा मिळाली म्हणजे तो, वाणी उदम्यांस कळवी कीं तुम्हांस अमूक इतक्या वर्षापर्यंत दुकानपट्टी किंवा इतर कोणतेही कर तुमचेकडून घेणार नाहीं. तुम्हांस घरें दुकानें बांधण्यासाठीं सवलतीनें जागा देतों. इस्तावा—नवीन जमीन कीर्दमामुरीस येतेवेळीं कांहीं वर्षेपर्यंत भर साऱ्या पेक्षा कमी परंतु दरसाल वाढत्या साऱ्याने जमीन देण्याविषयींचें करारपत्र (महाराष्ट्र शब्दकोश). पट्टा—करारपट्टा. फसकी—एक प्रकारचा बाजारांतला कर. हा कर धान्य भाजीपाला विकणाऱ्या दुकानदारांकडून घेतला जाई (मोल्स.) वरवर—पुन्हा पुन्हा. *निपाणी सुटायचा हुन्नर*—आप्पाकडून निपाणी काढून घेण्याची युक्ति. हुन्नर-युक्ति. भेसूर—भयकर. तेथे भुताटकी आहे. अनंतपूर जागा मोठी रम्य आहे परंतु क्षपाटलेली आहे. दिन दिन रण खेळत अष्टोपार—तेथें अष्टौप्रहर रणांगणांत होणाऱ्या अशा गर्जना ऐकूं येत असतात. भोंग्याचा भडिमार—तेथे अकस्मात टोळधाडीसारखे भुंगे उठतात. अफझुलखानाच्या पोवाड्यात किंवा बखरीत खानानें पंढरपूरचा विठोबा फोडल्यावर भयंकर भुंगे उठून त्यांनी खानाच्या सैन्यास हैराण केल्याची हकीकत आलेली आहेच. काढ—काट पाहिजे.—काट चालणें हा शब्द प्रसिद्धच

बरोबर ॥ झाडें लावून आंबे खावून पळाले सार ॥ भिवा अर्जुनासारखे दमले वीर ॥ रामचंद्रासारखे गेले नाही म्होर ॥ तसल्याला नाही आले आनतपूर ॥ तिथे धाडा निपाणकर नाही येणार ॥ राजाचे अंग सोन्याचें पितळकान सार ॥ त्यांनी ही हलकी गोष्ट ऐकून लिहिले बरोबर ॥ तुम्ही निपाणकर बहादर यावे लौकर ॥ मोठी वेळ बावा पडली माझ्यावर ॥ जर लिपाणी मधि भोजन केले तर ॥ तुम्ही हात धुण्याला जलदी यावे करवीर ॥ माझ्या उजव्या बाजूचा मानकरी होशील तर ॥ मोठी वेळ बावा माझ्यावर ॥ केला हुकूम कारकुनाला जलदी तयार ॥ केला स्वाराच्या हवाली पळ लौकर ॥ या निपाणकराला जलदी यावे पत्र ॥ भरधांव घोडा करीत मारामार ॥ एक तासामधि गांठ निपाणी शाहार ॥ धनी आपासाहेब सरदार सदरेवर ॥ इतक्यात जाऊन पोंचला ऐका स्वार ॥ त्याने नेऊन लाखोटा दिला कीं आपाह्मोर ॥ त्यानें मुजरा करून राहिला परभार ॥ तवा आपासाहेबाने वाचून पाहातो अक्षर ॥ धडधडा वडवता ऊर डोळ्याला धार ॥ काय वेळ देवा आली मज राजावर ॥ आतां सामान घालायासी होईल उशीर ॥ तशी होती झुरखी टाकली पाठीवर ॥ नाहीं लगाम तोंडामधि झाला स्वार ॥ एक लहिजेमधिं गाठले करवीर ॥ भरधाव घोडा सोडला कुमाईत बेर ॥ थयथया नाचवी घोडा सदरे ह्मोर ॥ तवा माहाराज ह्मणति आपा खाल उतर ॥ कुठे गलीम भोरचा आला तुमचेवर ॥ मला दावून राजे बसाजा गादीवर ॥ कुटे गलीम भोरचा नाहीं माझ्यावर ॥ तुला सागण्याचा मजकूर ऐक खिणभर ॥ या दुनयामधि

---

आहे अनतपुरावर शत्रू चालून जाईल. पण तेथे त्याचा क्षणभरहि काट चालणार नाही. धोंडे दगड पाठीं लागल्याती डोंगर—दगड येतात राजे-प्रजे—राजेरजवाडे. प्रजे याची उपपत्ति ज्याच्या पदरीं काही प्रजा किंवा रयत आहे असे सरदार किंवा जहागिरदार अशी लावावी. झाडें लावून इत्यादि—झाडे रुजून त्याला फळें येतील इतका काळपर्यंत अनतपुराला वेढा देऊन बसले तरी ते त्याच्या हातीं आल नाही व शेवटी त्यांना उठून जावे लागलें. भिवा अर्जुनासारखे—भीमा अर्जुनासारखे. वेळ पडली—वक्त गुदरला, प्रसग पडला, सकट आल.

मातले अनतपूर ॥ कुठे वडील आमचे गेले हुते माधार ॥ ते पळून गेले म्हणून हंसतात सार ॥ त्यांच्या वशीं जन्मून राज्य कह काय थोर ॥ माझ्या उजव्या बाजूचा मानकरी होशील तर ॥ ह्या अनतपूरची कापून आणा शिर ॥ दर वेशीला शीर बांधा शभर शभर ॥ १०

तवां आपासाहिबानें काय केला उत्तर ॥ जर घेईन अनंतपूर काय देणार ॥ राजाची जात बैलाची कळले नाहीं थोर ॥ फटकरुनि राजाच्या मुखीं आला उत्तर ॥ जर घेशील अनतपूर सांगतो खर ॥ माझ्या पोटची कन्या करीन तुझी नार ॥ माझा खांसा जांवाई घेईन माडीवर ॥ हें अर्धे राज्य तुझे हवालीं सार ॥ तवां आपासाहेबानें काय केला उत्तर ॥ ह्याप्रमाणे बद लिहून द्या करकर ॥ सातशे नायकवडी घाला साक्षी सार ॥ याप्रमाणे बद लिहून दिला करकर ॥ केला मुजरा ह्याराजाला निघाला बाहीर ॥ तेव्हां म्हाराजाने स्पष्ट केला उत्तर ॥ घे दारूगोळा खर्ची संगे बरोबर ॥ घ्या पालख्या, पिलवान हत्ती उंट सार ॥ व्हावे ते लष्कर न्यावे बरोबर ॥ तवा आपासाहेबाने काय केला उत्तर ॥ या करवीरचे मला लोक नका तिळभर ॥ मी फकस्त

---

माझ्या उजव्या बाजूस मानकरी होशील तर—माझ्या उजव्या हाताला बसणारा तु मानकरी असशील तर. बुरखी—मुरकी झूल A cloth covering the body and head of a horse ( मोल्स. ) तशी. होती—होती तशीच. लहज—धाव, लहर. मूळशब्द लहज ( अरबी ), त्याचा अर्थ a moment, an instant असा आहे. ( मोल्स. ) गनीम मोरचा—गनीमाचा मोरचा. उजव्या बाजूचा मानकरी होशील तर—तर म्ह. जर. लोक सांगतात कीं माझ्या वाडवडलांनी अनंतपुरावर स्वाऱ्या केल्या; पण तेथे त्यांची फजिती होऊन त्यांना दरवेळीं परत यावें लागलें, तो दुर्लौकिक मला धुऊन काढावयाचा आहे करितां जर तूं खरा माझ्या उजव्या हाताचा मानकरी म्हणवीत असशील तर तें काम तू आतां करून दाखवावेंस. राजाची जात बैलाची कळलें नाहीं म्होर—राजा निर्बुद्धच; आपण असलें अचाट काम सांगतो खरें पण त्याचा परिणाम काय होईल याचा त्याला तर्क झाला नाहीं. फटकरुनी—ताडकन. बंद—कागद, करार. खर्ची—

बरोबर ॥ झाडें लावून आंबे खावून पळाले सार ॥ भिवा अर्जुनासारखे दमले वीर ॥ रामचंद्रासारखे गेले नाहीं म्होर ॥ तसल्याला नाहीं आले आनतपूर ॥ तिथे धाडा निपाणकर नाहीं येणार ॥ राजाचे आग मोन्याचे पितळकान सार ॥ त्यांनीं ही हलकीं गोष्ट ऐकून लिहिले बरोबर ॥ तुम्ही निपाणकर बहादर यावे लौकर ॥ मोठी वेळ बाबा पडली माझ्यावर ॥ जर लिपाणी मधि भोजन केले तर ॥ तुम्ही हात धुण्याला जलदी यावे करवीर ॥ माझ्या उजव्या बाजूचा मानकरी होशील तर ॥ मोठी वेळ बाबा माझ्यावर ॥ केला हुकूम कारकुनाला जलदी तयार ॥ केला स्वाराच्या हवालीं पळ लौकर ॥ या निपाणकराला जलदी यावे पत्र ॥ भरधाव घोडा करीत मारामार ॥ एक तासामधिं गाठ निपाणी शाहार ॥ धर्नी आपासाहेब सरदार सदरेवर ॥ इतक्यात जाऊन पोंचला ऐका स्वार ॥ त्याने नेऊन लाखोटा दिला कीं आपाम्होर ॥ त्यानें मुजरा करून राहिला परभार ॥ तवा आपासाहेबानें वाचून पाहातो अक्षर ॥ धडधडा वर्डावता ऊर डोळ्याला धार ॥ काय वेळ देवा आली मज राजावर ॥ आतां सामान घालायासी होईल उशीर ॥ तशी होती बुरखी टाकली पाठीवर ॥ नाहीं लगाम तोंडामधि झाला स्वार ॥ एक लहिजेमधिं गाठलें करवीर ॥ भरधाव घोडा सोडला कुमाईत बेर ॥ थयथया नाचवी घोडा सदरे म्होर ॥ तवा माहाराज म्हणति आपा खाल उतर ॥ कुठे गलीम मोरचा आला तुमचेवर ॥ मला दावून राजे बसाजी गादीवर ॥ कुठे गलीम मोरचा नाहीं माझ्यावर ॥ तुला सांगण्याचा मजकूर ऐक खिणभर ॥ या दुनयामधि

---

आहे. अनतपुरावर शत्रू चालून जाईल. पण तेथे त्याचा क्षणभरहि काट चालणार नाही. धोंडे दगड पाठीं लागल्याती डोंगर—दगड येतात.राजे-प्रजे—राजेरजवाडे. प्रजे याची उपपत्ति ज्याच्या पदरीं काही प्रजा किंवा रयत आहे असे सरदार किंवा जहागिरदार अशी लावावी. झाडें लावून इत्यादि—झाडें रुजून त्याला फळें येतील इतका काळपर्यंत अनतपूराला वेढा देऊन बसले तरी ते त्याच्या हातीं आलं नाहीं व शेवटीं त्यांना उठून जावें लागलं भिवा अर्जुनासारखे—भीमा अर्जुनासारखे. वेळ पडली—वक्त गुदरला, प्रसंग पडला, संकट आले.

मातले अनंतपूर ॥ कुठे वडील आमचे गेले हुते माघार ॥ ते पळून गेले म्हणून हंसतात सार ॥ त्यांच्या वशी जन्मून राज्य करू काय होर ॥ माझ्या उजव्या बाजूचा मानकरी होशील तर ॥ ह्या अनतपूरची कापून आणा शिर ॥ दर वेशीला शीर बांधा शभर शभर ॥ १०

तवां आपासाहेबाने काय केला उत्तर ॥ जर घेईन अनतपूर काय देणार ॥ राजाची जात वैलाची कळले नाहीं ह्योर ॥ फटकरूनि राजाच्या मुखीं आला उत्तर ॥ जर घेशील अनतपूर सांगतो खर ॥ माझ्या पोटची कन्या करीन तुझी नार ॥ माझा खांसा जांवाई घेईन मांडीवर ॥ हें अर्धे राज्य तुझे हवालीं सार ॥ तवां आपासाहेबाने काय केला उत्तर ॥ ह्याप्रमाणे बद लिहून द्या करकर ॥ सातशें नायकवडी घाला साक्षी सार ॥ याप्रमाणे बद लिहून दिला करकर ॥ केला मुजरा ह्याराजाला निघाला बाहेर ॥ तेव्हां म्हाराजाने स्पष्ट केला उत्तर ॥ घे दारुगोळा खर्ची संगे बरोबर ॥ घ्या पालख्या पिलवान हत्ती उंट सार ॥ न्हावे ते लष्कर न्यावे बरोबर ॥ तवा आपासाहेबाने काय केला उत्तर ॥ या करवीरचे मला लोक नका तिळभर ॥ मी फकस्त

---

माझ्या उजव्या बाजूस मानकरी होशील तर—माझ्या उजव्या हाताला बसणारा तू मानकरी असशील तर. बुरखी—भुरकी झूल A cloth covering the body and head of a horse (मोल्स.) तशी होती—होती तशीच. लहज—घाव, लहर. मूळशब्द लहज (अरबी). त्याचा अर्थ a moment, an instant असा आहे. (मोल्स.) गनीम मोरचा—गनीमाचा मोरचा. उजव्या बाजूचा मानकरी होशील तर—तर म्ह. जर. लोक सांगतात कीं माझ्या वाडवडलांनी अनतपुरावर स्वाऱ्या केल्या; पण तेथे त्यांची फजिती होऊन त्यांना दरवेळीं परत यावे लागले, तो दुर्लौकिक मला धुऊन काढावयाचा आहे करितां जर तूं खरा माझ्या उजव्या हाताचा मानकरी म्हणवीत असशील तर तें काम तूं आतां करून दाखवावेस. राजाची जात बैलाची कळलें नाहीं म्होर—राजा निर्बुद्धच; आपण असलें अचाट काम सांगतो खरे पण त्याचा परिणाम काय होईल याचा त्याला तर्क झाला नाहीं. फटकरुनी—ताडकन. बंद—कागद, करार. खर्ची—

एकटा घेइन अनतपूर ॥ पुनपायाचा प्रताप असावा मजवर ॥ केला मुजरा ह्याराजाला उडीवला वीर ॥ आला आपल्या निपाणीला उलट माघार ॥ रघुनाथ देसाई होते सदरेवर ॥ त्याने नेऊन लखोटा टाकला वडीला होर॥ रघुनाथ देसाई घेऊन लखोटा होर ॥ जेव्हा अनतपूरची वोळ लागली होर॥ फट करून लखोटा टाकला धरणीवर ॥ धडधडा बडीवतो ऊर डोळ्याला धार ॥ नको नको त्यांची निपाणी सोड त्यांचे शाहार ॥ चल आपल्या खेड्यामाधिं करू रोजगार ॥ ह्या अनतपूरची वाईट बाबा खबर ॥ तिथे गेल्याला कुणी नाही आला माघार ॥ तुझे आजेपणजे तिथे खपले सार ॥ ह्या अनतपूरची वाइट बाबा खबर ॥ नको जाऊ अनतपुरा फिरा माघार ॥ ११

वेणूबाई माता होती खोलीच्या दार ॥ नको जाऊस माझ्या मुला आनतपुर ॥ ह्या अनतपूरची वाईट बाबा खबर ॥ तिथे गेल्याला कुणी नाही आला माघार ॥ मुखांत घालिती मुख गाई गाईवार ॥ तोंडावरने फिरविते हात पुसते पदर ॥ पचामृताची धार पाजून आजवर ॥ माझें व्यरथेरे बाबा झालें सार ॥ ह्या अनतपुरासाठीं झालास उपवर ॥ तुझी सुरतरे सुरत वघू कुठ आता होर ॥ म्या केला रजाचा गज लहानाचा थोर॥ म्यां डोळ्याचे दिवे केले आजवर ॥ म्या केले हाताचे पाळणे तळहातावर ॥ ह्या आपासारखा धनी कुणी नाही होणार ॥ गोरगरीब रडती रडती ल्हानथोर ॥ ह्यारपोर रडती रडती रंत लेंकर ॥ पागेत घोडी हिंसती चौकडे सार ॥ गाय गोठणा आरडती घरीं वांसर ॥ हे शिकाररवाने कुत्री रडती सार ॥ राधाबाई त्याची अस्तुरी खोलीच्या दार ॥ अरे थु थु गाढ काय रडतां सार ॥ शूर मर्दाच्या जन्माला वर्शी करावी तलवार ॥ नव्हे

---

पैका पिलवान—महात, पील–हत्ती व्हावेते—हवे ते पुन्हा पायाचा प्रताप इ.—पायाची कृपा किंवा आशीर्वाद वोळ—अनंत पुरासबधीचा मजकूर या अनतपुरासाठी झालास उपवर—उपवर–थोर आई म्हणते या अनतपुरावर स्वारी नेऊन तेथे अखेर मरण्यासाठीच का बाबा मी तुला लहानाचा मोठा केला? म्यां डोळ्याचे दिवे केले इत्यादी—जुन्या स्त्रियांच्या ओव्यांतहि हीच उपमा बरोबर याच शब्दांनी आली आहे. उदाहरणार्थ, " माऊलीचे कष्ट कुठें रे फेडूं देवा। तळ हाताचा पाळणा नेत्राचा केला दिवा।"

साळी कोष्टयाचा बसून राहशील घर ॥ जर सोडून अनतपूर फिराल माघार ॥ तर तांड घेऊन जावे देशावर ॥ जर सोडून अनतपूर फिराल माघार ॥ तुझ्या आईच्या लावशील हात निराला झोर ॥ तेव्हा निपाण कराला अचेट पडली वीर ॥ तेव्हा निपाणकराचे लाल डोळे तवर ॥ पचा रती घेऊन आली सुंदर ॥ तिनें ओवाळीला भरतार जसा विश्वर ॥ फरफरा पाटाव फेडून टाकली झोर ॥ तिनें फेक पाढरे नेसली धोतर ॥ फरफरा जोडवीं टाकली व्हाकडे चार ॥ फडफडा कांकण फोडुन केला चूर ॥ तड तडा डोरलें तोडून टाकले वरचेवर ॥ फरफरा कुकू पुसल कपाळावर ॥ *मी रांड जी रांड झाले आजवर ॥ तुम्ही येण्याच्या पावतर हाच अव तार* ॥ वर्जिलें अन्न पाणी घेती सुटसाखर ॥ एक पै वजनाची किती होइल साखर ॥ कसा प्राण जीतजला त्याच्यावर ॥ महापतीमता मावली सत्यभामा थोर ॥ काय तुळस बोलत होती तिच्या बरोबर ॥ गेली तुळशी पाशीं एकच पायावर ॥ त्या तुळशीला करती नमस्कार ॥ माझे बाइ देसाई जात्यात अनतपूर ॥ तुह्मी जावें पाठीवर होउनि तयार ॥ मी भीदा वणापाशी येवून राहणार ॥ तेव्हा निपाणकरानें मनिं केला विचार ॥ माझे

---

रैत—रयत हिंसती—हिंसती नव्हे साळी कोळ्याचा इ —अरे रडतो काय तुम्ही कांही साळी कोष्टयाच्या वशांत जन्मला आहां ! जो क्षत्रिय आहे त्याने हसतच लढाईस जाऊन तरवार म्हणजे पराक्रम केला पाहिजे साळी कोष्टी इ बिनलढाऊ वशातले जे असतील त्यांनी वाटलें तर घरीं बसून रहावें तोंड घेऊन जावें देशावर—तोंड काळें करून परगदा व्हावें अचेट पडली धीर—भयकर ईर्षा उत्पन्न झाली तवर—उन्मत्त, धुंद ( महाराष्ट्र शब्द कोश ) पाटाव—उंची नेसते वस्त्र डोरलें—डोरली च्या फळासारखा दागिना डोरल ही सुपारी एवढ्या पिवळ्या धमक, रान वांग्याची एक जात आहे मी रांड झालें आजवर इ —तुह्मी अनतपुरा च्या स्वारीवरुन परत येईपर्यंत मी विधवाच झालें आहे असें समजतें व म्हणून सव सौभाग्यालंकारही मी फेकून दिले आहेत आजवर—आजपासून जितजळा—जगविला तुळस बोलत होती तिच्याबरोबर—सत्यभामा ही महापतिव्रता होती व तुळस तिच्याबरोबर प्रत्यक्ष बोलत अस

बाळपणाचे आरब आहेत मैतर ॥ त्या अरबस्थानाला ल्याहावे पतर ॥ मोठी वेळ पडली बाबा माझ्यावर ॥ बारा हजार आरब बाधून या कबर ॥ ह्या आरबस्तानाला पोचले पतर ॥ काय वेळ पडला आमच्या मैत्रावर ॥ बारा हजार आरब बाधली क्वर ॥ रातोरात येऊन पोंचले निपाणी शाहर ॥ बर म्यान रुप्याचें कट बदुकिला सार ॥ बदुकींत भरले वार झाले तयार ॥ जोडजामग्या जळती निघाले लष्कर ॥ रातोरात येवून पोंचले निपाणी शाहार ॥ या निपाणकराला येवून केले मुजर ॥ त्यानें दुध भाताचे ताट ठेवल म्होर ॥ सकळानी घातला हात क्रिया बरोबर ॥ कुणी करशील होगड्या फादफितूर ॥ त्यानी शिवलाजी पाहा बेलभडार ॥ मी गुळाचा गणेश गादीवर ॥ ह्या निपाणीमधि झडा तुमचा कारभार ॥ १३

---

मींदावण—वृंदावन माझे बाळपणाचे अरब आहेत मैतर इ – निपाणकराच्या सैन्यांत अरबांची विशेष भरती होती ह ऐतिहासिक हकीकतींत सागितले आहेच अरब लोक हे अत्यत कडवे असल्यामुळे देशी लष्करातून त्याचा मुद्दाम भरणा करीत फार काय मराठे सरदार स्वत च्या शरीरसरक्षकाचे जी बॉडीगार्डसची खास तुकडी नेमीत ती अरबाचीच असे।। अरबस्थान—खरें अरबस्थान नव्हे तर अरब लोकाची जमात रहात असे ती जागा. बरें—उत्तम, उची. कट—A ring around a matchlock securing the barrel in its socket जामगी—The Match of a gun बदुकीचा तोडा, वात किंवा काकडा क्रिया—शपथ सर्वांनी अन्नावर हात ठेऊन शपथ घेतली. कुणी करशील होगड्या फादफितूर—कुणी करशील हो गड्यांनो फदफितूर. अरे आतां कुणी फदफितूर कराल तर बघा कारण तुम्ही बेलभडार उचलून शपथ घेतली आहे शपथ घेण्याचें वेळी बेल व हळद (भडार) उचलून हातात धरण्याची पद्धत असे मी गुळाचा गणेश इत्यादि—मी नावाचा गुळाचा गणपती असें समजा क्रिया कर्तृत्व सारें तुमचें सारा काराभार निपाणीमध्यें तुमच्या जिवावर चालला, तर आतां यावेळीं मदत करुन त आपलें माहात्म्य सिद्ध करा

बाईसाहेबाला पाचली खबर ॥ ह्या कुणबीणीन सांगितला मजकूर ॥ हे खाशाचे कोणी आल्यात मैतर ॥ हे सारे आहेत अरब एकशिणेचे सार ॥ त्या लोकांशीं बलावा हितवर ॥ तवा आरब चालून गेले सार ॥ तुम्ही परदेशाला सर्व लोक जाणार ॥ त्या मुलखाची काय आणता पर ॥ कोण म्हणतो साडी चोळी आणू तयार ॥ कोण म्हणतो सोन रुपं मोहरा सार ॥ आग लावा सोन रुप जळो त सार ॥ मज कुकू सभाळून आणा माघार ॥ बारा हजार आरब होऊन जाऊ ठार ॥ तेव्हा बाइ तुमच्या खाशाला देव ईश्वर ॥ धीन धीन बोलले हरहर ॥ ह्या लखनापुरावर ठोकले डेरे ॥ ह्या आखली माजरीचा धरला सुमार ॥ गेले कृष्णा वलङ्गन पलीकडे पार ॥ गेले वस्ती करीत चालले ह्योर ह्योर ॥ तीन कोसावरत उरल अनतपूर ॥ तेव्हा आपासाहेबाने काय केला विचार ॥ क्स निजल्यावर चालून जावे वर ॥ हे अनतपुरचे लोक करितो हुशार ॥ हे अरबदादा तुह्मी ऐकाव सार ॥ मी देसायाचा वीर आला तुह्मावर ॥ तुम्ही अनतपूरचे लोक राहाव तयार ॥ जर लडायाची मर्जी असेल तर ॥ तुम्हा वाघून क्वर राहाव हुशार ॥ जर लडायाची मर्जी नसेल तर ॥ सल्याने सोडून किल्ला निघा बाहेर ॥ मी देसायाचा वीर आला तुम्हावर ॥ जर नसेल दारू गोळी म्हणाल तर ॥ मला लिहून पाठवा देइन धाडून बरोबर ॥ केला हुकूम जासुदाला पत्र लीकर ॥ गेले जासुद धावून पह्या कचेरी ह्योर ॥ तिथ रावसाहेब नाना दोघे बधु बरोबर ॥ तिथ भरली होती क्चेरी लहानथोर ॥ त्यांनी पाहिला लखोटा वाचून सार ॥ खदखदा हासू लागले लहान थोर ॥ हा कुठला निपाणकर वालचा पोर ॥ ओंठ पिळले तर निघेल दुधाचा धार ॥ तुझ्या बापाला जाऊन विचार जा खबर ॥ तुमे आजे पणजे पडल्यात माळावर ॥ छे उगाच जा गरिबा फिरून माघार ॥

---

पर—विशेष वस्तू त्या मुलुखात होणारी विशेष नामांकित वस्तू क्सें निजल्यावर चालून जावें—शूर पुरुष शत्रुस सावध करून त्यावर हल्ला चढवितात खरा शिकारीहि वाघाला सावध करून मग त्याला गोळी घालता रावसाहेब आणि नाना—(1) पडल्यात माळावर—तुझे आजे पणजे अनतपूरन्यां माळावर पूर्वीच लढा

नाहीं तर हाडे पडतील देशावर ॥ ह्या प्रमाणे त्याने खाली लिहिला उत्तर ॥ दिली थोबाडीत जासुदाला रडत माघार ॥ धनी आपासाब सरदार नामी सरदार ॥ रडत जासूद सांगू लागला खबर ॥ जसा भुजंग फुगला नाग जसा फरार ॥ तडाडाडां उडाले बद आंगराखे सार ॥ तुम्ही आरब दादा पाहा कसा मजकूर ॥ ह्या लुच्चांनी कसा लिवला उत्तर ॥ मी आपा साहेब सरदार रणांत रणशूर ॥ तीन घटकेमाधिं घेईन आनतपूर ॥ १४

धीन धीन बोलले बोलले हरहर ॥ त्याची जनमल्याली वेळ नक्षत्र ॥ हें कुठले भुगे दगड गप झाली सार ॥ गरांरारां वेढा दिला भोवत्या भावर ॥ हे आनतपूरचे लोक होते हुशार ॥ झिरझिऱ्या मारिती गोळ्या अतनापार ॥ अरबानीं झाडिली फैर गोळी दरार ॥ जशी खापरामाधिं लाही त्याला उशीर ॥ आरबांनी सोडिल्या तन्हा की बाणचक्र ॥ कैकांची उडाली शिरें वरच्यावर ॥ झाली बाणाची गर्दी उडाली चक्र ॥ घेतले भाजभाजुनी केले घावेरे ॥ कडदोऱ्याचे एक सोडींना पोर ॥ चरचरा कापीले गळे नि भरले हार ॥ हा करवीरच्या वाटेनें निघाले तयार ॥ जर वेशीला शीर बांधा शभरशभर ॥ तीन घटकेमधिं सर केले अनतपूर ॥ ही गणता नाही मुरद्याला गलीम सार ॥ त्यावरने हिंडती कावळे घार ॥ सडधाण झाले मुड्याची रक्ताचा पूर ॥ जसे वगळी वाहून जात असे दरार ॥ हा भगवा झेंडा चढला बुरुजावर ॥

---

ईत मुडदे होऊन पडले त्याची आठवण कर. झिराझिऱ्या—सूसः झिर-झिर-पावसाच्या झडी सारख्या. जशी खापरामधिं लही त्याला उशीर—लाह्या करताना खापरांत लाह्या त्याही कमी वेगांन तडातड उडत असतील इतक्या जोराने अरबाच्या गोळ्या उड्डू लागल्या. तन्हा की बाण चक्र—(?) चक्राकार फिरणारे तऱ्हेदार म्हणजे विशेष बनावटीचे आगीचे बाण. कडदोऱ्याचे एक सोडींना पोर—लंगोटी न नेसणारी, नुसताच कडदोरा घालणारी लहान पोरेसुद्धा मारून टाकली. हार—हारे. मोठ्या टोपल्या. जरवेशीला—दरवेशीला असे पाहिजे. वगळी—वघळी—ओघळी. दरार—पन्हार असे पाहिजे. पन्हा—ओढा. पाणलोंढा. ज्याप्रमाणे एखादा ओढा वेगाने वाहु लागावा त्याप्रमाणे भगवा झेंड्याचा फरारा

हे द्रव्य भरले बारा गाडे अतनापार ॥ हे भगवे निशाण लावले गाड्यावर ॥ धनी बसला घोड्यावर स्वार ॥ दोन्ही बाजूने अवदागिन्या देव अवतार ॥ जन लोक म्हणती कुठला परमेश्वर ॥ म्हणूनच घेतलें याने अनतपूर ॥ द्रव्याचा कीं ढीग घातला राजा झोर ॥ तुम्ही वळसा आपल अनतपूर ॥ तुम्ही वाचून पाहा खोट की खरे ॥ कुठे हाय माझी सुदरा आणा बाहीर ॥ मी जायाचा लेकर नका उशार ॥ मुलगीला शिकवितात तऱ्हा सोदे सार ॥ तुम्ही राजवंशाला जन्मून व्यर्थ सार ॥ तुज नशीम जी नशीब फुटल सार ॥ उद्या तुम्हाला कोण येवुन करतील मुजर ॥ तीन रुपडीचा चाकर तुमचे भरतार ॥ बरोबरीचे राजे प्रजे सोडून सार ॥ तुम्ही देसायाची होऊनी गेला नार ॥ मुलगीन शब्द ऐकता वडविती ऊर ॥ मी जन्मून आलें त्याच वेळेवर ॥ माझ्या बाइने नाही घातली वार ॥ बाई सुरतीन सागू कुठवर ॥ त्याच नाक नकटे दिसतय काळे भोर ॥ बाई प्रत्यक्ष कोरवी जसा वङ्कर ॥ माझ्या बापाला जाऊन सागा खबर ॥ जड झाल्या कन्या तुम्हाला सागतों थोर ॥ मला घोगड्यात घालून मोट बाधा करकर ॥ माझ्या वजनाला धोंडे घाला दोन चार ॥ ही पचगगा भरून जाती भरपूर ॥ त्यामधि टाकन या माघार ॥ तेव्हा मह राजाला जाऊन पोचली खबर ॥ याया निपाणकर तुम्ही बाहादर ॥ मुलगीने

---

बुरुजावर उडू लागला हुबेहूब वर्णनाच्या दृष्टीने हे दोन्ही चरण फारच सुदर आहेत "जसे वघळी वाहून जात असे पहा र। हा भगवा झडा चढला बुरुजावर॥" कुठला परमेश्वर—दुसरा परमेश्वर कोणचा? ह्याच परमेश्वर म्हणून हा अनतपूर जिंकू शकला राजा झोर— कोल्हापूरकर छत्रपतीपुढे सुदरा—राजाची मुलगी, छत्रपतीची देऊ केलेली मुलगी सोदें—लबाड, मी जन्मून आलें— त्याच वेळेवर माझ्या बाईने नाही घातली वार—मी जन्मल्या बरोबर आईने किंवा सुईणीने मला वारेबरोबरच पुरून टाकून तेव्हाच जगातून नाहिसे का केलें नाही? सुरत—रुप, स्वरुप. त्याचे नाक नकटें दिसतेंच काळेभोर—नाक नाहीच, इतके नकटे कीं फक्त त्याची दोन काळीं काळीं भोके तेवढी दिसतात.

हे द्रव्य भरले बारा गाडे अतनापार ॥ ह्य भगवें निशाण लावलें गाड्यावर ॥ धनी बसला घोड्यावर स्वार ॥ दोन्ही बाजूनें अबदागिऱ्या देव अवतार ॥ जन लोक म्हणती कुठला परमेश्वर ॥ म्हणूनच घेतलें यानं अनतपूर ॥ द्रव्याचा कीं ढीग घातला राजा झोर ॥ तुम्ही वळखा आपल अनतपूर ॥ तुम्ही वाचून पाहा खोटे कीं खरे ॥ कुठे हाय माझी सुदरा आणा बाहीर ॥ मी जायाचा लौकर नका उशीर ॥ मुलगीला शिकवितात तऱ्हा सोदे सार ॥ तुम्ही राजवशाला जन्मून व्यर्थ सार ॥ तुज नशीब जी नशीर फुटल सार ॥ उद्या तुह्माला कोण येवुन करतील मुजर ॥ तीन रुपडीचा चाकर तुमचे भरतार ॥ बरोबरीचे राजे प्रजे सोडून सार ॥ तुह्मी देसायाची होऊनी गेला नार ॥ मुलगीन शब्द ऐकता वडविती ऊर ॥ मी जन्मून आले त्याच वेळेवर ॥ माझ्या बाईने नाही घातली वार ॥ बाइ सुरतीन सागू कुठवर ॥ त्याच नाक नकटे दिसतय काळे भोर ॥ बाई प्रत्यक्ष कोरवा जसा वद्दर ॥ माझ्या बापाश जाऊन सांगा खबर ॥ जड झाल्या कन्या तुम्हाला सागतों झोर ॥ मला घोगड्यात घालून मोट बाधा करकर ॥ माझ्या वजनाला धोडे घाला दोन चार ॥ ही पचगगा भरून जाती भरपूर ॥ त्यामधि टाकून या माघार ॥ तेव्हा महाराजाला जाऊन पाचली खबर ॥ याया निपाणकर तुम्ही बाहादर ॥ मुलगीने

---

बुरुजावर उडू लागला हुबेहूब वर्णनाच्या दृष्टीन हे दोन्ही चरण फारच सुदर आहेत "जस वघळी वाहून जात असे पहा र। हा भगवा झडा चढला बुरुजावर॥" कुठला परमेश्वर—दुसरा परमेश्वर कोणचा? ह्याच परमेश्वर म्हणून हा अनतपूर जिंकू शकला राजा झोर—कोल्हापूरकर छत्रपतींपुढे सुदरा—राजाची मुलगी, छत्रपतीची देऊ केलेली मुलगी सोदे—लबाड, मी जन्मून आले—त्याच वेळेवर माझ्या बाईने नाही घातली वार—मी जन्मल्या बरोबर आईने किंवा सुईणीने मला वारेबरोबरच पुरून टाकून तेव्हाच जगातून नाहसि का केलें नाही? सुरत—रूप, स्वरूप. त्याचे नाक नकटें दिसतेंच काळेंभोर—नाक नाहींच, इतके नकटे कीं फक्त त्याची दोन काळीं काळीं भोके तेवढीं दिसतात.

घेतला हट्ट अनिवार ॥ ह्या मुलगींचे टाकून द्यावे पतर ॥ ह्या निपाणी-सारखे देतो दोनचार शाहार ॥ जर मनात असेल तर माग माझे करवीर ॥ मी खचीत देतो ना बघत मागे ह्योर ॥ असा शब्द ऐकला निपाणकर बाहेर ॥ आला क्रोध मनामधि लाल डोळे तबर ॥ तू राजा आहेस कीं बेल कळेना बर ॥ खालीं ठेविता कागद मूत ह्यावर ॥ तू मुतशील राजा ह्यांत काही नाही घोर ॥ जर मुतलासि तर नाही सोडीत माझी नार ॥ आज आठव्या दिवशीं खचीत मी नेणार ॥ आता सभाळ राजा आईक खबरदार ॥ नाही मुजरा म्हाराजाला केला माघार ॥ फरारारा घोडा उडविला कुमाईत वोर ॥ गेला आपल्या निपाणीला उलट माघार ॥ १५

मग बसला सदरेवर जाऊन खिणभर ॥ खुशाल झाले सोष्ट सारे घरदार ॥ हे म्हारपोरे येवून करती मुजर ॥ रघुनाथ म्हणतो आला माझा पुतुर ॥ त्याचे वडील गेले होते आदले सार ॥ प्रत्यक्ष माझ्या वशाला रामचद्र ॥ वेणूबाइ माता बाळ पोटाशी धर ॥ रणशूर माझा पुतूर केली तल्वार ॥ अलाबला घेता जाऊन पोटशीं पुत्र ॥ मग बसला बाजूवर जरा खिणभर ॥ हाक मारा बैराळाला बलाव लौकर ॥ बाईस भरला चुडा दिसे गुलजार ॥ पायपजाणे फोलारे वाजती सार ॥ जवहार पुतळयाचा माळ गळाभर ॥ लसण्या ठुशा कठा गळीं भरपूर ॥ कानी कुडल की भोकर की नक्षी-

---

पतर—पत्रिका, ह्या मुलीची लग्नपत्रिका त्याज्य ठरवा म्हणजे या मुलीचा नाद सोडा तू राजा आहेस कीं बैल इत्यादि—अरे तू राजा आहेस कीं बैल आहेस, दिलेला शब्द मोडतोस? बैल असलास तर तूच लिहून दिलेल्या करारावर मुतायला कमी करणार नाहीस पण तसा मुतलास म्हणजे करार मोडलास, तरी सुद्धां तुझी मुलगी मी नेल्याशिवाय सोडणार नाही सोष्ट—(!) स्वस्थ तर नव्हे? आदले सार—(?) अलाबला घेणें—दु ख किंवा इडापिडा टाळावी म्हणून दृष्ट काढतात ती बैराळाला—कासाराला. आपल्या बायकोस चुडा भरण्याकरिता, १,रण अनतपुर जिंकून येईपर्यंत तिने वैधव्याची दीक्षा घेतली होती पायपजानें—पाय पैंजण फोलार—मूळ शब्द-( पु ) स्त्रियाच्या पायाच्या बोटांतील एक दागिना ( सरस्वती कोश )

दार ॥ कानांत घातले कापवरते मोर ॥ दोन द्राक्षाचे वेल बुगडीवर ॥ सात सर्जाची नथ ठपकेदार ॥ भांग भरला मोत्याने दिसे गुलजार ॥ केवडाराकडी की माथ्यावर ॥ सूर्याची शोभती कोर चंद्रकोर ॥ नागबंद छंद पाठीवर ॥ तीन दिवस कमी होते महिन्यामध्यें सार ॥ तदपर्यंत बाई एकच पाया वर ॥ शीर आंसडली पायाची वरच्यावर ॥ कुळंबिणीनें चोळता बेजार ॥ पच अमृताचे ताट वाढलें झोर ॥ उभयतांनी घातला हात म्हणून हरहर ॥ मग बसले सदरेवर आपा सरदार ॥ वडलाला सांगतो गोष्टी नानापर ॥ ह्या निपाणीमधि तुह्मीं करा संसार ॥ मी स्वचीत उद्या जायचा निघून करवीर ॥ रघुनाथ म्हणतो मुला जरा दम धर ॥ मी वडीलपणानें लिहितो राजाला पतर ॥ तुम्ही राजे महाराज थोर देव अवतार ॥ आम्ही पायाचे चाकर तुमचीं लेकर ॥ ही आनंतपूरची जाहीर दुनयावर ॥ त्या विघ्नामधिं माझे घातलें पोर ॥ जर मरून तिकडे होऊन जाईल ठार ॥ ह्या डोळ्यानें मीं कस बघावें माघार ॥ जर जाईल त्याची अबरू गाडाभर ॥ जर जाईल आपली अब्रू नाही मिळणार ॥ हे थुकल्यालें तांबूल घेतां वर ॥ ही अकल नव्हे राजाची गोष्ट बरोबर ॥ जर लढायाचीच मर्जी असेल तर ॥ यापरमान मजला खाली ल्याहावें उत्तर ॥ जर संतोषानें असेल वायाची नार ॥ ह्यापरमान मला कळवावा मजकूर ॥ झाला

---

भोकर—स्त्रियांचा एक दागिना (सर. को०) सरजा—(फा. सराचाह) पु. बायकांच्या नथेला मुख्य मोत्यांच्या व गाठ्याला जी लांबोडी मोतीं लावलेलीं असतात तीं समुचयानें. अशीं मोतीं असलेली नथ ती सरजेदार (सर. कोश). छंद—मनगटात किंवा पायांत घालतात ते सोन्याचे किंवा चांदीचे कांहीं नक्षीचें वलग (सर. को.). एकच पायावर—निपाणकराची बायको तो परत येईपर्यंत तुळशीपुढे एका पायावर उभे राहून तप करीत होती. ही आनंतपूरची जाहीर दुनयावर इ.—अनतपूरची भुताटकी दुनियाभर प्रसिद्ध असतां तेथे माझ्या मुलाला तुम्ही मनांत कपट धरून पाठविले. हेतु हा की, जर तो तिकडे परस्पर ठार झाला, तर त्याची गाडाभर अब्रू (मोठी कीर्ति) आपोआपच नष्ट होईल. उलट तो अनंतपूर जिंकून परत आला तर मात्र माझी राजाची अब्रू जाईल. थुकल्यालें तांबूल वर घेणें—दिलेले वचन परत घेणे.

हुकुम जासूदाला पळ लौकर ॥ नेऊन लखोटा द्यावा राजा थोर ॥ गेला जासूद करवीराला पोचे लौकर ॥ तिथे भरली होती कचेरी हसे सार ॥ त्यांनी पाहिला लखोटा हंसते सार ॥ काय बिसाद देसायाची मारु सेटर ॥ येतो लढाय ह्मणून स्पष्ट त्याह्यवे उत्तर ॥ हुचोबे ऐकून राजेसर ॥ ह्यापरमान त्याने खाली लिवला उत्तर ॥ नेम कागलावर थळ नेमिला थोर ॥ झाला हुकूम महाराजाचा झडती नगार ॥ मुहूर्तान ठोकिले डेरे उजळाईवर ॥ आली स्वारी महाराजाची हलसवड्यावर ॥ आला निपाणकर रणशूर कोगनोळीवर ॥ आली महाराजाची स्वारी कागलावर ॥ दुधगंगा उतरून आले आपा सरदार ॥ महाराज उभे राहिले डेऱ्या थोर ॥ आले उजव्या बाजूवर निपाणकर ॥ गांवो गांवचे पाटील कुलकर्णी सागती सार ॥ तुम्ही राजा सगे नका बांधू कबर ॥ तुम्ही सोंदे लुचे काय सांगता सार ॥ बघू बिशाद या राजाचा दम कुठवर ॥ केली ताकीद त्या आर्बाला खबरदार ॥ आधी गोळा मारु नका गादीवर ॥ आधी महाराजाचे फार सुटू द्यात वार ॥ किती लोक माझे पडले पाहू बर ॥ ज्या वेळेला तुम्हांवर फिरवीन नदर ॥ त्या वेळेला तुम्ही होऊन यावे तयार ॥ ही आधीच कोलापुरे ढवाखोर ॥ झिराझिऱ्या मारिती गोळ्या अंतनापार ॥ झाला हुकूम तोफखान्याला उडे दरार ॥ तेव्हां निपाणकराचे लोक पडले चार ॥ तवां निपाणकाराने जरा फिरविली नदर ॥ आरबांनी झाडिली फैर गोळी दरार ॥ तवां महाराजाचे लोक पडले शंभर ॥ तवा म्हणतो निपाणकर आपा सरदार ॥ ही गरिब मारून काय मला मिळणार ॥ फरारारा घोडा उडविला कुमाईत वोर ॥ ती तोफ आनदी टाप दिली त्यावर ॥ दरारारा तोफ त्यांनी

---

हसते सार—सारी कचेरी हसू लागली. राजेसर—राजेश्री, छत्रपति. नेम—नेमिला. ही आधीच कोलापुरे ढवाखोर—ढव, गर्व, दिमाख, ढवाखोर—गर्विष्ठ. निपाणकराने आरबांना असा हुकूम दिला कीं, आधी कोल्हापुरी सैन्यांतून गोळी वाजू दे. त्यांचे काय दिवे लागतात ते पाहू, मग आपण हल्ला करू. त्याप्रमाणे झाले. प्रथम कोल्हापुरकरांनी गोळ्याचा मार धरला त्यानें निपाणकराचे अवघे चार लोक मेले. नंतर निपाणकरांच्या आरबांनी उलट फैर झाडली, तेव्हा शत्रूचे शंभर मुडदे झाले. आनंदी—तोफेचे नाव.

वोढिली होती बाहीर ॥ तवा करवीरच्या लोकाचा फुग्ला बाजार ॥ एकएकानें तार्डात गवत धरिल मुठमुठभर ॥ आम्ही गाईचीं वासर तुमचा लक्र ॥ जिती वोटचापावतर पळता जीव बेजार ॥ गपागप वसविले भाले पाठि पेंढार ॥ शाहारात शिरले पेंडार गर्दी झाली फार ॥ कुणी वाणा वामणी म्हणेनात चटसार ॥ शहरात लाविल्या आगी जळती घर ॥ १६

पायउतार झाला राजा पळतो चोर ॥ त्याने यळगुडाचा धरला सुमार ॥ गेला उसाच्या फडात घुसला झोर ॥ उसाची झाली कुसकाटे आगभर ॥ तिथ गोविंद पाटील भला होता बाहादर ॥ आला देवाची पाग्रा घेऊन बाहीर ॥ पालखींत राजा घाटून परमेसुर ॥ रातोरात त्यान पोंचविला करवीर ॥ राण्या बाया घेऊन पाणी झारीभर ॥ मुखास लाविली झारी नेहून म्होर ॥ त्या पाण्यात म्हणतो आलाला निपाणकर ॥ थडताप आली राजाला आगी फेपर ॥ राण्याबाया हात जोडून आल्या म्होर ॥ जर नात्यानें माझा बधू होशील तर ॥ चुडादान राजा द्यावा भोळा शकर ॥ तुम्ही नात्याने माझ्या बहिणी होशील तर ॥ कुठे आहे माझी मुदरा वोढा बाहिर ॥ दरारारा मुलगी ओढून बाहार उभा कर ॥ गरारारा त्याने आरब बसविले सार ॥ नाही वोवले माडव जमिनीवर ॥ त्यानें उगाच रेघा ओढिल्या भिंतीवर ॥ नाही भट विरामण कुणी बलाविजा झोर ॥ भटास विचारता मोतुर लग्नाड सार ॥ ती आपली राड का करतो वोवल्यावर ॥ सारे लोक उभे केले भोवता भोर ॥ दिले एकेकाला तादुळ मुठमुठ भर ॥ सोभेदान कुणाला येइना अक्षर ॥ कोणी म्हणतात दीन दान हरहर सार ॥ दिले तादुळ टाकून वर कीं झाले नवर ॥ मी जन्मून आलों त्याच वेळेवर ॥ आहे ब्रह्माचा म्होतूर माझे बरोबर ॥ नाहीं गेला मारुतीला वरात बाहीर ॥

---

वाणी वामणी म्हणेनात—कोणी वाणा बामन म्हणेनात असे मुळात असले पाहिजे म्हणजे पेंढारी गावात शिरले त्यांनी लढाऊ बिनलढाऊ न पाहतां सर्वांचा कत्तल केली चोर—चारासारखा लपून-छपून त्या पाण्यात म्हणतो इ —राजाला प्यायच्या पाण्यातहि निपाणकर दिसू लागला इतकी धास्ती बसली आल्या झोर—राण्या राजाला जीवदान द्यावं म्हणून निपाणकराकडे आल्या मोतुर—मुहूर्त

नाहीं सोडलें कांकण उचलली नार ॥ नार घेऊन घोड्यावर रडविला वीर ॥ निपाणीला परत गेला माघार ॥ हुता परभारी किल्ला त्यांत ठेविली सुंदर ॥ दिला कुणबिणीचा पाहारा भोरत्याभोर ॥ काय दिवस राज्य केलें तिच्या बरोबर ॥ एक दिस तिला फावला वाव जरा तिळभर ॥ तिनं घेतली हिरकणी हरपली नार ॥ खदखदा हासतो बसून निपाणकर ॥ माझी होती तेवढी ईर केली म्यां खर ॥ जर मरून गेली माझी झाटमार ॥ पतिव्रता माझी सुंदरा आहे सुकुमार ॥ पुढें झाले म्हातारपण होर होर ॥ थंडताप आली खाशाला काटा आंगावर ॥ त्यानें बोलाविले मानकरी शिपाई सार ॥ माझ्या पोटीं नाही बाबा कुणी वेलविस्तार ॥ तुम्हा पालनवाला कुणी नाही माघार ॥ तुम्ही जावा देशावर कीं मुलुखावर ॥ खरे महाराजाचे होऊं नका चाकर ॥ शालेचापी माझा वीर बलावा लौकर ॥ त्याला सांगण्याचा हाय माझा मजकूर ॥ माझे सारखा सरदार नाही होणार ॥ या शिपायाची नाहीं राह्याची ईर ॥ आतां झाली इंग्रजी कीं अंमलदार ॥ पुढें होतील मामलतदार फौजदार ॥ त्या शिपायाच्या सांधावर देतील पोर ॥ पुढें कारकून अवघे होतील सार ॥ या शिपायाला म्हणतील धू धोतर ॥ पुढें जातील गांवाला घोडे धर ॥ त्या शिपायाची नाही राह्याची ईर ॥ हगल्याला अस्तोरी हसेल म्होर ॥ १७

शालेचापी येवून उभा राहिला म्होर ॥ त्याला सांगतो मजकूर मनां-तले सार ॥ जीव जाईना तो म्होरे येतो माघार ॥ माझी आस्ता राहिली येवढी पुरीव माघार ॥ या दुनयांमाधिं हिंडलों जसा जोरमार ॥ कुणी गांडू भडवा

---

सोभेदान—शुभमंगल सावधानचा अपभ्रंश. परभारी—निपाणकरानें दुसरा किल्ला बांधला होता त्यात. शालेचापी—(!). पुढें होतील मामलतदार फौजदार—यापुढें इंग्रजी अमलांत शिपाईगिरीचा नष्टांश होईल. मामलेदार हा मुलकी अधिकारी पण तोच फौजदाराचे अधिकार गाजवू लागेल. शिपायांना सांधावर बटुकांऐवजीं वरिष्ठांचीं पोरें घ्यावीं लागतील. शिपायांना धोतर बडवावीं लागतील आणि वरिष्ठांचीं घोडीं हातांत धरून नेण्याचें मोतद्दाराचें काम त्यांना करावें लागेल. शिपाईपेशाची पुढील काळांत कांहीं ईर म्हणजे अब्रू राहणार नाही. शिपायाला घरच्या बायकाही हसतील. हगल्याला—हग त्याला जोरमार—मूळ शब्द जोरा माप असा आहे. त्याचा अर्थ तोलावयानें

आला नाही माह्यावर ॥ हा किल्ला बांधन व्यरथ झाल सार ॥ किल्ल्याच झालें नाही लगीन लागला घोर ॥ ही शेवटी आस्ता पुरीव माझे माघार ॥ जर मिठाचा चाकर होइन तर ॥ पाच गोळे सरा मारीन किल्ल्यावर ॥ तुम्ही सोडा महाराज प्राण नका करू घोर ॥ पाच गाळे तरी मारीन किल्ल्यावर ॥ किल्ल्याच कराशिल लगीन यरन बघान तवा जाईल मनचा घोर ॥ धडधडा डला नरव्यांत गेला ईश्वर ॥ या निपाणीमधि गडद पडला अधार ॥ मले दिवसमास होयाचे होणार ॥ गेली इंग्रजाला खबर जलदी फार ॥ चार कुंपीन नेमून आले निपाणिवर ॥ आरवानीं केली तयारी बांधून कबर ॥ चपरणी तोफा चोढिल्या बुरुजावर ॥ तीन दिवस गोळा उडाला भाडिमार ॥ एक किंवडा साहेब ठार निपाणीवर ॥ मग सोडून दिला किल्ला निघाले बाहीर ॥ त्याच्या कळवातीणीचा पोर होता रणशूर ॥ जरिपटका घेउन उडाला वरच्यावर ॥ सातरेवण्या खदक उडून झाला पार ॥ कुण्या देशासि गेला नाही आल आजवर ॥ तो इग्रजाला जरब आहे तो फार ॥ आझून निपाणी शाबूत हाय ते शाहार ॥ जवा गावेल जरीचा पटका तवा गेली म्हणतील अवघी सार ॥

---

एक वजन म्हणून जोखमार याचा अर्थ अग्रूनें वजनदारीने असा घ्यावा ( २ ) ज्याच्या तुलनेने पदार्थविशेषाचे वजन तराजूच्या साधनान ठरविण्यात येत तो धाडा ( सर कोश ) किल्ल्याचें नाहीं लागलें लगीन— किल्ला लढला नाहीं तोपर्यंत त्याचें लग्न लागलें असा समजत नसत वेढा देणाऱ्या सैन्यानें त्यावर गोळे टाकले व आतून बाहेरच्या सैन्यावर गोळे पडले म्हणजे ख-या अक्षता पडल्या, व किल्ल्याचे विधिपूवक लग्न लागलें ही कल्पना निपाणकरान जो नवा मोठा किल्ला बाधावयास सुरवात केली होती त्यासबधी हें वर्णन आहे माझे माघार—माझ्यामागून, मी मे यावर घोर—चिंता यरने—आकाशातून, स्वर्गातून धड घडला नरड्यात गेला ईश्वर—घोर लागून मेला निपाणकराच्या एकदर अचाट चारित्राला "धडधडला नरव्यांत" हे वर्णन पूर्ण अनुरूपच आहे ! चपरणी—(?) किंवडा—(?) जवा गावेल जरीपटका तवा गेली म्हणतील अवघे सार—निपाणकराचा लेकवळा जरीपटक्याचे निशाण घेऊन नाहीसा झाला तो लेकवळा व त निशाण अद्याप इग्रजाना हस्तगत याले

नाहीं सोडलें कांकण उचलली नार ॥ नार घेऊन घोड्यावर अंडीवला बोर ॥ निपाणीला परत गेला माघार ॥ हुता परभारी किल्ला त्यांत ठेविली सुंदर ॥ दिला कुणबिणीचा पाहारा भोरताभोर ॥ काय दिवस राज्य केले तिच्या बरोबर ॥ एक दिस तिला फावला वाव जरा तिळभर ॥ तिंनें घेतली हिरकणी हरपली नार ॥ खदखदां हासतो बसून निपाणकर ॥ माझी होती तेवढी ईर केली म्यां खर ॥ जर मरून गेली माझी झाटमार ॥ पतिव्रता माझी सुंदरा आहे सुकुमार ॥ पुढे झाले म्हातारपण झोर झोर ॥ थडताप आली खाशाला काटा आंगावर ॥ त्यानें बोलाविले मानकरी शिपाई सार ॥ माझ्या पोटीं नाही बाबा कुणी वेलविस्तार ॥ तुम्हा पालनवाला कुणी नाहीं माघार ॥ तुम्ही जावा देशावर कीं मुलुखावर ॥ खरे महाराजाचे होऊं नका चाकर ॥ शालेचापी माझा वीर बलावा लौकर ॥ त्याला सांगण्याचा हाय माझा मजकूर ॥ माझे सारखा सरदार नाही होणार ॥ या शिपायाची नाहीं राह्याची ईर ॥ आतां झाली इंग्रजी कीं अंमलदार ॥ पुढे होतील मामलतदार फौजदार ॥ त्या शिपायाच्या खांद्यावर देतील पोर ॥ पुढे कारकून अवघे होतील सार ॥ या शिपायाला म्हणतील धू धोतर ॥ पुढे जातील गांवाला घोडे धर ॥ त्या शिपायाची नाही राह्याची ईर ॥ हगल्याला अस्तोरी हसेल म्हार ॥ १७

शालेचापी येवून उभा राहिला म्होर ॥ त्याला सांगतो मजकूर मनांतले सार ॥ जीव जाईना तो म्होरे येतो माघार ॥ माझी आस्ता राहिली येवढी पुरीव माघार ॥ या दुनयांमाधिं हिंडलो जसा जोखमार ॥ कुणी गांडू भडवा

---

सोमेदान—शुभमगल सावधानचा अपभ्रंश. परभारी—निपाणकरानें दुसरा किल्ला बांधला होता त्यात. शालेचापी—( ? ). पुढें होतील मामलतदार फौजदार—यापुढे इंग्रजी अमलांत शिपाईगिरीचा नष्टांश होईल. मामलेदार हा मुलकी अधिकारी पण तोच फौजदाराचे अधिकार गाजवू लागेल. शिपायांना खांद्यावर बदुकांऐवजीं वरिष्ठांचीं पोरें घ्यावीं लागतील. शिपायांना धोतरं वडवावीं लागतील आणि वरिष्ठांचीं घोडीं हातांत धरून नेण्याचें मोतद्दाराचें काम त्यांना करावें लागेल. शिपाईपेशाची पुढील काळांत कांहीं ईर म्हणजे अन्न राहणार नाहीं. शिपायाला घरच्या बायकाही हसतील. हगल्याला—हंग त्याला जोखमार—मूळ शब्द जोख माप असा आहे. त्याचा अर्थ तोलावयाचे

आला नाही माझ्यावर ॥ हा किल्ला बांधून व्यरथ झाले सार ॥ किल्ल्याचे झालें नाही लगीन लागला घोर ॥ ही शेवटी आस्ता पुरीव माझे माघार ॥ जर मिठाचा चाकर होईन तर ॥ पाच गोळे तरी मारीन किल्ल्यावर ॥ तुम्ही सोडा महाराज प्राण नका करू घोर ॥ पाच गोळे तरी मारीन किल्ल्यावर ॥ किल्ल्याचें कराशिल लगीन वरन वघान तवा जाईल मनचा घोर ॥ घडघडला नरव्यांत गेला ईश्वर ॥ या निपाणीमधि गडद पडला अधार ॥ भले दिवसमास होयाचे होणार ॥ गेली इंग्रजाला खबर जलदी फार ॥ चार कुपीन नेमून आले निपाणीवर ॥ आरवानीं केली तयारी बांधून कबर ॥ चपरणी तोफा चोढिल्या बुरुजावर ॥ तीन दिवस गोळा उडाला भाडिमार ॥ एक किंवडा साहेब ठार निपाणीवर ॥ मग सोडून दिला किल्ला निघाले बाहीर ॥ त्याच्या कळवातीणीचा पोर होता रणशूर ॥ जरिपटका घेउन उडाला वरच्यावर ॥ सातरेवण्या खदक उडून झाला पार ॥ कुण्या देशासि गेला नाही आल आजवर ॥ तो इंग्रजाला जरब आहे तो फार ॥ आपून निपाणी शाबूत हाय ते शाहार ॥ जवा गावेल जरीचा पटका तवा गेली म्हणतील अवधी सार ॥

---

एक वजन म्हणून जोसमार याचा अर्थ अशून वजनदारीने असा घ्यावा (२) ज्याच्या तुलनेने पदार्थविशेषाचे वजन तराजूच्या साधनान ठरविण्यांत येतें तो धोंडा (सर कोश) *किल्ल्याचें नाही लागलें लगीन*— किल्ला लढला नाही तापर्यंत त्याचे लग्न लागलें असा समजत नसत वेढा देणाऱ्या सैन्याने त्यावर गोळे टाकले व आतून बाहेरच्या सैन्यावर गोळे पडले म्हणजे खऱ्या अक्षता पडल्या, व किल्ल्याच विधिपूर्वक लग्न लागले ही कल्पना निपाणकरान जो नवा मोठा किल्ला बांधावयास सुरुवात केली होती त्यासबधी हें वर्णन आहे *माझे माघार*—माझ्यामागून, मी मेल्यावर *घोर*—चिंता *वरने*—आकाशातून, स्वर्गातून धडधडला नरव्यात गेला ईश्वर—घोर लागून मेला निपाणकराच्या एकदर अचाट चरित्राला "धडधडला नरव्यात" हे वर्णन पूर्ण अनुरूपच आहे।। चपरणी—(?) किंवडा—(?) *जवा गावेल जरीपटका तवा गेली म्हणतील अवघे सार*—निपाणकराचा लेकवळा जरीपटक्याचें निशाण घेऊन नाहीसा झाला तो लेकवळा व तें निशाण अद्याप इंग्रजाना हस्तगत झाले

आरवानी निघाले बाहिर आले सार ॥ नाहीं इमज आडवे झाले त्याला तिळभर ॥ हाय इमानी चाकर जाऊ दे सार ॥ गेले हुपरीवर ते तळ दिला सार ॥ विन धन्याच्या वाचून परदेशी सार ॥ गेली देशावर ते सडून जशीं पाखर ॥ शूर मर्दाचा पवाडा बोल धडधडा ऐक शाहीर ॥ गुरु नाग नरूचें कवन मोत्याची वोवण ऐक शास्तर ॥ भर जरीचें निशाण ऐका करुगी डफावर ॥ बाबाजा गातो पवाडा करूनि निवाडा द्या पानाचा विडा जाऊंद्या पिडा लौकर ॥ तुम्हा दैव बसला काशीकरा चौकाशा जाउंदे झोर ॥ १८

---

नाही आणि त हस्तगत झाल्याखेरीज निपाणीचा किल्ला हरला असे कदापि म्हणता यावयाचे नाही अशी सर्वसामान्य लोकांची अभिमानाची भोळी समजूत ।। विन धन्याच्या वाचून—विन हा शब्द निरर्थक असतो ऐतिहासिक पत्रव्यवहारातून असा वाक्प्रचार सर्वत्र आढळतो उदाहरणार्थ, ' विनापारिपत्य केल्यावाचून मनास करमणार नाही '

# डामाजी नाईकाचा पोवाडा

प्रस्तुत पोवाडा इतिहाससंशोधक श्रीमंत आबासाहेब मुजुमदार याच्याकडून संशोधनार्थ आम्हास एक वाड मिळाला, त्यात सापडला तो बालबोध लिपींत लिहिलेला होता हाच पोवाडा आम्ही पूर्वी आपल्या ऐतिहासिक पोवाड्याचा पहिला भाग प्रसिद्ध केला त्या वेळी दळवी यान्या 'मराठी दुर्गांच्या इतिहासात' वाचला होता किंबहुना त्यातील विषय महत्त्वाचा वाटल्यामुळे त्याचा अभ्यास करण्याचाहि प्रयत्न केला होता पण एक तर पोवाडा त्रुटित व कमालाचा अशुद्ध छापलेला यामुळे शब्दाची कितीहि तोडजोड केली किंवा मूळपाठ ठरविण्याकरिता कितीहि कल्पकता लढविली तरी समाधान होईना गोंधळ्याच्या वाणीने झालेले अपभ्रंश, नक्लाकाराच्या अक्कलहुषारीच्या चुका आणि त्रुटितपणा यामुळे काही इलाज न चालून तो पोवाडा आम्ही तसाच ठेवून दिला त्यानंतर अनेक वर्षांनी प्रस्तुतची ही प्रत उपलब्ध होत आहे ही प्रत त्या मानाने पुष्कळच विस्तृत व बऱ्याच प्रमाणात शुद्ध आहे अपपाठहि अर्थात् आहेतच पण पहिल्यासरख्या इतके विपुल नाहीत उदाहरणार्थ, तिसऱ्या ओळीत 'माडण' शब्दाऐवजी 'माजण' असा शब्द पाहिजे सातव्या ओळीचा अर्थ लागत नाही दुसऱ्या कडव्यातील पाचव्या ओळीत 'थोर थोर माडियावर मोठे गोळ्याचा' असा अशुद्ध पाठ आहे, त्याऐवजी 'थोर थोर भाडी (तोफा) त्यावर मोठ्ये गोळ्याच्या' अशी दुरुस्ती हवी त्याच कडव्यात आठव्या ओळीत 'पाडाव केला सपाट' या ऐवजी 'पाडाव केरी सपाट' (सपाटा—अेक तऱ्हेची लहान होडी) असा पाठ पाहिजे पाचव्या कडव्यात 'मरणा' या शब्दाऐवजी 'सरणा' असा मूळ शब्द असला पाहिजे असें उघड दिसते सहाव्या कडव्याच्या दुसऱ्या चरणात 'बोरज' शब्द आला आहे, तो 'बोरद' असा मुळात असावा मूळ तो देशील इंग्रजी नाविक परिभाषेत सी बोड, स्टार बोड, ली बोड इत्यादि शब्द आहेत, त्यातील बोड या शब्दाचा मराठी अपभ्रंश होय या पोवाड्यात आलेले 'बोरद' 'बोरज' किंवा 'बोडद' हे सर्व शब्द एकच होत सातव्या कडव्यातील चौथ्या ओळीचा अर्थ लागत नाही वाचकांनी पुढे छापलेला पोवाडा व श्री दळव्याच्या पुस्तकातील पोवाडा समोरासमोर माडून पाठभेदाची मौज पाहून घ्यावी.

आमच्या नव्या प्रतींत दोन ठिकाणीं,सन व एके ठिकाणीं महिना,तिथि व वारहि दिला आहे. तसेच 'खमस साल यदाचें फार कठीण' असा कालोल्लेख केलेला आहे, त्यावरून पोवाडा वर्ण्यप्रसंगाशीं सम-कालीन आहे हे उघड दिसते. पोवाड्याच्या शाहिराचें नांव मात्र नक्की सांगतां येत नाही. दळवी प्रतींत 'बापू खदेसी' असें नांव दिलें आहे. प्रस्तुत प्रतींत ते तसें नाहीं. दळवी प्रतींत पाठ असा 'बापू खन्देसी गातो पोवाडा त्याची वस्ती तळे घोसाळा.' प्रस्तुत प्रतींत 'गुरु आत्मगिरी फकीर । डामाजी आमचा मैतर ॥ ख्याल गातो जीर । खान खानदेशाला । हल्ली वस्ती तळा घोसाळा । ठाउक सर्वाला ।' असा आहे. यांतील 'खान खानदेशाला ।' हे शब्द, 'ख्याल खदेशाला' यांचे अपभ्रंश असतील तर मात्र बापू खदेसीच या पोवाड्याचा शाहीर म्हणता येईल.

## ऐतिहासिक माहिती

या पोवाड्यात पेशव्यांच्या एका आरमारी सरदाराचा पराक्रम व एक निष्ठा वर्णन केली आहे. पोवाड्यांत वर्णिलेल्या प्रसंगासंबधीं अस्सल ऐतिहासिक पत्र खऱ्यांच्या ऐतिहासिक लेखसंग्रहांत एकच सापडते. ते व फॉरेस्ट वगैरेंचे इंग्रजी साधनग्रंथ पाहून खऱ्यांनी या आरमारी लढाईची किंचित हकीकत दिली आहे व तिचे महत्त्व पुढीलप्रमाणे वर्णिलें आहे.

"जमिनीवर ज्याप्रमाणे लढाई सुरू होती त्याप्रमाणे इंग्रजांशीं पाण्यांतहि लढाई सुरू होती व तीत इंग्रजांची प्रथमपासून सरशी होती. त्यांच्या आरमाराने वसई बंदराचा बारा कित्येक महिनेपर्यंत आडविला होता, परंतु त्यास तेथून हाकून लावणे मराठी आर-

शेचाळीस, अडतीस व बत्तीस तोफांचीं होतीं व दोन [illegible] तोफांचीं होती. इंग्रजांचीं गलबतें, 'रिव्हेंज' व 'बॉबे' [illegible] दोनच होतीं. मराठी आरमार दिसण्यांत प्रचंड होतें तरी इंग्रजी गलबतें पाहिल्याबरोबर ते पळू लागलें. तेव्हां इंग्रजी गलबतांनी निकड करून सर्वांत मोठें शेचाळीस तोफांचें 'समशेर जंग' नांवाचें गलबत होतें तें गांठलें व त्यास लढाई करणें भाग पाडिलें. नंतर तीन तास लढाई होऊन 'समशेर जंग' दारूस आग लागल्यामुळें जळून गेलें. त्यावरचा नाखुदा व बहुतेक लोक मेले व गलबताचा विध्वंस झाला.' यासंबंधें पुरंदराहून पटवर्धनाच्या वकिलानें [illegible] लिहिली आहे. ती अशी—'सरकारच्या एका पालाच्या पाठीस इंग्रजांकडील पाल लागलें. निकड झाली तेव्हां आपल्याकडील लोकांनीं बारुदखान्यास (दारुखान्यास) आग लावून जाळिला. त्यांच्या हातास लागू दिला नाहीं. माणसें कांहीं आलीं, फार करून मेलीं' प्रसंगाचें पर्यवसान दोन्ही वर्णनांत एकच आहे पण प्रसंग कसा व कां घडला या वर्णनांत मात्र तफावत आहे. कारण कीं लढाईत यदृच्छेनें दारूस आग लागून गलबत जळणें व माणसें मरणें निराळें, आणि एका गलबतानें दोन गलबतांशीं तीन तास निकरानें लढून शेवटीं सर्व उपाय हटले तेव्हां सरकारचें गलबत शत्रूंच्या हातीं जाण्यापेक्षां जळून खाक झालें तरी बेहेत्तर, त्या कामीं आपण सर्व मेलों तरी बेहेत्तर, अशा राष्ट्राभिमानानें प्रेरित होऊन आपण होऊन दारुखान्यास आग लावणें व सर्वांनीं मरावयास तयार होणें हें अगदीं निराळें आहे."

## पोवाड्यांतील हकीकत

प्रस्तुत पोवाड्यांवरून निघणारी हकीकत अशी. धुळपांच्या पदरीं दामाजी किंवा डामाजी नाइक (हुवेसकर) नांवाचा एक शूर दर्यावर्दी सरदार होता. विजयदुर्गच्या आरमाराची सुभेदारी पेशव्यांनीं धुळपांना दिल्यानंतर कांहीं दिवसांनीं 'समशेर जंग' नांवाचा एक लढाऊ पाल वसई अर्नाळ्याच्या आरमारांतून धुळपांस देण्यांत आला. हा पाल वसई आरमाराचा सर सुभेदार विसाजीपंत लेले म्हणून एक कर्ता व वाकबगार पुरुष होता, त्यानें मुद्दाम बांधविला होता. 'समशेर जंग' पाल वसईस बांधण्यांत आला. तो पाल फारच नामी बांधणीचा होता. शाहीर म्हणतो,

आमच्या नव्या प्रतीत दोन ठिकाणीं सन व एके ठिकाणीं महिना, तिथि व वारहि दिला आहे तसच 'खमस साल यदाच फार कठीण' असा कालोल्लेख केलेला आहे, त्यावरून पोवाडा वर्ण्यप्रसगाशीं सम कालीन आहे हें उघड दिसत पोवाड्याच्या शाहिराच नाव मात्र नक्की सागता येत नाही दळवी प्रतीत 'बापू खदेसी' असें नांव दिल आहे प्रस्तुत प्रतीत ते तस नाही दळवी प्रतींत पाठ असा 'बापू खन्देसी गातो पोवाडा त्याची वस्ती तळे घोसाळा' प्रस्तुत प्रतीत '*गुरु आत्मगिरी* फकीर। डामाजी आमचा मैतर॥ ख्याल गातो जीर। खान खानदेशाला। हल्ली वस्ती तळा घोसाळा। ठाउक सवाला।' असा आहे यांतील 'खान खानदेशाला।' हे शब्द, 'ख्याल खदेशाला' याचे अपभ्रंश असतील तर मात्र बापू खदेसाच या पोवाड्याचा शाहीर म्हणता यइल

# ऐतिहासिक माहिती

या पोवाड्यात पेशव्याच्या एका आरमारा सरदाराचा पराक्रम व एक निष्ठा वर्णन केली आहे पोवाड्यात वर्णिलेल्या प्रसगासबधीं अस्सल ऐतिहासिक पत्र खऱ्याच्या ऐतिहासिक लेखसग्रहात एकच सापडत त व फॉरेस्ट वगैरेंचे इग्रजी साधनग्रथ पाहून खऱ्यानी या आरमारा लढाइचा किंचित हकीकत दिली आहे व तिचे महत्व पुढालप्रमाणे वर्णिल आहे

"जमिनीवर ज्याप्रमाण लढाई सुरू होती *त्याप्रमाण इग्रजाशीं* पाण्यातहि लढाइ सुरू होती व तीत इग्रजाची प्रथमपासून सरशी होती त्याच्या आरमाराने वसइ बदराचा बारा किियेक महिनेपर्यंत आडविला होता, परतु त्यास तेथून हाकून लावणे मराठी आर माराच्यानें झाल नाहीं उलटपक्षीं इग्रजी आरमारच मराठी आरमार जेथें दृष्टीस पडेल तेथे त्याचा पाठलाग करीत असे "पाण्यातील कामास सांप्रत काळीं इग्रज अधिक आहे" ह हरिपत फडक्यान सुद्धा कबूल केलें होते एका प्रसगा इग्रजाच्या आरमाराने मराठी आरमाराचा पाठलाग करिता करिता त्यापैकीं एका गलबतास गाठून लढाइ करून त्याचा नाश केला तेव्हा त्यावरचे बहुतेक लोक प्राणास मुकले यासबधे ग्राट डफ लिहितो कीं, 'मराठ्याचीं पाच गलबते होतीं त्यात तीन अनुक्रमें

'साच्यांत ओतून काढिला जसा नगिना' म्हणजे मुद्दाम विशेष तऱ्हेची मूस ओतून एखादी अपूर्व वस्तु निर्माण करावी तसें त्याचे रूप होतें. हा पाल तिकटी म्हणजे, तीन काठ्यांचा होता. इद्दिदे सन्नैनमध्ये म्हणजे सन १७७०–७१ त धुळप गोव्याकडे स्वारी शिकारीस गेलेले असतां हा पाल विजयदुर्गास येऊन दाखल झाला. धुळपांच्या आरमारांत नारायण पाल, महादेव पाल, दत्तपाल, फत्तेजंग पाल वगैरे अनेक नामांकित लढाऊ पाल होते. त्या सर्वांत 'समशेर जंग' पोख्त तरतुदीचा.त्यावर निवडक शिपाई व मोठमोठ्या तोफा चढविलेल्या होत्या या पालाने समुद्रांत *अनेक पराक्रम केले. डामाजी नाईक (कुवेसकर) हा त्यावरचा मुख्य सरदार* असे.१७७५-७६ सालीं इग्रजांनी साष्टी दग्याने घेऊन ३६ वर्षांपूर्वी चिमाजी आप्पांनी जिंकलेल्या उत्तर कोकणास शह देऊन मराठी राज्यावर मोठें आरिष्ट आणलें. त्यावेळी कारभाऱ्यानी धुळपांना ताकीद देऊन, समुद्रांत इग्रजांचा पिच्छा पुरवण्यास सांगितलें. स्वतः धुळपाचे अेक आरमार रेवदंड्याकडे गेलें. चार महिने त्याने किनाऱ्याने घस्त घातली. असें फिरत असतां माघी शुद्ध पाडवा बुधवारला म्हणजे माघ शुद्ध प्रतिपदेस, म्हणजे १ फेब्रुवारी १७७५ रोजीं गोपाळगडचे बाऱ्यावर धुळपांच्या आरमाराने दोन लढाऊ इंग्रजी गलबते पाहिलीं. मग आपले सव पाल जवळ बोलावून त्यानी इग्रज जहाजांना अडविण्याचें ठरविले.आघाडी अर्थात 'समशेर जंगा'ची म्हणजे डामाजी नाईकाचीच होती. ठरल्याप्रमाणे 'समशेर जंग' पालाने इग्रजी गलब

णीला। आम्ही पेशव्याचे शिपाई। निमक दारू तुजला।" असें खडखडीत उत्तर देऊन फिरून लढाई सुरू केली. मग इग्रजांनीही चेवून तोफांचा मार धरून रेजगण मारून, आणि दांडीचे गोळे फेकून, 'समशेरजग पाल' खिळखिळा केला. डोल काठी, गावी, परवाण पाडले आणि फोडले. जहाजावरील लोकहि खूप मेले आणि जखमी झाले. अखेर आता अधिक वेळ पाल लढणे शक्य नाही, तो इग्रज पागेस लावून विजय-मदाने मुबईस घेऊन जाणार असे पाहून डामाजी नाइकाने आपल्या हातीं जहाजावर दारू पसरून त्यास आग लावून ते उडवून दिलें. त्यात तो स्वतः व इतर अनेक लोक मेले, उडाले, कित्येक जळाले, कित्येक बुडाले. अशा रीतीने डामाजी नाइकाने आपल्या शौर्याची व इमानाची शर्थ करून इतिहासांत आपले नांव अजरामर करून ठेवले. 'डामाजी नाइक धन्य! केले हलाल धन्याचे अन्न!' 'डामाजी नाईक शर्थ करून मेला' 'या पेश-व्याच्या राज्यात फार अमर। पर कोणी जळून नाही मेला असा सरदार।' असे शाहिराने गाइलेले धन्यवाद यथार्थ नाहीत असे कोण म्हणेल!

पेशवे-दप्तराचे अलीकडे सुमारे ४५ साधनखड प्रसिद्ध झाले. त्यांत सवाई माधवरावाच्या कारकीर्दीतील साष्टी--वसई--प्रकरणासबधी ५०० पृष्ठ भरतील इतकीं पत्रे नवीन छापली आहेत त्यांत धुळपाच्या दर्यातील स्वाऱ्या शिकाऱ्याचीहि पुष्कळ आहेत. पण दुर्दैवानें नेमक्या या लढाईविषयींचें एकहि पत्र त्यांत आटळत नाही. खरे याच्या ऐतिहासिक लेखसग्रहांत जे एक छोटे पत्र छापलें आहे तेवढेच. अशा स्थितींत या तपशीलवार व विश्वसनीय पोवाड्याची आज घटकेस तरी इतिहासाच्या अव्वल साधनातच गणना निःसशय केली जाईल.

## वृद्धानें सांगितलेली माहिती

प्रस्तुत पोवाड्याचा नायक डामाजी नाईक याच्याविषयी माहिती उपलब्ध ऐतिहासिक साधनांत काही मिळत नाही हे वर सांगितलेच. १९३४ साली आम्ही कोकणात गेलो असता विजयदुर्गाजवळ वाघोटण मुक्कामीं शिवराम गोपाळ पाटील नांवाचा एक फार वृद्ध माहितगार मनुष्य आहे असें समजले. सबब त्याला मुद्दाम

बोलावून आणवून त्याच्याकडून पुष्कळ जुन्यां हकिकती दंतकथा व माहिती काढिली. गृहस्थ म्हातारा, ९५ वर्षांचा, पण भाल्यासारखा ताठ व फारतर ६०-६५ उमरीतला दिसे. त्याने सांगितलेल्या हकीकतींचे टिपण त्याचवेळीं करून ठेविलें होतें. सुदैवानें त्यांत या डामाजी नाईकाची व त्याच्या मुलाचीहि कांही थोडी माहिती मिळाली ती अशी.

डामाजी नाईक यांचे आडनांव कुवेसकर. त्याच्या मुलाचें नांव चंद्रोजी चंद्रोजी अठरा वर्षांचा झाल्यावर धुळपांनी त्याला 'सवाई चंद्रोजी' असा किताब दिला व 'सवाई समशेर जंग' नांवाचें एक नवें जहाज त्याला मुद्दाम बांधून दिलें. बापाच्या मृत्यूचा बदला घेण्याकरिता चंद्रोजीने जयगडाजवळ पोर्तुगीजांच्या 'सतान' नामक जहाजाशीं लढाई करून ते विजयदुर्गास धरून आणलें. त्या जहाजावर इतके कांहीं रेशीम भरलें होतें कीं, अखेर धुळपांनी आपल्या गुरावासरांचीं दावींहि त्या रेशमाचीं केलीं!! व शेकडो दोर वळून आपल्या सोयऱ्याधायऱ्यास वांटले! सध्या विजयदुर्गाच्या रामेश्वराच्या देवळांत घाटा आहेत त्या चंद्रोजीनेच पोर्तुगीजांकडून जिंकून आणल्या असे म्हणतात. कोळ्याच्या तडीला डामाजींचें इनाम आहे. ही माहिती सांगणारा म्हातारा शिवराम गोपाळ पाटील याचा व डामाजीच्या घराण्याचा भाचेसंबंध आहे. म्हाताऱ्याने आणखीहि हकीकत सांगितली ती अशी कीं, डामाजी नाईकाचा सध्याचा वंशज यशवंत गोपाळ कुवेसकर हा मुंबईस असतो. डामाजीच्या घराण्याविषयीं हकीकत किंवा कागदपत्र राजापूरचे अभ्यंकर वकील यांच्याकडे मिळण्याचा संभव आहे. डामाजीचा पोवाडा शिरसे नांवाचा धुळपाचा गाव आहे, तेथील बापु कोळगे भंडारी याला येतो

वरील माहितींत सत्याचा पुष्कळ अंश आहे, तथापि त्यातील कांही गोष्टींचा कालविपर्यास झालेला दिसतो. तें कसें तें सह्याद्री मासिकाच्या अंकांत पोर्तुगीज साधनांचे एक प्रथम अधिकारी संशोधक गोव्याचे प्रो. पिसुर्लेकर यांचा जो लेख छापला आहे त्यांतील एका नोंदीवरून दिसून येईल. ती नोंद अशी–'युरोपियन लोकांचीं तारवें धरून नेण्यात विशेष शौर्य लागत असल्यामुळे मराठ्यांना असे प्रसंग अभूतपूर्व वाटत यांत आश्चर्य नाही. धुळप

यान सन १७७२ सालीं पोर्तुगीजाचें सतान ( Santana ) नामक लढाऊ तारू काबीज करून पेशव्यांच्या दरबारात केलेली प्रतिज्ञा सिद्धीस नेली त्या पोर्तुगीज तारवावर ४० तोफा होत्या सतान तारवा बरोबर आणखी दोन लढाऊ गलबतें व कित्येक व्यापारी गलबत होतीं. मराठ्यानीं तीं पहिल्याच टकरींत काबीज केली.' वरील अस्सल माहितिवरून असे उघड दिसते कीं, सतान जहाज लुटण्याचा प्रसंग डामाजीच्या लढाईच्या आधीं ४ वर्षे घडलेला आहे. अर्थात चद्रोजीनें लुटलेलं जहाज दुसर कोठले तरी असेल तसेच चद्रोजीने बापाच्या मत्यूचा सूड घ्यावयाचा तर वास्तविक इग्रजांचे जहाज त्याने पकडले पाहिजे होते. पण पकडलें आहे पोर्तुगीजाचें.

---

# डामाजी नाईकाचा पोवाडा

## १६

केले दग समशेरजग इगरेजाला। सागरी राहिले छत्र बुडाला किला ॥ धृ ॥

घडीवेळ उत्तमा पाहून केली माडण। धन्य धन्य कारागीर चतुर शाहाण। सरसुभा विसाजीपंत धनी होत जाणा। केल तयार समशेरजग बसइ ठिकाणा। साचात ओतून काडिला जसा नगिना। शोभे वरि बोरदासारिखा अचवर दाना। तिनकाठ्या उडवी ध्वज। झाझातसवाई थाज। नाव समशेर जग साजे। जैसा सैनामधि हत्ती गर्जे। इहिदे सबइनच्या सालात गेले गाब्याला। ते दिवशीं समशरजंग आले विजयदुर्गाला॥ केले दग० ॥ १

सुभा झाला धुलपरायाला आरमाराचा। नारायणपाल महादेवपाल दत्तपालाचा। फत्तेजग समशेरजग जोडा दोघाचा। अवध्यामध्ये समशेरजग बिनीचा। थोर थोर माडिल्यावर मोठे गोळ्याचा। निवडून सिपाइ चढविला भरवशाचा। दारुचा तरास पाण्यात। फिरग्याशीं धाक गोव्यात। सारी पाडाव केली सपाट। कैकाशीं पडली धास्त। सवाई समशेर नाव दामाजी नाईक सरदार तोचि बिनीचा॥ केले दग० ॥ २

सन खमस साल यदाचे फार कठिण। ठाण्याचा किल्ला घेतला इग्रजाने॥ पत्र आल धुळपरायासी याव बेगुन। निघाले बदरातून आरमार घेऊन। दरकुच रेवदड्यावर गेल चालुन। काही दिवस क्रमिले ध्या ऐकुन। बार बार

---

केले दग—आश्चर्याने दिङ्मूढ केले समशेर जग—समशेर जग म्ह समशेर जगान सवाई समशेर जग—१७६८ सालच्या विजयदुर्ग येथील धुळपाच्या आरमाराच्या यादींत 'सवाइ समशेर' या नावाचे एक पाल आहे पण हा पाल किंवा हू गलवत भरया गलबतात समाविष्ट आहे त्यावर हशम म्हणजे लढवाइ लोक २५ व दर्यावर्दी २५, एकूण ५० माणस नेमलेलीं होतीं (इ स 'जुन्या गोष्टी' लेखाक २८, १७६८ मधील धुळपाच आरमार) सागरी राहिले छत्र—

हिंडु लागले। नावाचे जानराव धुळे। चारमास झुजे मारिले असे माही सुध। पाडवा बुधवाराला। गोपाळगडचे वाऱ्यावर इंगरेज पाहिला॥ केले दग०॥ ३

सारे पाल जवळ बसून मन्सोबा केला। महादेवपाल नारायणपाल समशेरजगाला। तुह्मि कोठे एक बाजून घालावा घाला। आम्ही येतावो आतुन मदत तुम्हाला। पुढे होऊन समशेर दमानी पडला। न करके कर्त्याची कर्णी वारा राहिला। सारे पाल राहिले दूर। ना अैक माज्याचा मार। अिंग्रेजास मदत ईश्वर। दोन जाजे त्याचि जबर। एकला पाहून समशेर। मारामार करू लागला गोळ्यावर गोळा। नाहीं ऐके समशेरजग खूब भाडला॥ केले दग०॥ ४

इंग्रेज पुसे हटकून कोण सर्दार। दामाजी नाइक म्हणे मीच बादुर। कपितान मनी उमजला धनी यावर। म्हणून झडून पडला समशेरावर। दोहींकडे दोनीं जाजे करिती मार। खुब झुजला समशेरजग तीन पाहार। काहि केल्या आटोपेना। दग जाला इंगरेज मना। 'घ्या घ्यारे कौल भेटाना'। 'लोक म्हणती न येऊ शरणा। करू पेशव्याची नामना। सती होऊन बसलों सरणा। ये येरे टोपीवाल्या अडावणीला। आह्मी पेशव्याचे शिपाइ निमख दाउ तुजला'॥ केले दग०॥ ५

---

समुद्रावर कीर्ति राहिली. बुडाला किल्ला—किल्ल्यासारखा बळकट समशेरजग पाल बुडाला समुद्रातला किल्लाच की काय असा पाल. मांडण—माजण पाहिजे. माजण म्हणजे मूर्तीवर तेलाशेंदराचा लेप देतात तो येथे अर्थ जहाजाची तावरात किंवा रंगरंगोटी समजावी. मांडण—माडणी, रचना, रचनेचा प्रारंभ.? धनी होत जाणा—धनी होता जाण असं पाहिजे. जाण—शहाणा. नगिना—उत्कृष्ट वस्तु बोडद—बोरज, बोरद–जहाजाची एक बाजू (Board). शोभेगरी बोरदासारिगा समुद्रावर खालवर होतांना त्याच्या बाजु किंवा काठ (कडा) शोभतात अचंब्रर—आश्चर्यकारक. तिन काठ्या—तीन डोलकाठ्याचे तिरकती तारू. थोरथोर मांडिल्यावर मोठे गोळ्याचा—थोरथोर भांडी त्यावर मोठे गोळ्याचा असे पाहिजे; भांडे—तोफ भांडीं—तोफा. दारूचा तरास—भावार्थ समशेरजगावरील

इंग्रेजास आला राग झाला सरमिंदा। भरभरून भाडी मारी दोंहि बोरजा। दारुचे गोळ फार करितो चेंदा । रेजगिरी साखळी मारुन उडविला पडदा । मारली थोरली काठी गावी परवाणमुद्दा । तक्ता फोडुन केला जुदाजुदा । लोक भाडले भार शर्तिन । जाति हिंदु मुसलमान। दामाजी नाइक धन्य । केलें हलाल धन्याचे अन्न । पाल नेइल वैरी म्हणून । दिल्ही आपल्या हाती अग्न । सवाई समशेर जळू लागला ॥ दामाजी नाईक शर्त करून मेला । केले दग० ॥ ६

किति उडाले दारुन जळाले फार। काही उड्या टाकुन गेले तक्त्यावर। गेलि वस्त्रे नि पाघुरणे आणिक हातेरे। कसा गिलजा घात (?) पडला एकच कहर। या पेशव्याचे राज्यात फार अमर। (पर) कोणि जळुन नाही मेला असा सर्दार। झुज झाले मिरया ठिकाणी। काहि गेले रत्नागिरीवरुनि। खुब केले त्या सुभेदारानी। एकेक शेला दिला पाहूनी। काही नेले इंग्रेजानी। आले जखमी लोक खबर कळली ल्हान थोराला। कसा कहर राज्यावर पडला मोठा गलबला ॥ केला दग० ॥ ७

---

तोफाच्या माराची गोळ्यातील फिरंगी आरमाराला धास्ती वाटत असे सपाट—(खपाट पाहिजे) मूळ शब्द खपाटा. एकत हेर्चा होडी किंवा पडाव किंवा तारू बेगुन—जलदीनें बारबार—बहुधा हिरेबोरे असाच मूळ शब्द असला पाहिजे मोडी वाचनाची चूक दिसते हिरेबोरे Beating to windward, The tacking and turning of a ship under an adverse wind (Molsworth) बारा—बंदर किनारा. जानराव—जानराव धुळप धुल्ले—शूर, प्रतापी. दमानी—मूळ शब्द दमान. वाऱ्या समोरची बाजू (गलबताचा), शिडाचा मागचा ढोलकाठीजवळ येणारा भाग. ६ जानेवारी १७७५ च्या जानराव धुपळाच्या पत्रांत हा शब्द आला आहे "युद्द आमच्या आरमारावर सहा तरांडीं व तिरकर्ती पाल एक, अर्शा (इंग्रजांचीं) त्यांशीं आम्ही मुकाबला घेणार होतो. परंतु आम्हीं दमानासाली होतों वास्तव गांठ पडून आली नाही." (पेशवे दप्तर) नामना—कीर्ति अढावणी—अढावण. गलबताचे सर्व बांधकाम झाल्यावर मालाचे

मोठ्या पहाटेस दिवस उगवला न् राव आले। इंग्रेज पळून गेला असे कळले । आइकोन वर्तमान कष्टी झाले । गेली फत्तेजंगाची चाजू देवा काय केले । वर्तमान ऐकून तेथून निघाले । गेले विजयदुर्गाचे बंदरामध्ये पोचले। सारे पाल गोदी घालून खाली उतरले। जे रणी राहिले खेत जिवाशी मुकले। किती हेटकारी झाले ठार। घ्या रुपये। ढालभर। राज पेशव्यांचे अवर। बातनी विजयदुरगावर। गुरु आत्मागिरि फकीर। दामाजी आमचा मैंतर। ख्यालगातो जीर खान खानदेशाला। हाली वस्ती तळा घोसाळ्या ठाइक सर्वांला ॥ केले दंग० ॥ ८

—

सोयीसाठीं आणखी एकदोन फळ्या मारतात त्या अगर साठ विणतात तो. अडावणीला येणें—जहाजाला जहाज भिडवून लढाई करणे. रेजगारी—रेजगण किंवा पत्र्याचे धातूचे तुकडे घालून तोफांतून उडवितात ते. परवाण—पडबांध. मोठ्या शिडाचे लाकूड. दोन्यानीं शीड ज्या लांकडास बांधतात ते. घोरली काठी—डोलकाठी. जुदा जुदा—निरनिराळा. कसा गिलचा घात पडला—!. गोदी—विजयदुर्गास धुळपांची गोदी अद्याप प्रसिद्ध आहे.

# सखूबाई शिंदीचा पोवाडा

## ऐतिहासिक माहिती

हा पोवाडा जयाप्पा शिंद्याची बायको सखूबाई शिंदे हिच्या विषयीं आहे हा अहिल्याबाई होळकर, अनुबाई घोरपडे, यासारखीच कर्तबगार बाइ होती व तिनें पुरुषाबरोबरीन आपल्या जहागिरीचा कारभार हाकरा

शिंद्याचा मूळ अर्जक पुरुष राणोजी शिंदे त्याला लग्नाची एक व बिन लग्नाचा एक अशा दोन बायका होत्या लग्नाच्या बायकोच नाव निंबाबाइ आणि राखेच नाव चिमाबाई निंबाबाइला जयाप्पा, जोतिबा आणि दत्ताजी असे तीन मुलग झाले चिमाबाइला तुकोजी आणि महादजी असे दोन पुत्र झाले निंबाबाइच्या मुलापैकीं मधला जोतिबा अल्पवयातच वारला त्याच प्रमाणे चिमाबाईचा थोरला मुलगा तुकोजीबाबा तोही तसाच वारला

राणोजीच्या मृत्यूनंतर त्याची सरदारी त्याच्या औरस मुलाना म्हणजे जयाप्पा दत्ताजींनीं चालविली नतर जयाप्पाचा मुलगा जनकोजी यान चालविली. पुढे पानपतावर जनकोजीही ठार झाला तेव्हा सरदारी कोणास द्यावी हा प्रश्न आला पण राणाजीचा अनौरस मुलगा महादजी हा पानपताहून बाचून आला होता व तोही कर्तबगारच होता तेव्हा अखेर त्याच्याकडेच पेशव्यानीं शिंद्याची सरदारी कायम केली मात्र ता सरदारी महादजीकडे कायम बद्ध मूल होइपर्यंत दरम्यान अनेक भानगडी झाल्या व त्यापैकींच एक भानगड म्हणजे राणोजाची बायको निंबाबाइ व तिची सून म्ह जयाप्पाची बायको सखूबाइ यानी महादजीला तो अनौरस आहे या सबबीवर सरदारी देण्याबाबत फार अडथळे आणले शिंद्याच्या घरात त्या वेळीं मोठाच गृह कलह माजला होता पण शेवटीं सह्यानिकच बायाचा पक्ष लगडा पडला व पेशव्यानीं सखूबाईला निराळी स्वतंत्र जहागीर तोडून दिला

१७६४ सालीं रघुनाथराव एका पत्रात लिहितो, " पाच लक्ष रुपये घेऊन खासा स्वारीबरोबर पाच हजार फौजनिशी राहून चाकरी करावी ह महादजीन कबूल केलें आहे परतु महादजीन सखूबाईस राजा राखले पाहिजे असहि बजावले आहे " पण त झाल नाही सखूबाइची व महादजीची नित्य भांडण होऊ लागलीं यानतर काही

काळ रघुनाथरावाने सखूबाईच्या भिडेमुळे मानाजी फाकडे शिंदे यासहि सरदारी दिली होती; पण पुढे थोरल्या माधवरावांनी ती बदलून महादर्जीकडेच कायम केली.

महादजीने सखुबाईस कसा त्रास दिला त्याविषयी पेशवे दप्तरांतील पुढील पत्र वाचनीय आहे.

श्री छ. १६ रमजान
ता. १५-२-१७६४

श्रीमत राजश्री दादासाहेबाचे सेवेसी प्रीतिपूर्वक सखुबाई सिंदे दंडवत विज्ञापना. येथील कुशल ताा फालगुण सुध्य १२ जाणून येथास्थित असे. याउपरी चिरजीव महादजी सिंदे यासी आपण येथे पाठविले. साहेबी पाठविले म्हणून आम्ही त्यासी कोणे गोष्टींचें द्वैत न धरतां त्याचे (लोका) स व त्यास वाडियातच ठेविले. दोन तीन महिने आम्हापासी होते सांप्रत कजिया करून दुसऱ्या वाडियात जाऊन राहिले. आम्हास अनेक प्रकारचे उपद्रव आरंभिला आहे. चहुकडोन वतग केलें आहे. आमच्या जवळील माणूस देखील आम्हापासी येऊ देत नाही. सेते पोते आमच्या पोटापाण्याची होती ते क्षाहून बद केली, ब्राह्मण देव दोघे जवळ होते त्यास पीडा करितात. आमची अन्नावस्त्रार्ची विपत्ये आहेत. आणखी कोठवर ल्याहावे! आम्हावर ईश्वरें गहजब केला कीं येकायेकीं येकदाच मृत्यु पावले. आम्हास कोठे उभे राहावयासी जागा नाहीसी जाली. दुःखाचे परवत जाले आसतां महादजी शिंदे पाठी लागले आहेत. येक खावदाचा भरवसा, त्यासी साहेबही परामृश (घेत) नाहीत. यैशा मशुशाक्षून आमची आबरू घेवितात! तेव्हां आम्ही उपाय काय करावा! साहेबापासी वर्तमान ल्याहावयासी चोर जाली यैशा गती जारया आहेत. दासीचे दासत्व आम्ही करावें यैसे साहेबाच्या गर्जीस येत असले तरी सुखरूप करावें परतु ईश्वरास ह्या गोष्टी मानत नाहीत. साहेबाच्या चित्तात आमची विपत्ये करावी यैसे आसले तरी तैसेच लिहून पाठवावे. विश भक्षून सर्वत्र प्राणत्याग करू! दुसरा उपाय नाही. हे जाचणूक आमच्यानें सोसवत नाही. दौलत साहेबी त्यांच्या हवाली केली. आज चार महिणे येथे येऊन बसले आहेत. एक राऊत अद्यापि

ठेविला नाही. पागेची बदोबस्ती अगर शागीर्द ( ये ) कोणे गोष्टींची तरतूद *तिळमात्र नाही. सारा बखेडा चहूकडोन जाला आहे. कोणी पाठवून परामर्ष* करावा. पुढे आमच्या ससाराचा कांही वदोबस्त करून देतील तरी आमची जगणूक होईल' महादाजी शिंदे यांच्या जाचणुकेपासोन सोडवावे. बहुत काये लिहिणें हे विज्ञाप्ति.

सखूबाई, भागीरथीबाई, सगुणाबाई इत्यादिकांकडे पेशव्यानी खासगी जहागिरीस गाव नेमून दिले त्याबाबत पुढील उल्लेख सापडतात

१७६५-६६ साली (सीत सितैन मया अलफ छ २८ सवाल) पेशव्यानी *भागीरथीबाई शिंदी व सगुणाबाई शिंदी यास इनाम गावे चालण्यासबधी* सनद करून दिली त्यावरून त्या दोघीकडे १२२२९३ रु उत्पन्नाचे ५६ गाव होते असे कळते. त्यांपैकी पन्नास हजार भागीरथीबाई व सगुणाबाई या उभयताचे ससाराचे बेगमीस, ७२९३ शिबंदी व महाल मजकुर खर्च गांवगन्नाचा ५००० ठाणे पेडगांव येथील खर्चास सदरहू तनखियाचे गांव किल्ल्याकडे उपयोगी पाहून नेमून दिले जातील ते सरकारांत द्यावे. ६०००० रु. स्वार २०० दोनशे याणी हुजूर चाकरी करावी त्यांस तैनात दर राउती येणेप्रमाणे—रु॥ ४०००० सवार पागेचे करोल १०० दर राउती ४००प्रमाणे सामान चागले बाळगावे. २०००० शिलेदार स्वार १०० दर २०० दोनशें प्रमाणे एकुण रु. ६०००० दोनशे स्वाराचा सदरहू तैनात साठ हजार रुपये.

१७६६-६७ साली सखूबाई शिंदे हिच्या नावे पेशव्यानी ससाराचे बेगमीस नेमणूक करून दिली त्यासबधी सनदापत्रं थाड थोरला माधवराव डायरी खड १ पृ १६१ ते १६३ वर छापली आहेत तसच १७२ ते १७४ पानावरहि

छ २९ जमादिलावल ( २४-१०-१७६७ )

*जयाप्पाची बायको सखूबाई शिंदे हिच्याकडे तिचे जाहगीर गाव* पूर्ववतप्रमाणे निर्वेध चालावेत अशी पेशव्यान आज्ञा केली. ( पेशवे दप्तर, पेशव्यांच्या रोजनिशीतील उतारे भाग २२ पृ. १०४ )

पे द भाग २९ पत्र न २२१ तारीख ६–१२–१७६८ पत्र माधवराव पेशव्याचे आहे त्यावरून सखूबाई शिंदे हिच्याकडे सरजामा साठी म्हणून मौजे वाघाली हा दरोबस्त गाव व मनेरे चिंचोली जागिरीचा

अमल असे होतें; तसेच भागिरथीबाई व सगुणाबाई शिंदे यांच्याकडे मौजे करदी हा गांव दरोबस्त मौजे, माके जागिरीचा अमल व मौजे दडगांव ( पेडगांव ? ) स्वराज्याचा अमल खेरीज जहागीर करून असे होते. हे पांची गांव पेशव्यांनी जप्त करून त्याची कमाविस नारायणराव पेशव्यास सांगितली. शिंद्यांच्या घरांतील गृहकलहामुळेच पेशव्याला ही गोष्ट करावी *लागली. पुढे शिंदे बाया शुद्धीवर आल्या म्हणून सखूबाई व भागीरथीबाई शिंदे यांचा सरंजाम पेशव्यांनी वाटणीप्रमाणे मोकळा केला;* पण भागीरथीबाई वाटणी घेईना. सबब तिचा सरंजाम तसाच जप्तीत ठेवला.

सखूबाई शिंदे ही मुखत्यारीने आपल्या जहागिरीचा बंदोबस्त कसा करी याबाबत पुढील पत्रे उपयुक्त आहेत.

( १ ) रामशास्त्री प्रभुणे यांनीं एका प्रायश्चित्त प्रकरणीं तिला पत्र-लिहिले ते. ( शिवशाहीचा लेखनालंकार जोशी चांदोरकर )

( २ ) *खुद्द सखूबाईने गंगाधर यशवंत चंद्रचूडास पुढील पत्र लिहिले* आहे. " फिरंगीयांनीं चिरंजीव खेमसावंत यांजकडील ठाणें दगलबाजी करून घेतले. त्याचें वर्तमान पेशव्यास कळवून नऊ महिने झालें. पेशव्यांचा कारकून फिरंग्याकडे जाऊन आठ-नऊ महिने झाले. फिरंगी दाद देत नाहींच. उलट अलीकडे आणखीहि एक दोन ठाणीं सावतांची फिरंगी यांनी घेतलीं. सबब पेशव्यास व नानाफडणविसांस चिरंजीव महादजी शिंदेकडून पत्र पाठवून पुण्यांतील फिरंग्यांच्या वकिलास ताकीद होय व ठाणीं परत देत असें करावें." ( ३ ) अहिल्याबाई होळकरणीचें हरिपत फडक्यास ता. १७ ९-१७८८ चे पत्र " मौजे निंबगांव कल्याणखेडे हा गाव सखूबाई शिंदीचा नसतां लटका कजिया उपस्थित करून इकडील दोन नांवा तिनें फोडिल्या. गांवकऱ्यापासून २५० रु. घेतले व माणसे *मारिली त्यासंबंधी आम्ही पेशव्याकडे तक्रार केली.व त्यांनीहि योग्य तोच निकाल देऊन सखूबाईस ताकीद केली. पण ताकीदपत्राचा अमल अद्याप झाला नाही तरी करवावा. " ( चंद्रचूड दप्तरापैकीं, निवडक उतारे,ग्वाल्हेर दरबार प्रकाशन पत्रे नं. १६५ व ७२ ).*

---

# सखूबाई शिंदीचा पोवाडा

## १७

( हा पोवाडा पन्हाळा येथें जयराम गोंधळी याचे टाकाऊ दप्तरांत *शितूतांना आढळला.* या पोवाड्याचे मथळ्यावर कांहींच लिहिलेले नव्हते. त्याची ही अपुरीच प्रत आहे.)

करूनि गेली राज ह्याराज सखूबाई। त्या पुण्याला पार नाही॥ध्रुवपद॥ राणोजीराव बाबा होते सुभेदार त्यांचे पोटी जन्मले हिर॥ आपासाहेब सत्त्वधीर॥ केवळ पाहा ईश्वरअवतार॥ मधर्वी बध जोतिबा सरदार॥ जशी काई खर्गाची धार॥ दत्तमहाराज दिगांवर॥ नाव पाहा त्यांचे दुरवर॥ कीर्ती माद्रींचा माद्रींचा अवतार॥ ऐका दोहींतिर्हींचा विस्तार॥ चिमाबाईचे पाहा पुत्र सत्वधीर॥ तुकोजीबावा गुणगंभीर॥ माहादजी

---

राज—राज्य सक्रूबाई—जयाप्पा शिंद्याची बायको, गाढवे यांची कन्या. हीर—हिरे. मधर्वी—मधले. जशी काई खर्गाची धार—खर्गाची म्हणजे खड्गाची. तरवारीच्या पात्या सारखा तेजस्वी म्ह. तळख असा भावार्थ. खर्ग असाच शब्द पूर्वी सेखोजी आम्रयाच्या पोवाड्यांत आलेला आहे. दत्त महाराज दिगांबर—दत्ताजी शिंदे जणु काही प्रत्यक्ष *दिगंबराचा म्हणजे दत्तात्र्याचाच अवतार असे.* *कीर्ती—कृती.* दोहीं तिहींचा विस्तार—तिहींचा म्हणण्यातील स्वारस्य कळत नाही, कारण राणोजी शिंद्याला दोनच बायका होत्या. निंबाबाई ज्येष्ठ, लग्नाची, आणि *चिमाबाई राख; परंतु एके ठिकाणीं राणोजी शिंद्याला निंबाबाई आणि* मैना-बाई या लग्नाच्या व चिमाबाई राख अशा तीन स्त्रिया होत्या असेंही लिहिले आहे. चिमाबाई—ही महादजी शिंद्याची आई. ही मूळ रजपूत होती असे म्हणतात. *जिववादादा बक्षी यांचे चरित्रांत लेखक श्री.राजा-*ध्यक्ष यांनीं ४४ व्या पृष्ठावर एक टीप लिहिली आहे. तींत महादजी शिंदे म्हणजे या चिमाबाईचा लेक हा अनौरस किंवा दासीपुत्र नव्हता असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. *त्यासाठी मराठी शाळापत्रक पुस्तक* दोन अंक ४ पृ १२५, १२६ यावरील लेख त्यांनीं उद्धृत केला आहे. त्या लेखांत 'थोरल्या बाजीरावाचे कारकीर्दीत राणोजी शिंदे दतिया नामक रज-

बाबा बाबाचें तप थोर ॥ राजशेडे सृष्टीवर ॥ घुमाळी ॥ ऐसे पांचीजन भाऊ

पूत संस्थानिकाशीं लढला. त्या लढाईत राणोजींनी रजपुतांचा पूर्ण पराभव केला तेव्हां दतियेकर संस्थानिकाची राजकन्याच आपण होऊन राणोजींकडे आली राणोजीनेही तिला आपल्याजवळ बाळगली व गांधर्व विधीनें तिचें पाणिग्रहण केलें' असें म्हटलें आहे. राजाध्यक्ष म्हणतात कीं, "पाटील बावा राणोजींचे अनौरस किंवा दासीपुत्र होते असा जो लोकप्रवाद आहे तो चुकीचा आहे;" पण ४४ व्या पानावर टीपेत असें म्हणणारे हे लेखक त्याच्या आदल्याच पानावर "जनकोजीरावांच्या मागे पानपतानंतर राणोजीच्या औरस संततीचा नर्हाश झाला" असें स्वच्छ लिहितात! राजवाडे खंड ६ मध्यें पुरंदऱ्याच्या दैनंदिन रोजनिशींत 'राणोजी शिंद्याची राख चिमाबाई कोंनी निघाली' अशी निःसंदिग्ध नोंद आहे. तसेंच पेशवे दप्तरांतील एका पत्रात, जयाप्पा शिंद्याची बायको सखूबाई व महादजी शिंदे यांचा गृहकलह लागला त्या वेळीं सखूबाईने माधवराव पेशव्यास एक खरमरीत पत्र लिहिलें आहे. त्यांत ती असें म्हणते की, 'आम्हास स्वतंत्र नेमणूक करून या यांनी दासीचे दास्य करावयास लाविलें आहे." राणोजी शिंद्याची बायको निंबाबाई हीसुद्धा वरील कारणांकरिताच सरदारी महादजीला देण्याविषयीं पूर्ण विरुद्ध होती. पेशवे दप्तर भाग २९ मधील ११ नंबरच्या पत्रांत "महादजी शिंदे याचे अनुकूल पडत नाही येैसे निंबाबाई स्पष्ट बोलली" असा उल्लेख आहे. ते पत्र २ जुलई १७६१ सालचें आहे. महादजी शिंद्याला लेकवळेपणाच्या प्रवादाचा जाच फारच होई व ते त्याच्या मनांत शल्यासारखें डाचे त्याने बलिष्ठ झाल्यावर जबरदस्तीनेही कुळवंताशी सोयरिका घडवून आणण्याचा प्रयत्न केला. त्याबाबत पे. द. भाग ४३ मधील सखाराम बापूचें पुढील पत्र वाचनीय आहे.

*"विनंती उपरी. तुम्हीं पत्र पाठविलें तें पावलें. रा. महादजी शिंदे याचा मराठे मातबर घरदाज यासी गोतपत करावी व तनपुरे पाटील राहूरावर याची कन्या मागतात. त्याणे मूल पलविली. त्याचे घरी चौकी बसविली आहे. मराठे सरदार रोज येऊन ये विसीचे काय ते आम्हास सांगा म्हणतात. ये विसीचा मार लिहिला ते कळला. त्यास हा प्रकार सरकारातून व्हावयाचा*

जसे पहूचे पांडवू ॥ धर्म अर्जुन बळी भिवू ॥ आणिक नकुळ सहदेऊ ॥ तैसे

नाही. राजीमताचा प्रकार ज्याचा त्याचा आहे. बलात्कारे होणार नाही. तुम्ही लोकांस समजाऊन सांगितले, उत्तम आहे. खातरजमा, तनपुरे यांचे घरीं चौकी बसविली त्याविसी व लोकांस पत्रे येतात येविसी त्यास वाईट न वाटे गोड दिसे असा प्रकार करितो. तुम्ही लवकर कूच करून जावे म्हणजे गोतपत सहजच राहिली. रा. छ १६ जिल्हेज हे विनती. ( पेशवे दप्तर भा. ४३ प. न. ४९ ता. ७-२-१७७६. )

'The investiture of Scindia by the Peshwa, as Deputy to the Vakil-ul-mutlaq, immediately followed on their arrival at the Peshwa's palace. But on this occasion and on several others the pretended humility of Scindia gave disgust, when he insisted on being considered as the hereditary servant of the Peshwa entitled only to carry his slippers, and to be addressed by no higher title than that of Patel Though this affectation was meant to be in conformity with Maratha taste it failed in effect. No brahmin of education was pleased or deceived by such coarse self disparagement and the old Maratha, though Mahadji Scindia *had purchased some hereditary privileges* in the Deccan, would much more readily have acknowledged his new imperial titles than have assigned to him the appellation of *Patel*, a distinction which they considered due only to the legitimate Scindia."

[Memoir of the life of the late Nava Farnavis compiled from Family records, and extant works

क्षेत्री जिवू ॥ चौखंडी ज्याचे नाऊ ॥ म्हणविती अष्ट उमरावू ॥ बसविला ज्यांनी बाच्छाऊ तक्तशाई ॥ त्यांच्या पुण्याला० ॥ १

राजलक्ष्मी लक्ष्मीसी नाही अंत ॥ उदंड पाहा दिधली भगवंत ॥ हत्ती घोड्यासी घोड्यासी गणित ॥ उदंड पालख्या आणि रथ ॥ आपासाहेब पाहा गेले मारवाडांत ॥ तिथे वैऱ्यांनी केला घात ॥ दत्ताजी बावा बावा गेले कुळक्षेत्रांत ॥ ते न्हाले धारातीर्थ ॥ जनकोजी बाबा कोपला भगवंत ॥

---

by A. Macdonald first Published 1851. Reprint 1927. Page 65-66]

राजझेंडे सृष्टीवर—ज्यांच्या किर्तीचे झेंडे सर्व जगांत नाचले किंवा नाचतात असे. राजझेंडा याचा अर्थ जरीपटका असाहि घेतां येईल. हा जरिपटका छत्रपतींकडून मिळावयाचा असे. महादजी शिंद्यांनीं सर्व हिंदुस्थानभर जरीपटका नाचविला. बळी—बळवान. भिवू—भीम. तैसे क्षेत्री जीवू—क्षेत्री म्ह. क्षत्रिय. जीवू म्ह. प्राणी. क्षेत्री जीवू म्हणजे पराक्रमी क्षत्रिय.

नाऊ—नाव, किर्ती. म्हणविती अष्ट उमरावू—अष्ट प्रधानांनींहि धन्यवाद गाइले की पाटिल बावांनींच चगत्याच्या वंशाला दिल्लीच्या बादशाही तक्तावर स्थिर केलें. अष्ट उमराव म्हणजे लक्षणेनें सर्व मातबर सरदार असाहि अर्थ घेतां येईल. बसविला ज्यानी बाच्छाऊ तक्तशाई—' तक्तशाई, हा मूळ चक्ताई या शब्दाचा शाहिराच्या तोंडांत झालेला अपभ्रंश होय. दिल्लीचे बादशहा हे चक्ताई कुळांतले. त्यावरून दिल्लीच्या बादशाहीला चक्त्यांची पादशाही म्हणत असत. महादजी शिंद्यांनी गुलाम कादराचा वीमोड करून शहा आलमाला दिल्लीच्या तक्तावर बसविले. हे प्रसिद्ध च आहे. घोड्यासी गणित—घोड्यासी ( नाही ) गणित. त्यांच्याजवळ अगणित हत्ती घोडे होते असा अर्थ. वैऱ्यानी केला घात—मारवाडांत नागोरच्या स्वारींत जयाप्पाला दग्यानें ठार मारण्यांत आलें त्यास अनुलक्षून. कुळक्षेत्रांत—कुरुक्षेत्रांत. ते न्हाले धारातीर्थे—ते धारातीर्थी पडले म्हणजे लढाईत ठार झाले. बऱ्हाऊच्या लढाईत ठार झाले. जनकोजी बावा कोपला भगवंत । नाही लागला त्याचा अंत—जानकोजी शिंदे

नाहीं लागला त्याचा अंत ॥ राव माहादवाने रोकड ॥ घेतला वडलाचा सूड ॥ कावीज केलें मारवाड घेतला फत्तरगड ॥ मोडली गिलज्याची खोड ॥ आपलेसे केले चहूकड ॥ आपलीसी केली चौंकड ॥ रेफिरे हात बांधुनी आला पुढे दिधले परगाणे द्वाहीं ॥ त्याच्या पुण्याला० ॥ २

लिंबाबाईचे थोर पुण्य ॥ लक्षुमी दिली भगवतान ॥ कुने गोष्टीचे नाहीं उण ॥ जानकूबाई लेक रत्न ॥ जोगूबाई बाईवर दया पूर्ण ॥ नांव केले मैनाबाईन ॥ येसूबाई बाई बहुत सुज्ञान ॥ काय मी वर्णू त्याचे गुण ॥ वयासाहेब नित्य करी बोळवण ॥ हस पुरविली चोखून ॥ बयासाहेबाची सकूबाई वडील सून ॥ मानपानाची धर्नीन ॥ धुमाळी ॥ मघवी

---

पानपतावर ठार झाला. पण त्याचे शव प्रत्यक्ष कोणासच दिसले नाहीं व म्हणूनच पुढे त्याचाही तोतया झाला होता. रावमहादवा—महादजी शिंदे रोकड–रोकडा, पुरेपूर. चौंकड—चौकट. रेफिरे—नफेर किंवा नफर असा मूळ पाठ असावा नफर म्हणजे गुलाम. लिंबाबाई—राणोजी शिंद्याची बायको जयाप्पा शिंदे याची आई. हिनेहि वडिलकीच्या नात्यानें कारभार चागला केला. पेशवे दप्तर भा. २९ प न. ३ वरून तिच्याकडे मौजे अरणगांव दळवी याचे व हिवरे वगैरे दहाबारा गावाच्या मामलती आणि पाटिलक्या होत्या असें दिसतें. २२ आक्टोबर १७५५ रोजीं ती वारल्याचे एका शकावलींत लिहिले आहे; परतु शिंदेशाही इतिहासाचीं साधनें भाग १ पृ. २३७ वर तिचें ७ नोव्हेंबर १७६१ तारखेचे पत्र छापले आहे; शिवाय आम्हीं या पोवाड्याच्या टीपांतच वर तिच्या विषयींच्या २ जुलै १७६१ च्या पत्राचा उल्लेख केलाच आहे. अर्थात् ती १७६१ नतर केव्हा तरी वारली असावी. तिची समाधी किंवा छत्री श्रीगोंदे येथे आहे. सरूबाईचीही तेथेच आहे.

जानकूबाई—लिंबाबाईची थोरली लेक. तडवळेकर भोईटे याजकडे दिली होती. जोगूबाई—लिंबाबाईची दुसरी लेक नेरलेकर साळोखे यांजकडे दिलेली. मैनाबाई—लिंबाबाईची चौथी मुलगी. रहिमतपूरकर माने याजकडे दिलेली. येसूबाई—लिंबाबाईची तिसरी मुलगी पाटसकर शितोळ्यांच्याकडे दिलेली. बयासाहेब—हे लिंबाबाईचे टोपणनाव दिसते. नित्य करी बोळवण—ज्या ज्या वेळीं या मुली माहेरीं

सगुणाबाई ॥ केले राजपुण्य सवाई ॥ तिच्या पुण्यासी जोडा नाही ॥ आणखी भागीरथीबाई ॥ तिची कीर्ती वर्णू मी काई ॥ अन्नछत्र ठाई ठाई ॥ ब्राह्मण भोजन मिठाई ॥ पंक्तीस जेवी गोसावी शास्त्र गाई ॥ तिच्या पुण्या तिच्या पार नाही ॥ ३

निंबाबाई बाई गेल्या सर्गाला ॥ राज्य स्थापिलें सकूबाईला ॥ सगुणाबाई केली तुमचे हवाला ॥ सभाळा भागीर्थीबाईला ॥ फार विनविलें विनाविलें बाईला ॥ जीव ठाव आपुले रयतेला ॥ सुखी राखावें सुखी राखावें अवघ्याला ॥ राज कर आशीर्वाद दिला ॥ सकूबाईनें प्रतिपाळ फार केला ॥ पार नाही त्याच्या पुण्याला ॥ नाथ प्रसन्न हाय वयासाहेबाला ॥ लौकिक नावाचा झाला ॥ चाल ॥ धुमाळी ॥ सोहिरे जोडले धुर ॥ अमृतराव निंबाळकर ॥ राणोजी त्याचे कुमर ॥ दिली दादीबाई सत्वर ॥ आणखी

---

येत त्या त्या वेळी त्याना उत्तम दागदागिने वस्त्रपात्रें देऊन त्यांची पुन्हा सासरीं रवानगी करीत असे. हंस पुरविलीं चोकून—हस ह्म. हौस. चोकून ह्म चहूंकडून चौबाजूनीं ह्म. सर्व तऱ्हांनीं. राजपुण्य—विशेष पुण्य. सगुणाबाई—राणोजीचा दुसरा मुलगा जोतिबा यांची स्त्री सगुणाबाई धान्राबाज मांडवगणकर भोपतराव देशमुख यांची कन्या. यांस संतान झालें नाही. कसबे बरवासागर प्रांत बोंडसे येथील लढाईत ठार झाले. ही लढाई १७५२ च्या सुमारास झाली. वाडपेशवा डायरीमध्ये (सवाई माधवराव खड १ पृ. २३१ नोंद २६८ (७११) सगुणाबाई सिंदीच्या मृत्यूचा उल्लेख आहे, तिच्याकडे चालू असलेल्या वतनी गावाचा अमल ती साल गुदस्ता मेल्यामुळे महादजी शिंदे याजकडे चालवावा असें १७ सावान इसने समानीनचे (१७८१-८२) पेशव्यांचें पत्र. "सगुणाबाई ही सालगुदस्ता मृत्यू पावली. त्याचे सरंजामाचे बंदोबस्तास" अशा मजकुराचें आप्पाजी विश्वनाथाचे सुरू इसन्ने समानीन माया व अलफ छ १९ रबलालचें पेशव्यास पत्र आहे. या पत्राची इंग्रजी तारिख ८ आक्टोबर १७८१. अर्थात् सगुणाबाई १७८०सालीं वारली असली पाहिजे. भागिर्थीबाई—दत्ताजी शिंदे यांची स्त्री. गोरखोजी आपकर याची ही कन्या. गोसावी—कीर्तनकार. गाई—गवई. शास्त्र—शास्त्री. राजकर—राज्यकर. सोहिरे जोडले धुर—धुर

आईका सोयर ॥ सेनापती दिगांबर ॥ पाहो सखाराम चातुर ॥ *अंबिकाबाईचे घर ॥ अंबिकाचं घर सागू काई ॥ त्या० ॥* ४

राजे घोरपडे घोरपडे पाहा बळीवत ॥ नाम जाईर चौमुलूखात ॥ गोविंदराव राजे त्यासी जाणती समस्त ॥ अहिल्याबाइचे कात ॥ होते रणबहिरी जसे रणशूर जनात ॥ कोपला त्यावर भगवत ॥ काय मी सागू सागू हो त्याची मात ॥ रणसग्रामी झाले शात ॥ आणि सोहिरे सोहिरे सावत ॥ राजा रामचद्र गुणिवत ॥ तयाचे वशी राजे *खेम सावत ॥ ल्क्ष्मीबाई दिली तेथा ॥ धुमाळी ॥ लक्ष्मीबाईवर ॥* फार होता बयाचा प्यार ॥ इसमत नव्हत्या क्षणभर ॥ मोठा राज्याचा घोर ॥ पुसावा समाचार ॥ धाडी पत्रे वरचेवर ॥ कसे करील इश्वर ॥ कधी एकेन *त्याचे बरे कधी ऐकेन ॥ त्याचे बरोबरी सोई ॥ त्या० ॥* ५

---

म्हणजे आघाडीचे नामवत किंवा कुळवत मोठमोठ्या मातवर कुलवान घराण्यात मुली देऊन *सोयरिका केल्या* *अमृतराव निंबाळकर*— जयाप्पाची मुलगी राजसबाइ ही पिराजी नाइक निंबाळकर दहिवावकर याच्या मुलास दिली होती. त्या मुलाचं नाव अमृतराव अमृतरावाचा मुलगा राणोजी **दादीबाई—हा राणोजीची लेक ताकपीर याजकडे दिली असावी.** "राणोजी शिंदे याचे नात् लेकीचे लेक राणोजी ताकपीर याचे पुत्र यांस कल्याण भिवडी पैकीं २००० रु. नेमणूक" दिल्याच सदाशिवराव भाऊच *ता. १५ १ १७५७* चें पत्र आहे (शिंदेशाही इतिहाससाधनें खड २ पृ ५ ले ६)

**सेनापति दिगांबर**—जयाप्पाची मुलगी, अंबिकाबाइ नावाची, राणोजी घोरपडे कापशीकर यांचा मुलगा सखाराम घोरपडे यास दिली होती सेनापति दिगांबर अस म्हटल आहे, त्यातील दिगांबर या शब्दाच मर्म काय त कळत नाही वर एके ठिकाणीं दत्ताजीबद्दल दिगांबर शब्द पाहिल्या चौकांत वापरला आहे पण तसा अर्थ येथे सभवत नाही राणोजी घोरप ड्याच दुसरें नांव दत्ताजी अस असल्यास न कळे पाहो—पहा हो! **गोविंदराव घोरपडे**—जयाप्पाची पाचवी मुलगी अहल्याबाई ही मालोजी राजे घोरपडे यांचा मुलगा गोविंदराव घोरपडे यास दिली होती हा

धर्मराज पाहा केले बाईन ॥ नित्य करी दानपुन ॥ देव देवार्चन तीन वेळां पुराण ॥ याची पुराणिक ब्राह्मण ॥ सर्वे अधिकारी चिचोरे दिवाण ॥ तयाचे हाती देणघेण ॥ विठलराव बापूवर दया पूर्ण ॥ फडणीसी वडलांपासून ॥ एकाएकीं कसें आलें बाईस दुखण ॥ उपाय चालेना कोणे गोष्टीन ॥ उदंड औषध देती वैद्य ब्राह्मण ॥ कसें केलें भगवंतान ॥ धुमाळी ॥ सामगांवा पत्र धाडिले ॥ आपासि बोलाविले ॥ त्यासी निरवानिरव केले ॥ ब्राह्मणांसि दान वांटिले ॥ गाई म्हैसी शाल दुशाल

---

गोविंदराव घोरपडे बापू गोखल्यावरोबर अष्टी येवतीच्या लढाईत पराक्रम करून १८१८ सालीं ठार झाला. मात—गोष्ट. रणबहिरी—रणशूर खेमसावंत। लक्ष्मीबाई दिली तेथ—शिंदेशाही इतिहासाचीं साधनें भाग १ ला या ग्रंथांत दिलेल्या तपशीलवार वंशावळींत वाडीच्या सावंताकडे जयाप्पाची जी मुलगी दिली होती तिचे नांव ठकाबाई (ठमाबाई पाहिजे? मोडी वाचनाची चूक?) असे दिले आहे; परंतु पोवाड्यांत तिचें नांव लक्ष्मीबाई असें दिले आहे. "महादजीचा बंधू जयप्पा शिंदे यांची मुलगी लक्ष्मीबाई ही या वेळीं लग्नाची होती. ती खेमसावंत यास मिळून शिंद्यांचा संबंध जुळला तर तो वाडीदरबारास पुष्कळच हितावह होईल असे सावंतवाडींतील मुत्सद्दी मंडळीस वाटत होते. म्हणून त्यांच्या सूचनेवरून जिवबादादाचे वडील बंधु *नरोबा यांनी हा संबंध जुळून येईल तर पहावे असे एक वेळ लिहिले होते.* इतक्यांत जयाप्पाची बायको सखूबाई शिंदे हिजकडूनहि महादजीस मुलीच्या लग्नाची तजवीज करण्याविषयीं निकडीचे पत्र आलें. तेव्हां शिंद्यांनी ही गोष्ट एके दिवशीं जिवबादादा, बाळोबा तात्या वगैरे मंडळीपाशीं काढली. जिवबादादांनीं म्हटले सावंतवाडीचे सरदेसाई खेमसावत हे कुलीन व रूपसंपन्न पुतणीस योग्य वर आहेत, मर्जीस येईल तर कोंकणांत माणूस पाठवून खात्री करून घ्यावी. त्यावरून शिंदे यांनी कांहीं लोक सावंतवाडीस पाठविले. जिवबादादांनीही ही बातमी नरोबा यांस व वाडीच्या मुत्सद्दी मंडळास कळविली. पुढे शिंद्यांचे लोक वाडीस आल्यावर एके दिवशीं दरबार भरून त्यांची भेट घेतली. त्यांनी शिंद्यांचा हेतु राजेसाहेब, त्यांची मातुःश्री व इतर मुत्सद्दी मंडळी यांस कळविला व त्यांनीही त्या गोष्टीस रुकार

पलग न्हाल्या तबक देविले ॥ ब्राह्मणाच्या हवालीं केले ॥ बाइन तीर्थ घेतल ॥ बाईनें तीर्थ घेतलें ॥ बाईने तीर्थ घेतलें सुख होई ॥ त्या० ॥ ६

पुस वद्य होती तीळसक्रात ॥ दिशा शुद्ध केल्या समस्त ॥ तुटला तारा दोपारच्या अमलात ॥ अचबा करिती जन बहुत ॥ उगवला दिन गुरुवार चहुथ ॥ राजस्वरी वैद्य आला तिथ ॥ दिल औषध औंध्याच्या देखत ॥ पाहिली नाडी धरून हात ॥ प्राण झाला व्याकूळ व्याकूळ त्या घटकत ॥ सोडले अवघे गणगोत ॥ गेला निजधामा सकूबाई श्रीमत ॥ एकच झाला आकात ॥ रोजना करी दादीबाइ ॥ म्हणे देवा झाले काइ ॥ आह्मा लोक आक्रोश करी ताईबाई ॥ निनाइ गेली टाकुनी वत्से गाइ ॥

---

दिला पुढे ती मडळी ग्वाल्हेरीस गेल्यावर त्यानी वाडीच्या मुत्सद्दी मडळीचा रुकार कळवून तेथील दरबारच्या थाटाची वगैरे तारीफ बरीच केला त्यावरून महादजी शिंदे व त्याची भावजइ सखुबाई या दोघांसहि हे स्थळ पसत होऊन शिंदाचा मूळ जहागिरीचा गाव श्रीगोंदे येथ हे लग्न इ स १७६३ त मोठ्या थाटाने झाल यावेळी खेमसावत यांच वय चौदा वर्षांचें होतें " ( सावतवाडी सस्थानचा इतिहास पान ७६, ७७ ) परतु पुढील पत्रात १७५० साली लग्न झाल्याच म्हटल आहे त्यावरून जया प्पास दोन मुली होत्या व दोघींहि सावतवाडीकराच्या घरातच दिल्या अस ठरतें जिवाजी विश्राम याच पेशव्यास पत्र न १०७ ता १३ ५ १७५० "राजश्री जयाप्पा शिंदे यांची कन्या श्रीमत राजश्री खेमसावत भोसले सरदेसाइ यास नेमस्त केली लग्नाकरिता येजमानसहवतमान श्रीगोदेस येऊन वैशाख शुद्ध ४ चतुर्थी शुक्रवारी लग्न सपादल स्वामीचा भेट घ्यावा हे सरदेसाइ स्वामीचे चित्ती बहुत होत " ( पेशवे दप्तर भा २४ पृ १०५ )

अशी ह्मणे लक्षुमीबाई ॥ कसें ह्माज बुडाले डोहीं ॥ अधकार पडला दुहीं शास्त्र पाहीं ॥ त्याच्या॰ ॥ ७

---

आहे निघाय किंवा निघाई—P great fuss or loud cry about; *a mighty stir, bustle (Molas)* मोत्सवर्थ अंधकार पडली दुही—मुळात 'अधकार पडला ग्रुही' असे असावे. शास्त्रपाही— ?

# अहल्याबाई होळकर यांचा पोवाडा

हा पोवाडा प्रभाकर शाहीराचा आहे काव्यदृष्टया तो उत्कृष्टच आहे. विशेषत "ससारी असुनि जिच्या वासना मेल्या तिजपुढे सहज मग मुक्ति उभ्या ठेल्या" ॥ हें सुभाषित कायमचे चित्तावर ठसल्याशिवाय राहणार नाही.

अहल्याबाईचा जन्म स. १७२५ साली झाला हिचे माहेरचे आडनाव शिंदे. तिचे वडील माणकोजी हे बीड तालुक्यातील चोंढे या गावचे पाटील होते. अहल्याबाईचे लग्न सुप्रसिद्ध मल्हारराव होळकराचा पुत्र खंडेराव याच्याशीं झालें खंडेरावाचा जन्म १७२३ सालचा म्हणजे या नवरा बायकोंत अवघें दोन वर्षांचे अतर होते लग्न अर्थातच तत्कालीन पद्धतीप्रमाणे पाचव्या सहाव्या वर्षीच झाले असेल

नवऱ्यापासून अहिल्याबाईला फारसे प्रेम कधी मिळाल नाही खडेरावाने दुसऱ्याहि अनेक बायका केल्या होत्या. तथापि सासरा मल्हारराव व सासू गौतमाबाई याचे तिच्यावर कमालीचे प्रेम होतें व त्यानी तिला जीव की प्राण केल

१७४५ साली अहल्याबाईस मालेराव नावाचा मुलगा झाला व त्यानतर तीन वर्षांनी मुक्ताबाई नावाची मुलगीहि झाली आपल्या सासऱ्यापासून ती सर्व राज्यकारभाराचे काम शिकलीच होती; शिवाय त्याच्याबरोबर ती अनेक मोहिमात असल्यामुळे लढायाची आणि लष्कराचीही तिला चांगली माहिती झाली होती. तिच्या वयाच्या अठ्ठाविसाव्या वर्षापासून तिने लिहिलेलीं किंवा तिला आलेली राजकारणी किंवा कारभाराचीं पत्रं दृष्टीस पडू लागतात १७५४ साली मराठ्यानी कुंभेरीला वेढा घातला. त्या वेढ्यात अहल्याबाईचा नवरा गोळा लागून ठार झाला. अहल्याबाई ही त्या स्वारींत होतीच. ती सहगमन करणार होती परतु मल्हाररावाने तिला तसें करू दिले नाहीं.

खंडेरावाच्या मृत्यूनतर मल्हारराव १० वर्षें जगला. पण त्या काळात त्याने आपला सर्व राज्यकारभार अहल्याबाईवरच सोपवून दिला होता. १७६६ साली मल्हारराव मृत्यू पावला. मरणसमयीं त्याने तुकोजी नावाच्या आपल्या नातेवाईकास सरदारकीचे काम सागितले मात्र त्यानें

अहल्याबाईच्या तन्त्रानें चालावं असं सांगून ठेवलें यांचें कारण अहल्याबाईचा मुलगा मालराव हा जरी या वेळीं २० वर्षांचा झालेला होता तरी वेडसर होता आणि पुढील वर्षीच म्हणजे १७६७ त तो वारला साराश अहल्याबाईवर सर्वत्र दुःखाची परपराच कोसळत गेली यामुळे आधीच धर्मप्रवण असलेल्या तिच्या मनाला देवधर्माचा आणि परोपकाराचाच अधिकाधिक ध्यास लागत गेला तथापि तिने राज्यकारभाराबाबत दक्षता बिलकुल सोडली नव्हती, किंबहुना प्रथम त संभाळून मगच तिने हे इतर उद्योग केले

तिची खासगी वर्तणूक आणि दिनचर्या ऋषितुल्य होती तिच्या दानधर्मामुळें तिचें नाव अजरामर होऊन राहिलें आहे जिज्ञासू वाचकानीं महेश्वर दरबारची बातमीपत्र कारकाइन वाचून पाहिलीं तरी अहल्याबाइची कर्तबगारी व महदनुभावित्व त्याना चागल प्रतीत होईल

'श्रीमत राजश्री दादासाहेबानी रेवस येथ घाट बाधला आहे त्या घाटावर बाईनीं एक देवालय बाधून श्रीपरशरामजीची मूर्तिस्थापना अक्षय्यतृतायेस केली' (महेश्वर दरबारची बातमीपत्र प न १२१ ता १५ मे १७८३ च पत्र)

" जाबाचे घाटावर तळ माउ बाधलें आहे तेथे बाइ उद्यापन करावयास वैशाख शु॥ ११ शनिवारी जाणार आ " ( महेश्वर दरबारची बातमीपत्र पत्र न ५५ ता २८ एप्रिल १७८४ च )

" ( बाई ) ओंकारेश्वरास जाणार ती राहिली धर्मध्वज हजार खादी लाऊन केला होता तो ओंकारेश्वरास पाठविला " ( महेश्वर दरबारची बातमीपत्र प न ४६ आक्टोबर १७८३ चे )

१९२३ सालीं होळकर सरकाराने देवस्थान क्लॅसिफिकेशन लिस्ट प्रसिद्ध केली व एक खास अधिकारी नेमून होळकर सरकारमार्फत देणग्या, इनामें किंवा नक्त नेमणुका जेथें जेथ चालू आहेत तथे जाऊन त्यांची चागली तपशीलवार माहिती गोळा करविली त्यात अहल्याबाई होळकरणीचा धर्मादाय पुढीलप्रमाणे—

नवीं देवळ बाधिलीं, जीर्णोद्धार कला, मूर्तीची पुन प्रतिष्ठापना केली १ पुष्कर २ हृषिकेश ३ सुलतानपूर ४ जेजुरी ५ सगमनेर राममदिर

६ पंढरपूर राममंदिर ७ चोंडीमंदिर ८ नाशिक ९ चित्रकूट १० वेरूळ घृष्णेश्वराचे तळें ११ अयोध्या १२ उज्जैन अवंतिकेचे देऊळ १३ काशी-विश्वेश्वर १४ वैजनाथ १५ सोमनाथ.

घाट बांधले ते—१ मथुरा २ हरिद्वार ३ काशी ४ पुष्पतावे ५ प्रयाग

धर्मशाळा बांधिल्या त्या—१ बद्रिनारायण, २ नाथद्वार, ३ सप्तशृंग, ४ अमरकटक

नक्तनेमणुका, इनामे वगैरे—१ मल्लिकार्जुन, २ महाकाळ, ३ ओंकारेश्वर, ४ भीमाशंकर, ५ रामेश्वर, ६ नागनाथ, ७ त्र्यंबकेश्वर, ८ द्वारावती, ९ द्वारका, १० जगन्नाथ, ११ परशुरामक्षेत्र, १२ कर्नाटकातील श्रीकाल्हाटी, १३ श्रीव्यंकटेश, १४ टोंके, १५ पैठण, १६ परळी वैजनाथ, १७ चिंचवड, १८ कोल्हापूर अंबाबाई

काशीच्या गंगोदकाच्या कावडी रामेश्वर मल्लिकार्जुन इत्यादि ३४ देवस्थानास दरसाल जातात

याखेरीज विहिरी वगैरे बऱ्याच आहेत

( इंडियन हिस्टॉरिकल रेकार्डस कमिशन व्हॉल्यूम ८ पृ १३९ ते १४३ )

---

## अहल्याबाई होळकर यांचा पोवाडा

### १८

### ( शाहीर-प्रभाकर )

सति धन्यधन्य कलियुगीं अहिल्याबाई ॥ गेली कीर्त करुनिया भुमंडळाचे ठायीं ॥ ध्रुवपद ॥ महाराज अहल्याबाई पुण्य प्राणी ॥ सपूर्ण स्त्रियामधि श्रेष्ठ रत्नखाणी । दर्शनें मोठ्या दोषाची होईल ग्लानी ॥ झडतात रोग पायाचे पितां पाणी ॥ वर्णिति कीर्ति गातात सत ते गाणीं ॥ झाली दैवदशें तीं होळकराची राणी । ( चाल ) ॥ उद्धार कुळाचा केला । पण आपला सिद्धीस नेला । महेश्वरास जो कुणी गेला (चाल) ॥ राहिला तेथे जो जाऊन घेऊन बापभाई । ससार चालवी दीन दुबळ्याची आई ॥ १

प्रत्यहीं यावीं ब्राह्मणास दशदानें । ऐकावी पुराणें बहुत आनदानें ॥ शोभती होमकुंडें द्विजवृन्दानें । टाकिती हजारो नेमाने अवदाने । + + + + + + + + + ॥ चाल ॥ कधीं कोटि लिंगें करवावी । वधुवरे कधीं मिरवावी ॥ अर्भका दुधें पुरवावीं ॥ चाल ॥ पर्वणी पाहुनि दान देतसे गाई । जपमाळ अखंडित हातीं वर्णु काई ॥ २

जेथें ज्योतिर्लिंगे जेथें तीर्थें महाक्षेत्रें । घातलीं तेथे नेहमी अनछत्रें ।

---

दोषाची होईल ग्लानी—दोष कमी होतील. पापे झडतील. झडतात रोग पायांचे पितां पाणी—तिच्या पायांच्या तीर्थोदकानें पापाचे म्ह. पापी लोकाचे रोग नाश पावतील. पण—निश्चय. दशदानें—गाय, जमीन, तीळ, सोनें, तूप, वस्त्र, धान्य, गूळ, मीठ व घर यांचीं दाने अवदान—एका आहुती पुरतें होम द्रव्य. म्हणजे ब्राह्मण हजारो आहुत्या वाकून वाकून अग्नींत टाकत आहेत. वधुवरें कधीं मिरवावीं—भावार्थ गोरगरिबांचीं धर्म लग्न वगैरे करवून द्यावी किंवा बालकृष्ण आणि तुळस यांचे लग्न खऱ्या लग्नाप्रमाणें समारभ करून लावावे अन्नछत्रें—"गगाजल निर्मल मातुःश्री अहल्याबाई यांची कीर्ति धर्मामुळें व जागोजाग अन्नछत्रें व देवालयाचे घाट व धर्मशाळेचे कारखाने चालतात त्यामुळे विस्तृत आहे व कैलासवासी सुभेदार याचा लौकिक त्यांनी आईकीला पाहिला आहे." [ इ. स. सन १७८५ लेखांक ६८ Selections from Chandrachuda records ].

ज्यास आली जरा झाली कांही विकळ गात्रें । पुरवावीं त्यास औषधें वस्त्र पात्रें । कितिकांनी घेतली स्मार्तअग्निहोत्रें । दिलीं स्वास्थे करून त्या भटांस क्षणमात्रें ॥ चाल ॥ आधिं इच्छा भोजन द्यावें । उपरातिक तीर्थ घ्यावें । वाढून ताट वर मग न्यावें ॥ चाल ॥ जेविल्या सर्व मग आपण अन्न खाई । रघुवीर चरित्र ती रात्रिस गाई ॥ ३

यात्रेकऱ्याला वाटी पंचेजोडे । कोणास आगरखे कोणास घोतर जोडे । कोणास दुशाला कोणास बटू घोडे । गवयास मिळावे सुवर्णकठी तोंडे । + + + + + + + + + । घाली गिऱ्हाशाचे पायांत बेड्या खोडे ॥ चाल ॥ बांधिले घाटमठ फार । कुठे शिवास सतत धार । कुठे वनात पाणी गार ॥ चाल ॥ त्यासाठी मुशाफर् कायें धावत जाई । विश्रांत पावती पाहुन आमराई ॥ ४

किती ग्रहणसधींत तिलतुला त्या केल्या ॥ कधीं कनक रौप्य आणि कधीं गुळाच्या भेल्या ॥ साभाळ करून काशीस यात्रा नेल्या । कावडी शतावधि रामेश्वरीं गेल्या । ससारीं असुन तिच्या वासना मेल्या । तिजपुढे सहज मग

---

स्वास्थ्ये—स्वास्थ्य—नेमणूक, पेन्शन. क्षणमात्रें—तावडतोब. दुशाला—A humble shawl शालजोडी. बटु बट—पु लहान पण, वळकट शिंगरू, तट्टू, A strong and well made kind of pony. गिराशी—पु गुजराथी दरोडेखोर (डोंगरातला) गुळाच्या भेल्या—भेली, भेला—ढेप, रास कधीं सोन्याच्या कधीं रुप्याच्या, कधी गुळाच्या ढेपाच्या तुला केल्या ऐपतीप्रमाणे वाटेल त्या पदार्थांची तुला करता येते सभाळ करून काशीस यात्रा नेल्या—पूर्व काळीं काशीयात्रा करणे, प्रवासाच्या अडचणींमुळे फार कठीण असे वाटेंत चोऱ्या, लूटमार यांची भीति तसेंच निरनिराळ्या प्रांतात निरनिराळे सस्थानिक यामुळे दस्तके मिळवावी लागत व ते सामान्य मनुष्यास कठीण. यामुळे एखादा श्रीमत किंवा सरदार मनुष्य काशीयात्रेस निघे तेव्हा त्याच्याबरोबर अनेक गरीब किंवा मध्यम लोक सोबतीने आपली यात्रा उरकीत मोठ्या सरदाराची यात्रा म्हणजे सैन्य, बाजार, वैद्य वगैरे सारी सोय असे माचकानीं खरे शास्त्र्यांनी आपल्या ऐतिहासिक लेख सग्रहात गोपाळराव पटवर्धनाची बायको सरस्वतीबाई हिच्या काशीयात्रेसबधानें अनेक पत्रे छापिलीं आहेत तीं किंवा पेशवे दतरात पेशवे कुटुंबातील स्त्रियाच्या

सुचि सभ्या ठेल्या ॥ चाल ॥ कवि गंगु हैबती म्हणती पुण्याची कोण करील गणती । राज्यास होती पडपण तीं ॥ चाल ॥ महादेव गुणिच लक्ष तिचे पाई । कवनात प्रभाकर करितसे चतुराई ॥ ५

---

काशीयात्रावर्णनाचीं पत्रं छापिलीं आहेत तीं पद्यावींत. पडपण, पडप— स्त्री शोभा शृंगार, आवरण, प्रतिष्ठा. पडप म्हणजेच पडपण. भावार्थ— अहल्याबाई मराठेशाहीस अलंकारासारखी होती.

# धुळपांचे पोवाडे

धुळप मंडळी प्रथम आंग्र्याच्या पदरीं आरमारांत सरदारकी करीत असत १७५५–५६ सालीं पेशव्यांनी आंग्र्याविरुद्ध मोहीम केली, व तुळाजी आंग्र्यास दस्त करून त्याचा नायनाट केला त्या वेळपासून धुळप मंडळी पेशव्यांच्या लगामीं लागली उदगीरच्या मोहिमेस भाऊसाहेब पेशवे निघाले त्यावेळीं त्यांनी स्वारीसाठी रुद्राजी धुळप व जानोजा धुळप यांना जमावानिशी बोलाविले होते असे पेशवे दप्तर भाग ४५ पृ ९९ व्या वराल ३ डिसेंबर १७५९ च्या नोंदीवरून दिसते त्याच नोंदीवरून त्या साली विजयदुर्गचा सुभा नारो त्र्यंबक होता असेही कळते

नारो त्र्यंबकानंतर विजयदुर्गचा आरमारी सुभा धुळपांकडे गेला पहिला सुभेदार रुद्राजीराव धुळप होता १७६३ सालीं त्यानं हैदराच्या होनावर बंदरांत पेशव्यांचे आरमार उतरून तेथे हैदरास पुष्कळ त्रास दिला रुद्राजीरावाचा सुभा १७७० सालीं निघाला या रुद्राजीरावाचाच मुलगा सुप्रसिद्ध आनंदराव धुळप हा पुढे १७९५ सालापर्यंत विजयदुर्गच्या पेशव्यांच्या आरमाराचा मुख्य सुभेदार होता आनंदराव धुळपाबरोबर त्याच्या घरातले दहापाच पुरुष मदतीस असत व तेहि सर्व नामांकित योद्धे होते त्यांपैकींच हरबाजीराव व जानराव होत



व्यवस्थित दिले असल्यामुळ त्यावरून येणारी इग्रजी १४ डिसेंबर हीच तारीख खरी मानली पाहिजे पोवाड्यांत वर्णिलेल्या गगावतरणाच्या उल्ले-खाला राजापुर गगामहात्म्यांतही प्रत्यतर मिळालेलें आहे.

या पोवाड्याच्या दोन प्रती उपलब्ध आहेत एक शितूताच्या पुस्तकांतील व दुसरी दळवी यांच्या मराठा कुळाच्या इतिहासातील त्यातील पाठभेदाचा तक्ता पुढीलप्रमाणे—

| शितूत प्रत | दळवी प्रत |
| --- | --- |
| १ हटी मूत गोमटी | १ हटी मूर्त गोमटी |
| २ वक्र भयासुर | २ वक्र भयासूर |
| ३ वीर मारुती वीर उदार | ३ वीर मारुती वीर उदार |
| ४ तुरा शोभतो | ४ उरा शोभतो |
| ५ घोडा अचपट होता | ५ घोडा अचाट होता |
| ६ मनवर येती | ६ मजवर येती |
| ७ तुटून हे पडले | ७ उठून हे पडले |
| ८ आडास आले | ८ आडस आले |
| ९ मोठी झामाझीम झाली | ९ मो कमा झीम याली |
| १० रागे न फिरे मागे काय अनर्थ घडले ! | १० रागे न फिरे मागे काय घडले ! |
| ११ सत्यसाच्या | ११ सत्तसाच्या |
| १२ आहाट करिती | १२ आहा करिती |
| १३ भाव पाहुनी धावे | १३ भाव वाहुनी थावे |
| १४ जाया भगासी घर सुन | १४ जाया भगासी घरे सुनी |
| १५ तुटे आयुष्य उठे सोडी हरबाजीराव प्राण | १५ कुटे आयुग्य उटे सोडी हरबाजीराव प्राण |

---

# हरबाजीराव धुळपांचा पोवाडा

## १९

### ( शाहीर बापू गोंरकर )

पुण्यप्रतापी धन्य जगामधि धुळप राव हे की ॥ रणबाहादूर हरबाजीराव थरथराट जनलोकीं ॥ ध्रुवपद ॥

हटी मूर्त गोमटी भोळेशंकर बोलण्यात ॥ वक्र भयासूर पाहतां कप भरे शरीरांत ॥ धुद कैफम बुद्धी अकडबाज शोभिवत ॥ दिसे सावळी तनू दोंद गणपतीचे दिसण्यात ॥ वीर मारुती वीर उदार कर्ण तसे देत ॥ कडक स्वारी तडक जिलेबी चाले यशवंत ॥ तुरा शोभतो कुरा जयाची मोठी दहशत ॥ साह्यकारी आनदराव मर्यादा पाळीत ॥ भैरी भूपाळ गैर भापण सोय लाविती की ॥ रण० ॥ १

रग विलासी दग इमानी खातर धन्याची ॥ ऐका श्रीमताचा घोडा अचाट होता ॥ धनि ऐकती कर्णी कीर्ति बसणार रावजीची ॥ वडा खकाळ

---

थरथराट—थरकाप हटी—निग्रही ( आटीव तर नव्हे ) भाटाव-कसलेली. भयासूर—भयकर, उग्र दोंद—पोट वीर मारुती—मारुतीप्रमाणें शूर ' दास मारुती ' ' वीर मारुती ' असे मारुतीच्या ध्यानाचे प्रकार आहेत त्यापैकी वीर मारुतीप्रमाणे उग्र वीर—हिं. A hero तसे देत—उदार, दानशूर कर्णासारखे दाते आहेत. जिलेबी—परिवार. कुरा कुर्रा—नखरा, अमड. तुरा मोठा अकडबाज दिसतो. साह्यकारी—साहाय्यकारी. भाहिरी भुपाळ गैर इ. भाहिरी—शूर. गैर—गैर, याचा कोशात सापडणारा अर्थ घेऊन जुळत नाहीं. तो शब्द गैर नसून गौर असा असावा गौर या शब्दाचा अर्थ खोल व पूर्ण विचार, काळजी असा आहे. ( पट. ) येवढे आनदराव धुळप तेही त्याची मर्यादा पाळतात व भहिरी भुपाळ ह्या मोठे मोठे रणशूर राजे महाराजेही त्याच्याशीं फार काळजीपूर्वक विचार करूनच बोलतात किंवा गौरवपूर्वक बोलून आपापलीं कामें साधून घेतात. भापणें सोय लाविती की—सोय लावणें मतलब साधणें, काम करवून घेणें. रंग विलासी दंग—इ० हरबाजीराव रग विलासात दग होते तरी धन्याशीं पूर्ण निष्ठावत होते अशी धन्याची खातर ह्म. खातरजमा होती. श्रीमंतांचा—पेशव्याचा. अचाट—प्रचड, उरछूपळ (अचपट शितूतप्रत). कीर्ति बसणार राव-

घोडा त्यावर उडून बसले जी ॥ दिला सपाटा त्या घोड्याची खोड मोडली जी ॥ ख्यात जयाची विख्यात निशा जाहली खावंदाची ॥ शिरपेच घोडा बक्षिस दिला तेधवा जी ॥ भगवताचे लाल खरे सर्व मानिती कीं ॥ रण० ॥ २

बाहादूर हे पाहा यशस्वी जरीपटका झुले ॥ जयगडच्या बाऱ्यावर मनवर येती मुंबईवाले ॥ जोर इंग्रजी थोर अगावर तुटून हे पडिले ॥ नांगर सोडूनी खासे झुजासाठी आडीस आले ॥ भांडी पेटविता साडी गर्भ साठाचे गोळे ॥ मोठी झीमाझीम जाहाली कडाड तोफाचे सुटले ॥ रागे न फिरे मागे काय अनर्थ घडले ॥ पटपट मुडदे पडता मनवर निघूनिया गेले ॥ अशा किती एक गलिमा मारूनी हटविती कीं ॥ रण० ॥ ३

जीत देवही भीत वृत्तांत ते गंगेवरचा ॥ आली नव्हती गंगा कुंडामध्ये सत्य साच्या ॥ आहाट करिती बोभाट ब्राह्मण वेदघोष त्याचा ॥ जय मातोश्री गंगा उपाय हरे सकळाचा ॥ जसा भगीरथे सहास करार

---

जी.ची—हरबाजी घोड्यावर बसण्यांत फार तरबेज आहेत असा लौकिक. उत्तम चाबुकस्वार आहेत असा लौकिक. खंकाळ—उच्छृखळ. सपाटा—तडाखा. ख्यात—कीर्ति, आख्या. निशा—खात्री. खावंदाची—पेशव्यांची. बाऱ्यावर—बारा—The space opposite or contigious to the mouth of a harbour, or any particular position of a coast. The word often answers to offing ( मोल्स ). मनवर—(Man of war) एक लढाऊ जहाजाचा प्रकार. भांडी—तोफा. गर्भ साठांचे—गर्भछाटाचे. गर्भछाटी हा एका आरमारी बदुकीच्या गोळ्यांचा प्रकार आहे. ( मराठ्यांचें आरमार पारसनीस ) गर्भसाठ किंवा गर्भछाट हा ग्रेव शॉट या इंग्रजी शब्दाचा अपभ्रंश आहे झीमाझीम—घनचक्कर. गलिमा—गलिया, गॅल्यों या शब्दाचा अपभ्रंश, ग्याली हा एक जहाजाचा प्रकार आहे. 'गलिमा' म्ह. 'शत्रूना' असाहि अर्थ घेता येईल. व्रतात—वृत्तान्त. आहाट—आहट गलबला, गोंधळ. हा हिंदी शब्द आहे. आहाट—हाच शब्द आट असाही वापरीत. आट किंवा आहाट ह्म. आकात 'त्यांचे घरीं मुला माणसाचा खपांपणाने आट झाला.' ( इ. स. ऐ. स्फु. लें, पृ. १४ ) सहास—

केला शरीराचा ।। नये माउली गगा उपाय हरे सकळाचा ॥ त्या गायमुखा खाली बसका रावजीचा ।। म्हणती आता देणे लाभ तुझ्या दर्शनाचा ।। बाहू लागल्याविना उठेना धट निश्चयाचा ।। भाव पाहुनी धावे गोमुखीं वाहे लोट गंगेचा ।। केल स्नान दक्षणा वाटती हर्षयुक्त ब्राह्मणासीं ॥ धन्य धन्य अवतार मानिती आश्चर्य म्हणती हे आवतारी कीं ॥ रण० ॥ ४

राव साजते नाव जोडा हो रामलक्ष्मणा ॥ आनदराव हरबाजीराव धुळप बधु जाणा ।। धन्यानी जावे पुण्यास असे आले घडोन ॥ गेल्यावर दुष्काळ कोंकणीं पडला येवोन ।। मेले कितीक गेले जाया भगासी घर सुन ।। एक निष्ठ पुण्याहुनी सहाव वर्षी आले फिरोन ॥ जेव्हा पाहिली तेव्हा स्वारी गेली हौसेने ॥ धरोन आणिली बोट तादूळ देती आनदान ॥ चाल ॥ अन्नवस्त्र विपुल जाहले दुष्काळ पळाला कीं ॥ रण० ॥ ५

वर्णितात हो करणी ज्याची श्रीमत असून ॥ सनाशसत्रात आल घडोन ॥ तुटे आयुष्य सोडी हरबाजीराव प्राण ॥ मार्गशीर्ष शुद्ध तृतीया उत्तराषाढा जाण ॥ मृत्यु येई हा भृत्य शिवाचा सोमवार धन्य ॥ दोन प्रहरीं वैकुंठी आत्मा गेला निघोनी ॥ घोळकार कल्होळ पडे आभाळ कोसळोना ॥ दादा बापू काकी गेली मर्च्छित होऊनी ॥ शुद्ध बुडाली बुद्ध मेरु तो गेला खचोनी ।। मोठा आकात झाला वाईट केले ईश्वराने ॥ जगातील ही सर्व रडती बापू कष्टी जो कीं ॥ रण० ॥ ६

---

साहस, धाडस  करार—निश्चय  करार केला शरीराचा—शरीर अपण करण्याची प्रतिज्ञा केली  नये माउली गगा—राजापूरच्या कुडांत गगा आली नाहीं  बसका—बैठक  धट—दृढ  धन्यानी—हरबाजीरावानी  जाया भगासी—जाया निरुपयोगी जायबंदी भगास किंवा भगास—उजाड किंवा उध्वस्त  भगसाळ—भयाण वाडा, भगासी—हें घराचे विशेषण जाया हे लोकाचे विशेषण  फिरोन—माघारे वर्णितात—वानितात, स्तुति करतात  कुटे—खुटे, खुटे अस तर नव्हे ।  भृत्य शिवाचा—शिवभक्त, या शिवभक्ताला सोमवारीच *मृत्यु आला तेव्हा तो धन्य*  *भृत्य—किंकर, सेवक*  *घोळकार*—गोंधळ कल्होळ ( गोलस )  बुद्ध मेरु—बुद्धीचा महामेरु

# सवाई जानराव धुळपाचा पोवाडा

या पोवाड्याच्या दोन प्रती उपलब्ध आहेत. पहिली प्रत शितूत यांच्या पोवाड्याच्या संग्रहात छापलेली व दुसरी प्रत गोपाळ दाजीबा दळवी कृत मराठा कुळाचा इतिहास या पुस्तकात छापलेली हे दोन्ही पोवाडे एकाच दतरांतून म्हणजे विजयदुर्ग येथील धुळप इनामदाराच्या संग्रहातील एकाच वहीवरून दोन्ही संपादकांनी उतरून घेतले, पण तरीही त्या दोघांच्या नकलांतून पुष्कळच अशुद्ध लेखन आणि त्यामुळे अपपाठ निर्मिति झाली आहे. त्याचा तक्ता पुढीलप्रमाणें—

| शितूत प्रत | दळवी प्रत |
|---|---|
| १ सवाई जाणराव धुळप मोहरा विजयदुर्गाला । नित्य वाजतो चौघडा राशा वाड्याला ॥ ध्रु. ॥ | १ दळवी प्रतींत ध्रुपद दिलेलेच नाही |
| २ या तळेराव कोकणामध्य आगरा होता । | २ या तळेकोकणामधि आंगरा होता जी । |
| ३ दुरून काय हवा दिसतो जजिरा । | ३ दुरून कोट हा दिसतो जजिरा जी । |
| ४ एक ख्याती केली | ४ येक आखा केली |
| ५ चोहीं बदरीं धाक लाविला | ५ चोहीं बदरीं घाला लाविला |
| ६ पुढे चालती बैराग जरीपटका | ६ पुढ चालती बैरागी जरीपटका |
| ७ हरबाजीराव हे कुळीं दीप लागला | ७ हरबाजीरावाचे कुळीं दीप लागला |

या दोन प्रतींची तुलना करून बरे वाटले ते पाठ स्वीकारून पोवाडा नक्कलून पुढे दिला आहे.

# सवाई जानराव धुळपांचा पोवाडा

## २०

## (शाहिर—बापू गीरकर)

सवाई जानराव धुळप मोहरा विजयदुर्गाला जी ॥ *नित्य* वाजतो चौघडा खाशा वाड्याला जी ॥ धृ. ॥ या तळे कोकणामधि राव आगरा होता जी ॥ त्याणे विजयदुर्गाचा पाया घातला जी ॥ ह्या कणक्या गोव्या पति सारग दुर्गाला जी ॥ दुरून कोट हा दिसतो जजिरा जी ॥ १

ह्या किल्याची सागतो मात घ्या ऐकून जी ॥ हा विजयदुर्ग पिंजरा दिसे त्रिभुवनी शोभिवत जी ॥ अेक अल्या केली रुद्राजीराव धुळपाने जी ॥ चोही बदरी धाक लाविला भल्या मर्दाने जी ॥ २

रामलिंगाची दया धुळपरायाला जी । त्याने आरमाराचा सुभा दिला

---

*सवाई जानराव*—एकाच नानाची दोन माणस एकाच वशात झाली म्हणजे खालच्या पिढीतील त्या नावामागे सवाई हें उपपद लावण्याची पद्धती असे. जसे माधवराव, सवाई माधवराव, जनकोजी, सवाई जनकोजी दुसऱ्या बाजीरावालाहि सवाई बाजीराव असें क्वचित म्हणत असत. जानरावाच्या आजाचे नाव जानरावच होतें म्हणून त्याला सवाई जानराव म्हणू लागले इग्रजींत एडवर्ड दि फर्स्ट किंवा एडवर्ड दि सेकड असें म्हणण्याचा प्रघात आहे तसाच हा इकडला देशी मराठी प्रघात होता. *ह्या कणक्या गोव्या इ.*—आग्ऱ्याने विजयदुर्गाप्रमाणेच कनकदुर्ग, गोवागड, सारगगड वगैरे किल्ले्ही बाधिले. कोट हा—जजिरे विजयदुर्गाचे कोट. मात—ख्याती, वैशिष्ट्य पिंजरा—श्रीयुत ना गो. चापेकर यानी श्रमपूर्वक जमविलेल्या नाविक शब्दकोशात पिंजरी म्हणजे बावटा उभारण्यासाठी केलेली चौकट असा अर्थ दिलेला आहे पोवाड्यातील पिंजरा व ही पिंजरी एकच होत भावार्थ, विजयदुर्गाच्या किल्ल्यावरून फडफडणारा आग्ऱ्याचा झेडा लाबवर दिसून येई अल्या—ख्याती, कीर्ति रुद्राजीराव—हा आनदराव धुळपाचा बाप १७५६ साली तुळाजी आंग्र्यास बुडविल्यावर काही दिवसानी पेशव्यानी रुद्राजी धुळपासच विजयदुर्गचे आरमारी सुभेदार नेमले रामलिंग—धुळपांचे

तयाला जी ॥ पुढे चालती बैरागी जरीपटका आघाडीला जी ॥ दोन ढाला शिरी बांधिला मंदिल जरी पटका जी । डोईवर छत्र दिसे राज मोहरा जी ॥ असा रामलक्ष्मणाचा जोडा दोघाचा जी ॥ ३

हरबाजीरावाचे कुळीं दीप लागला असे जी । जसे काशीमध्ये सूर्यबिंब उगवला जी ॥ त्याने आरमाराचे तोफेचा भडिमार केला जी ॥ लोकाला सागर वाटली आनंदाने जी ॥ बापू गीरकर शेवक गातो सभेला जी ॥ डफावर लाविला कलगी भगवा फरारा जी ॥ ४

---

कुलदैवत. बैरागी—बैरखी असे पाहिजे. मूळ शब्द अरबी, बैरक असा आहे. त्याचा अर्थ निशाण किंवा झेंडा. जरीपटका—जरीपटक्याचें निशाण. हें निशाण छत्रपतींकरिता म्हणून पेशव्यांनी प्रत्येक सरदारास एकेक स्वतन दिलेले असे. याखेरीज प्रत्येक सरदाराचें स्वतःचें म्हणून स्वतंत्र निशाण असेच. ढाला—मूळ शब्द ढाल–निशाण "मोगलावर दिल्यारे ढाला पुण्याबाहेरी" मंदिल जरिपटका—भरजरीचा मदील म्हणजे रुमाल राजमोहरा—राजबिंडा. रामलक्ष्मणाचा जोडा—आनंदराव धुळप व त्याचा चुलत भाऊ हरबाजी धुळप. कुळी दीप लागला— हरबाजीरावास पुत्ररत्न झालें. जसें काशीमध्यें सूर्यबिंब उगवलाजी—जसें आकाशामध्यें सूर्यबिंब उगवलेजी असा मूळ शुद्ध पाठ असला पाहिजे, तोफेचा भडिमार—पुनर्जन्मोत्सवानिमित्त तोफा सोडल्या. भगवा फरारा—भगवें निशाण.

# गायकवाडांचे पोवाडे

## ऐतिहासिक माहिती

या पोवाड्यांत पुणे आणि बडोदे यांची गमतीदार तुलना अनंत-फंदीने करून दाखविली आहे. साम्य शोधण्याच्या भरांत कित्येकवेळां त्याच्या हातून अनुचितपणा वा अतिशयोक्तीही झाल्यासारखी कोणास वाटेल. उदाहरणार्थ–" इकडे नाना फडणीस तिकडे सिताराम दिवाण-गाजी " तथापि एकंदरींत शाहिराने साम्य मोठ्या मजेदार तऱ्हेने दाखविले आहे. एके ठिकाणी " इकडे मारुती तिकडे रेती। हाच फेर जमिनी माजी " असे सांगितले आहे ते वाचून मात्र हंसू आल्याखेरीज राहणार नाहीं ! मेघडंबरीबाबत मात्र अगदी पुणे-बडोद्यांत तंतोतंत साम्य आहे एवढे खरें. नाना फडणविसांनी सवाई माधवरावासाठीं मेघडंबरी नांवाची एक सुंदर इमारत बांधविली होती बडोद्यांतही मेघडंबरी याच नावाची एक इमारत आहे.

सयाजीराव गायकवाड हे गोविंदराव गायकवाड यांच्या चौथ्या स्त्रीचे पुत्र. यांचा जन्म बडोदें येथे वैशाख शु. ९ संवत् १८५६ रोजीं झाला. याच्या जन्मानंतर पांचसहा महिन्यांतच त्यांचे वडील वारले. नंतर त्यांचे सापत्न वडील बंधु आनंदराव गादीवर आले. आनंदरावाचे धाकटे बंधु फत्तेसिंगबाबा यांस इंग्रजांनी पुण्याहून सोडवून आणून त्यांना प्रतिनिधि नेमलें; व त्यांच्या नांवाने कारभार चालू केला. आनंदरावाचा कारभार कुलमुखत्यारीने पाहणाऱ्या फत्तेसिंग बाबाकडेच राजपद जाणार हें ठरलेलें होतें. फत्तेसिंगबाबा तडफदार व कर्ते होते दहाबारा वर्षे त्यांनी प्रतिनिधिपद सभाळलें. पण दुर्दैवाने वयाच्या बावीसाव्या वर्षी ता. २३ जून १८१८ रोजीं ते एकाएकी मृत्यु पावले. ( Historical selections from Baroda State Records Vo. 5 ) " यादी चिरंजीव फत्तेसिंगराव गायकवाड यांचा ज्येष्ठ व॥ ५ मगळवारीं छ १८ माहे शाबान सन तिसा आशरचे तेरखेस काल झाला, [ २३-६-१८ १८ ] नंतर कारभाराची वस्त्रें चिरंजीव रा. सयाजीराव गायकवाड यांस दिली. मिर्ती छ १४ रमजान आषाढ व॥ २ [ १९-७-१८१८ ] [ बडोदे राज्य दप्तरांतील ऐतिहासिक वेचे खंड ५ नबर १८२ ]

फत्तेसिंगाच्या मृत्यूनंतर प्रतिनिधिपदाकरिता सयाजीरावाखेरीज दोन नवे हक्कदार पुढे आले, एक फत्तेसिंगबाबाच्या ज्येष्ठ पत्नीने दत्तक घेतलेला पोरवयी गोविंदराव व दुसरा आनंदरावाच्या तक्ताबाई नावाच्या उपस्त्रीचा मुलगा बलवतराव पण इग्रज सरकाराने सयाजीरावासच प्रतिनिधिपद दिलें. पुढल्याच वर्षी आनदराव आपल्या व्यसनात निमग्न असता ता. २ ऑक्टोबर रोजीं कैलासवासी झाले व ओघानेच सयाजीरावास राजपद मिळाले २८ वर्षे राज्य करून ता २७ डिसेंबर १८४७ रोजी सयाजीरावाचे देहावसान झाले

# फत्तेसिंग गायकवाडांचा पोवाडा

## २१

### (शाहीर—अनंत फंदी)

पुण्यात बाजीराव बडोद्यामध्ये फत्तेसिंग महाराजे। उदार स्वामी सेवक त्याना कणाची उपमा साजे ॥ ध्रु ॥

इकडे अमृतराय वडील तिकडे बाके आनदराव दादा। इकडे प्रभु बाजीराय तिकडे फत्तेसिंग साहेबजादा। इकडे अप्पासाहेब तिकडे महाराज सयाजी उमदा। इकडे पाच–चार वाडे तिकडेही तसाच महाल जुदा ॥ इकडे स्वामी चाकरीस पलटण तिकडे सेवक इग्रेज ॥ पुण्यात० ॥ १

इकडे स्वार शिपाई तिकडेही तसेच थोडेबहुत। इकडे श्रावण मासी दक्षिणा तिकडेही धर्म होत। इकडे आल्यागेल्याचा आदर करितात यथा स्थित श्रीमत। तिकडेही जो आला कुणि जन तो नाही गेला रिक्तहस्त। इकडे पेशवे तिकडे गायकवाड उभयता शिरताज ॥ पुण्यात० ॥ २

इकडे भरगच्ची पाघुरण तिकडेही याहून चढी। इकडे अन्नशातीचा तडाखा तिकडेही चालू खिचडी। इकडे आदितवार बुधवार तिकडे माडवींत घडामोडी। इकडे मुळामुठा तिकडे विश्वामित्रा जोडी जोडी। इकडे तलाव पर्वतीचा तिकडे सुरसागर नांव गाजे ॥ पुण्यात० ॥ ३

---

साहेबजादा—राजपुरुष पाच चार वाडे—पाच चार स्त्रिया श्रीमत किंवा सरदार लोकाच्या बायकाचा वाडा पहिला, वाडा दुसरा असा उल्लेख करितात महाल याचाही अर्थ राणी असा होतो महाल पहिला महाल दुसरा असेहि राजाच्या राण्याचा उल्लेख करिताना म्हणतात. 'वाडे' म्हणजे राजवाडे असा अर्थ घेतला तरीहि शोभेल कारण बाजीरावाचे शनिवार, शुक्रवार, बुधवार, विश्रामबाग असे चार राजवाडे होतेच जुदा—वेगळा, निराळा, पलटणें—इग्रज पलटणें इग्रजाशीं झालेल्या तहामुळे पदरी बाळगावी लागलेली इग्रज पलटण शिरताज—शिरोलकार, शिरोभूषण, मुकुटमणा पाघुरणें—पोषाक, वस्त्रें, अर्थात् श्रीमत पेशव्यानी दिलेला किंवा देतात ती याहून चढी—याहून सरस माडवींत घडामोडी—माडवी ही प्रसिद्ध व्यापारी पेठ तेथें

इकडे भूमीवर आयरण तिकडे रेतीमुळे घरोघर खाटा । इकडे पैका पुष्कळ तिकडेहि सुवर्णाच्या लाटा । इकडे जुना वाडा तिकडे लहरापुऱ्याचा बोभाटा । इकडे पुरणवरण तिकडे चुरमा क्वचित वरटापाटा । इकडे पैठणी ल्फफे तिकडे उशाजवळ अमदाबाद ॥ पुण्यात० ॥ ४

इकडे हत्ती–घोडे–पालख्या तिकडहि कमती नाही । इकडे राव बाजा तिकडे फत्तेसिंगाची द्वाहीदुराइ । इकडे जोगेश्वरी तिकडेही दैवत वेचराइ । इकडे देवस्थान तिकडेहा तशीच सागू काइ । इकडे लोक दाक्षिणा तिकडे गुजराथी न्यारा मिजाज ॥ पुण्यात ० ॥ ५

इकडे उत्साह गणपतीचा तिकडे तशीच चपापष्ठी । इकडे हरदासाच्या विदाग्या तिकडे तशाच भरमुष्टी । इकडे मघडबरी तिकडेहा तशाच

---

इकडच्या रविवार–बुधवारसारखी घडामोड चालते लाटा—चिपा इकडे जुनावाडा—शनिवारवाडा असावा जुनावाडा म्हणण्याचे कारण दुसरा बाजाराव शनिवारवाड्यात राहात नसे लहरी पुरा—रावजी आप्पाजाचे पत्र १७ डिसेंबर १८०२ ' प्रात:कालापासून इंग्रजांनी तोफ मारिला नाही अरबाना लहरापुरावरील तोफ सोडितात माणसे इंग्रजांचा फार बदुखीच्या गोळीने जखमी होतात ( बडोदें राज्यांतील ऐतिहासिक वेंचे खंड ४ पत्र नं ५८ ) चुरमा—चुटिया चुरमा–खुसखुशीत इरोळ्या चुरून त्यावर तपसाखर वर घालून केलेला लाडू क्वचित् वरटापाटा—लाडू हेच मुख्य पक्वान्न असल्यामुळे पुरणप्रमाणे पाटा–वरवंट्याचे क्वचितच काम पडावयाचे ल्फ्फा—Gold or silver cloth (Mols) तिकडे उशाजवळ अमदाबाज—इकडे ज्याप्रमाणे पैठणचे लफ्फे आहेत त्याप्रमाणे तिकडे बडोद्याजवळ अहमदाबादचे कापड प्रसिद्ध आहे. दुराही किंवा दुराइ—दवंडा, ग्वाही, ताकीद काई—किती न्यारी मिजाज—येथे मिजास या शब्दाऐवजी चुकीने मिजाज शब्द पडला असावा मिजास – डौल एट मिजास– प्रकृति भरमुटी—बडोद्यातील दक्षिणेपैकीं एक प्रकार मघडबरी—The moon

पहा जा दृष्टी। इकडे ओंकारेश्वर तिकडे मुक्तेश्वर नवीच सृष्टी। इकडे दिग्गज पाहिलवानं तिकडे जेठी कुस्त्या रोज ॥ पुण्यांत० ॥ ६

इकडे नाना फडणीस तिकडे सिताराम दिवाण गाजी। इकडे पंत सदाशिव तिकडे शास्त्री गंगाधर दाजी। इकडे बागमळे तिकडेहि हराजिनस होती भाजी। इकडे माती तिकडे रेती, हारफेर जमिनी माजी। इकडे हौद पाण्याचे तिकडे कुव्यावर मोठी मौज ॥ पुण्यात० ॥ ७

इकडे राव बाजी पंढरीस आषाढी यात्रे जातात। तिकडे विसा कोशावर ठाकुरजी पंढरीनाथ। इकडे गंगा जवळ तिकडेही तसेच रेवा-तीर्थ। इकडे तसाच तिकडे घटाव दोन्हीकडला यथार्थ। इकडे कडे न तोडेवाले तिकडेहीं तशीच लहज। इकडे आनंदफंदी तिकडेही जाऊन आला सहज ॥ पुण्यात ॥ ८

---

building of the शनवारवाडा consisted of the six storeys and it is said that the spire of the Alandi temple could be seen from the upper-most terrace of this building. Sawai Madhavrao Peshwa used to enjoy a beautiful view of the Parvati Temple and of the city from the terrace of his मेघडंबरी room and often spend evening hours looking at the stars in the sky through a telescope which was presented to him by Charles Malet" (Poona in Byegone days Page 4.)

*पहा जा दृष्टि*—आपल्या डोळ्याने पाहून खात्री करून घ्या. *पंत सदाशिव*—सदाशिव माणकेश्वर *हारफेर*—'हाच फेर' पाहिजे. मोडींत च आणि र यांचा घोटाळा होतो. तथापि 'हारफेर' असाहि शब्द आहेच त्याचा अर्थ फरक *कुवा*—आड, विहीर. *घटाव*—घटना. *यथार्थ*—एकसारखा. *न*—आणि.

# थोरले सयाजीरावांचा पोवाडा

## २२

### ( शाहीर—प्रभाकर )

धनी सयाजी महाराज धुरंधर भाग्यवान भूपती । स्त्रियापुत्रसहवर्तमान ते भोगितात संपती ॥ ध्रु० ॥

प्रौढ प्रतापी शाहू छत्रपति सिंहासनीं सुंदर । सभोवताले सरदार शूर मध्यें आपुण पुरदर । प्रांत परगणे गाव ज्यांनी सोडविले गिरिकंदर । सरजाम ते तयास दिधले जहागिर एकंदर । फौजबद गायकवाड सेनापती समशेरबहादर । वंशध्वज त्या वंशीं जन्मले हे स्वकर्मी सादर ॥ ( चाल ) ॥ महाराज सयाजी मणी लालसा ॥ करी प्रकाश कुळी दिनमणी फारसा ॥ देई चिंतित चिंतामणी पहा कसा ॥ ( चाल ) ॥ तसा पुरुष ह्या दिसांत पाहतां नाहीं असा अधिपती ॥ जी सुपुत्र प्रसवली धन्य ती जननी धन्य ते पती ॥ १

निष्कलंक निर्दोष स्वामिनी करून पूर्वार्चन । प्रसन्न केला असेल मागिल जन्मिं भाललोचन । पदोपदीं तो सांब म्हणुनि करी प्रसगीं भयमोचन । धैर्यवान दृढ पिंड न बाधे पदार्थ होई पाचन ॥ लेजिम जोड्या जोर कसुन खूप केले बलसचन ॥ सहस्रांत सौंदर्य गौरपण पीत जसें कांचन ॥

---

स्त्रियापुत्रसहवर्तमान इ०—सयाजीरावांना दोन बायका होत्या; शिवाय चार उपस्त्रिया होत्या. सयाजीरावांस दोन विवाहित स्त्रियांपासून सहा पुत्र व सहा कन्या व चार उपस्त्रियांपासून तीन पुत्र व दोन कन्या अशीं मिळून एकंदर सतरा अपत्ये होतीं. या सतरा अपत्यांपैकीं एकदोन खेरीजकरून बाकी सर्व अपत्ये त्यांच्या कारकीर्दींत हयात होतीं; आणि या प्रत्येक अपत्याचा वंशविस्तार त्यांच्या हयातींत झाला होता. तेव्हां कौटुंबिक सौख्यामध्यें मुख्य सौख्य जें गृहिणीसौख्य आणि अपत्यसौख्य त्यासंबंधानें सयाजी महाराज किती भाग्यशाली होते हें सांगणे नको ( श्री. थो. स. म. च. भा. २ पा. ४९९ व ५०३ ). पुरंदर—देवेंद्र, इन्द्र. गिरिकंदर—भावार्थ किल्लेकोट. स्वकर्मी सादर—कर्तव्यतत्पर. लालसा—लालासारखा, रत्नासारखा. फारसा—फार. पूर्वार्चन—

( चाल ) ॥ पगडीस तुरा वाकडा, कांहीं जरा ॥ जेग्यास जडित आकडा, गोजरा ॥ कानीं भिकबाळी चौकडा, साजरा ॥ ( चाल ) ॥ राजबीज फाकडा मुशोभित दिव्य शरीरसपती ॥ गळ्यात कळ्या हार, फडीं करीं जडावाची तळपती ॥ २

मर्जी होइल त्या दिशीं स्वारी कुलतमाम श्रृंगारणे । पूर्व कधीं पाथिमेस जातां मृगशिकारीकारणें ॥ भरपल्ला फेकून अडचणींत घोडा ललकारणे ॥ स्वतां शिस्त बांधून गोळी हटकून ठकि मारणे ॥ भले लोक बोथाटी टाकिता वरचेवर वारणे ॥ मागे पुढे बाजूस हूल दावुन भाला फेकणे ॥ ( चाल ) ॥ सुती हात तिरदाजीचा वाणिती ॥ डाव दुसऱ्यावर बाजिचा, आणिती ॥ आला न्याय गरीब गाजीचा, छाणिती ॥

---

पूर्वजन्मांतील ईश्वराचे अर्चन, सेवा सांब—[ शालि॰ प्रतीत खाव असे आहे ! ] कांहीं जरा—किंचित. जेगा—पागोट्यावर बाधण्याचा एक रत्नालकार (पट.) गोजरा—सुदरा कुलतमाम—सर्व. भरपल्ला—भरधाव. ललकारणें—धावणें, खडा करणे. सिस्त—निशाण, नेम [ पट. ] ठीक मारणे—बरोबर, बिनचूक भले लोक—शिलेदार. शालिग्रामाच्या पोवाड्यात 'भील लोक' आहे भल – मराठा शिलेदार [ खरे ] भील शिलेदार 'भील लोक पागेचे भगवतराव याचेवर उठवले' [ भा. व. पतप्रधान बखर ६४ ] सुती—बिनचूक, कुशल वाणिती—वानिती, कौतुक करतात. डावा हाल दुसऱ्यावर धाजींचा आणिती—दुसऱ्यास हार खावयास लावतात. डाव दुसऱ्यावर बाजिचा, आणिती ( शालिग्राम )—दुसऱ्यावर डाव आणतात; स्वत विजयी होतात. अन्याय गरीब गाजीचा—गरीब लोक गाजीचा अन्याय ( सयाजीरावाकडे ) आणिती आणि ते तो छाणिती म्हणजे गरीब लोक वरिष्ठानीं केलेले अन्याय सयाजीरावाकडे आणितात व ते त्याची छाननी करतात भावार्थ-गरीब नवाजे आहेत. गरीब लोकावर अन्याय होऊ देत नाहीत. (२) आला न्याय गरिब गाजिचा छाणिती—गरीब श्रीमताचे जे काही न्यायाकरिता दावे येतात त्याची नीट छाननी

( चाल ) ॥ खबरदार लिहिण्यात कल्पना इतराची अल्प ती॥ समइ मुख्य जद्राल पेंचिता न गवसता जल्पती ॥ ३

सव गोष्टींचा शोख जातिने हुशार तर कुस्तिस ॥ दंडभुजा आटीव उमर रायाची तीस पास्तिस ॥ तूपसाखर आणि कर्णीक उस चारुन आणुन मस्तिस ॥ साठमार चहुंकडुन खिजविती नित्य नव्या हस्तिस ॥ पहिलवान किती जेठी येउन राहतात तेथ वसतिस ॥ खुराक उत्तम त्यास कारकुन वर बदोबस्तिस ॥ ( चाल ) ॥ ह्र जाणुन क्वींसागर, धांवती ॥ गुण सभेस नट नागर, दाविती ॥ बक्षीस कडीं लगर, पावती ॥ ( चाल ) ज्याकडे पाहती कृपादृष्टि तो करतिल लाखोपती ॥ सप्तपिढ्यांचे दरिद्र विच्छिन होऊन रिपु लोपती ॥ ४

भक्तजनांचें माहेर देशावर श्रीपंढरपुर ॥ याचकास ह्र योग्य बडोदें सव क्लेश करा दुर ॥ नित्य उठुन वाटितात खिचडी ब्राह्मणही महामुर ॥ स्त्रिया पुरुष मुली मुलासकट शेर होतो भरपुर ॥ पुण्यवान गायकवाड जगतीं तळात ते महशूरे ॥ सव कनकमय लोक घरोघर निघे सोन्याचा धुर॥

---

करतात खबरदार लिहिण्यात कल्पना इतराची अल्प ती—लिहिण्यात मोठे फडें आहेत व त्यात इतरांनी सुचविलेला मजकूर नसतो बहुतेक आपल्या बुद्धीनेच लिहितात समइ मुख्य जद्राल पेंचिता न गवसता जल्पती—जद्राल–जनरल पेंचिता–अडचणींत वाटता न गवसतां–न सापडता जल्पती–उत्तर देतात समइ–वेळप्रसंगीं शोक—आवड हुशार—तय्यार आटीव—कसलेले साठमार—रमण्यात हत्ती सोडून त्याशीं लढणारा जेठी—मल्ल गुण सभेस नट नागर दाविति—नटनागर सभेस गुण दाखविती सभेस–राजदरबारात नट नागर–कलावंत लोक समजून—युध्या लगर—मोत्याचा सर ( आपटे ) नित्य उठुनि वाटितात खिचडी इ —" फत्तेसिंगरावाना वारल्यावर प्रतिनिधिपदाचा अधिकार व आनंदराव वारल्यावर राज्यपदाचा अधिकार जो सयाजी महाराजाना प्राप्त झाला तं सव बेचिराजीच्या कृपेचं फळ असा त्याचा पूर्ण ग्रह होता त्याची श्री बेचाराइ व बोलाइ यांच्या ठिकाणीं इतकी भक्ति होती कीं त्याचं तीर्थ घेतल्याशिवाय ते अन्नग्रहण

( चाल ) ॥ जें देणें दिलें एकदां, योजुन ॥ तें परत न घेती कदां, समजुन॥ कोणी फंद करील जर कदा, माजुन ॥ ( चाल ) ॥ दर्शनास तो अयोग्य त्यावर विधिहरिहर कोपती ॥ अशा प्रभूच्या रक्षणार्थ उडी घाली म्हाळसापति ॥ ५

अहारे वडोदें शहर, कोट चौफेर काम मजबुत ॥ चार दरवाजे चार दिशाना वर शिपाई कलबुत ॥ चोहों रस्त्यावर दाट हवेल्या काय संगिन शाबुत ॥ माडवींत मोहोरमात जमती सर्व तिथें ताबुत ॥ अजब शहर वसविलें गिराशे करुन नेस्तनाबुत ॥ बागवर्गाचे तलाव साहेब घेति हवा तबुत ॥ ( चाल ) ॥ महा जागृत राजेश्वर, पावती ॥ सकटीं नीळकंठेश्वर, धावती ॥ भुत वाटेस यक्तेश्वर, लावती ॥ (चाल) ॥ बहुत उग्र नरसिंह समधादिक थरथरकापती ॥ प्राशन करिता तीर्थ हिमज्वर इतर रोग करपती ॥ ६

विठ्ठल मंदिर सुरेख दुसरे देउळ बालाजिचें ॥ खंडेराव दक्षिणेस उत्तरपथी बेचराजिचें ॥ भीमनाथ केदार राममदीर रगामेजिचें ॥ महाकाली भद्रेत लक्ष्मी लक्षणीक मुख जिचें ॥ गोजिरवाणी मूर्त नाव

---

करीत नसत व तोच क्रम ब्राह्मणाच्या खिचडीसंबधानेंहि ते पाळीत असत. ( श्री थो स. म च. पा ८३८ ). जर कदा मानून—जर कदा माजून असें पाहिजे. माजून म्हणजे मत्त होऊन जर कदा—जर केव्हा. कलबूत—अत्यंत दांडगा; राकट मनुष्य. संगिन—मजबूत, सुंदर, उत्कृष्ट. गिराशे - वडखोर; दरोडेखोर. नस्तनाबूत करणें—नाश करणे इतर—आणखी दुसरे विठ्ठलमंदिर—"प्रसिद्ध विठ्ठलमंदिर तर त्यांच्या सापत्न मातोश्री गहिनाबाईसाहेब यानीं बांधलें आहे" थो स म च. पा १८९ "शहरातील जुन्या वाड्या शेजारील सरकारी प्रसिद्ध विठ्ठलमंदिर हें गहिनाबाईचे चिरकाल स्मारक त्याची आणि सयाजीरावाची धार्मिकपणाची साक्ष वडोद्यातील सर्व आबालवृद्धांस प्रत्यही साक्ष देत आहे (थो स म. च पा ८३८)" बेचराजी—"सयाजीराव राज्यावर बसल्यानतर त्यानीं आपली उपास्य देवता जी श्रीबेचिराजी तिचे देवालय आठ हजार रुपये खर्च करून बांधिलें" (थो. स म. च. पा. ८३८) लक्षणीक मुख जीचें—लक्षणहीना-

नारायण सुंदर जिचें ॥ कांही पुढे बाहेर महंमदवाडित घर काजिचें ॥ (चाल) ॥ किती धर्म हरीभक्तिचा, होतसे ॥ लल्लु पारख सुपवक्तिचा, दिसतसे ॥ सामळ साद नक्तिचा करितसे ॥ (चाल) ॥ दैवशाली गोपाळराव मैराळ रासिती पती ॥ खुशाल अंबईदास रतंजी असे कितिक धनपती ॥ ७

महाराजांचे आप्त आयतर धारकरी बरोबर ॥ एकासारखे एक पांढरे करिती डौलडंबर ॥ घोरपडे उमराव लक्ष्मणराव कमुन कंबर ॥ मागें न फिरती रणांत पडल्या तुटुनी जरी अंबर ॥ मानसिंगराव शिर्के आणिक रघुनाथराव धायबर ॥ थोर कुळींचे मर्द राजे मंडळींत असे नंबर ॥ (चाल) ॥ मामांची मानमान्यता, चांगली ॥ करवितील दुर दैन्यता, लागली ॥ ही चौघांमध्यें धन्यता, वागली ॥ (चाल) ॥ भाऊ पुराणिक पूर्ण कृपेतिल जे कारण स्थापिती ॥ मान्य पडे तें प्रभूस गुरुवर दया करी गोपती ॥ ८

---

च्या उलट ह्म० सुंदर, रम्य. हरिभक्ति—"हरि आणि भक्ति हे दोघे बंधु विशालाड वाणी जातीचे असून पुण्यास व्यापाराकरितां गेले. तेथे त्यांनी पेशवे दरबारांत प्रवेश करून घेऊन त्यांनी लवकरच पेशव्यांची पोतदारी मिळविली त्यांनीं पोतदारीचा धंदा बरीच वर्षे इमानेइतबारे केल्यामुळे पेशव्यांनीं मौजे कजापूर परगणे डभई हा गांव वंशपरंपरेने त्यास इनाम दिला. नंतर त्यांनी बडोद्यास सराफी दुकान काढले. पहिले सयाजीराव व फत्तेसिंगराव बडोद्यास गादीवर असतां त्यांस यांनी मदत केली. यांची प्रतिष्ठा व व्यापार वाढला. त्यांनीं मुंबई, पुणे, नागपूर, ग्वाल्हेर, सुरत, पेटलाद, अहमदाबाद इत्यादि अनेक ठिकाणीं

हस्तमुखें खावंद गादीवर बसून सोपस्कर ॥ रुमाल चौरी वारितात वर भोवते उभे किंकर ॥ नारायणराव दिवाण, भास्कर विठ्ठल जोडुन कर ॥ सदय हृदय शास्त्रज्ञ मुतालक मुख्य भिमाशंकर ॥ रामचंद्र विश्वनाथ फडणिस येती पुढे लौकर ॥ मुजुमदार ते नारायणराव, माधव करंदीकर ॥ (चाल)॥ विश्वासुक वर्क्षी, खरे, मर्जिचे ॥ किती शब्द सुचविती बरे, अर्जिचे ॥ गोपाळपंत गुणी पुरे, मर्जिचे ॥ ( चाल ) कृपावंत सरकार म्हणुन हो श्रम सारे हरपती ॥ चाहती उमाशंकरास बारिक कामकाज सोपती ॥ ९

अशा प्रभूचे उमाकांत कल्याण सदोदित करो। गाई-म्हशी-गज-तुरग वहनीं अपार पागा भरो ॥ पुत्रपौत्रीं राज्यलक्ष्मी अशीच अक्षई ठरो ॥ शत्रुपराजय करुन प्रतापे राज्यनीति आचरो ॥ दानदक्षिणा धर्मी निरंतर चित्तवृत्ति अनुसरो ॥ गंगु हैबती शीघ्र कवीची प्रपंचचिंता हरो ॥ (चाल) ॥ दहा चौकी काम उठवुन संगिन ॥ हरजिनसी यकवटउन, रंगिन ॥ गातात गुरू आठवुन, चीगिन ॥ ( चाल ) ॥ महादेवाचे कवन कमळवर भ्रमर गुणी क्षेपती ॥ प्रभाकराची नजर हीच करी धन्यास विज्ञप्ति ॥ १०

---

मामा—' रघुनाथराव हे सयाजीराव महाराजांचे सख्खे मामा असल्यामुळे ते पुढे त्यांच्या वेळीं जगताप मामा या नांवाने प्रसिद्ध होते. त्यांनीच सयाजीरावांचें लहानपणीं पालनपोषण केलें ( थो. स. च. म. न. भा. ४२-४३ ). भाऊ पुराणिक—हे सयाजीरावांचे एक मंत्री होते. भिमाशंकर—हे प्रसिद्ध गंगाधरशास्त्र्यांचे चिरंजीव. हे सयाजीरावांचे मुतालिक होते. हस्तमुखें—हसतमुखें. अर्जीचे—विनतीचे. पर्तीचे—पालनकर्त्यांचे, राजाचे. ठरो—टिको. चंगीन—चंगा–Sound pure शुद्ध. ( चग–एक तंतुवाद्य ). कमळवर—उत्कृष्ट कमळ, श्रेष्ठ कमळ, ' एकपकज '. क्षेपती—क्षेपा घालती. प्रभाकरास नजर हीच करणी धन्यास विज्ञप्ति—प्रभाकराची कृति हीच महाराजांना केलेली नजर होय. या कवितेचा नजराणा देऊन कवि आपले दारिद्र्यहरण करण्याविषयीं महाराजांना विज्ञाप्ति करितो.

नारायण सुंदर जिचे ॥ काही पुढे बाहेर महमदवाडित घर काजिचे ॥ (चाल) ॥ किती धर्म हरीभक्तिचा, होतसे ॥ लल्लू पारख खुपवक्तिचा, दिसतसे ॥ सामळ सांदा नक्तिचा करितसे ॥ ( चाल ) ॥ दैवशाली गोपाळ राव मैराळ राखिर्ता पती ॥ खुशाल अबईदास रतजी असे कितिक धनपती ॥ ७

महाराजाचे आप्त आधतर धारकरी बरोबर ॥ एकासारखे एक पाडरे करिती डौलडवर ॥ घोरपडे उमराव लक्ष्मणराव कसुन कबर ॥ मागें न फिरती रणात पडल्या तुटुनी जरी अबर ॥ मानसिंगराव शिर्के आणिक रघुनाथराव धायबर ॥ थोर कुळींचे मर्द राजे मडळींत असे नबर ॥ ( चाल ) ॥ मामाची मानमान्यता, चागली ॥ करवितील दुर दैन्यता, लागली ॥ ही चौघामध्ये धन्यता, वागली ॥ ( चाल ) ॥ भाऊ पुराणिक पूर्ण कृपतिल जे कारण स्थापिती ॥ मान्य पडे ते प्रभूस गुरुवर दया करी गोपती ॥ ८

---

च्या उलट ह्या० सुदर, रम्य हरिभक्ति—" हरि आणि भक्ति हे दोघे बधु विशालाड वाणी जातीचे असून पुण्यास व्यापाराकरिता गेले तेथे त्यानी पेशवे दरबारांत प्रवेश करून घेऊन त्यांनी लवकरच पेशव्याची पोतदारी मिळविली त्यानीं पोतदारीचा धदा बरीच वर्षे इमानइतबार केल्यामुळ पेशव्यानी मौजे कजापूर परगणे डभई हा गांव वशपरपरेने त्यास इनाम दिला. नतर त्यानी बडोद्यास सराफी दुकान काढल पहिले सयाजीराव व फत्तेसिंगराव बडोद्यास गादीवर असता त्यास यानी मदत केली याची प्रतिष्ठा व व्यापार वाढला त्यानी मुबइ, पुण, नागपूर, ग्वाल्हेर, सुरत, पेटलाद, अहमदाबाद इत्यादि अनेक ठिकाणीं आपल्या पेढ्या स्थापिल्या. या दोघां बधुच्या नावावरून त्याच्या पेटास

हस्तमुखें खावंद गादीवर बसून सोपस्कर ॥ रुमाल चौरी वारितात वर भोवत उभे किंकर ॥ नारायणराव दिवाण, भास्कर विठ्ठल जोडुन कर ॥ सदय हृदय शास्त्रज्ञ मुतालक मुख्य भिमाशंकर ॥ रामचंद्र विश्वनाथ फडणिस येती पुढे लौकर ॥ मुजुमदार ते नारायणराव, माधव करंदीकर ॥ (चाल)॥ विश्वासुस बक्षी, खरे, मर्जिचे ॥ किती शब्द सुचविती बरे, अर्जिचे ॥ गोपाळपंत गुणी पुरे, मर्जिचे ॥ (चाल) कृपावंत सरकार म्हणुन हो श्रम सारे हरपती ॥ चाहती उमाशंकरास बारिक कामकाज सोपती ॥ ९

अशा प्रभूचे उमाकांत कल्याण सदोदित करो। गाई-म्हशी-गज-तुरंग वहनीं अपार पागा भरो ॥ पुत्रपौत्रीं राज्यलक्ष्मी अशीच अक्षई ठरो ॥ शत्रुपराजय करून प्रतापे राज्यनीति आचरो ॥ दानदक्षिणा धर्मी निरंतर चित्तवृत्ति अनुसरो ॥ गगु दैवती शीघ्र कवीची प्रपचचिंता हरो॥ (चाल) ॥ दह्या चौकी काम उठवुन सगिन ॥ हरजिनसी थकवटउन, संगिन ॥ गातात गुरू आठवुन, चंगिन ॥ (चाल) ॥ महादेवाचे कवन कमळवर भ्रमर गुणी झेपती ॥ प्रभाकराची नजर हीच करी धन्यास विज्ञप्ति ॥ १०

---

मामा—' रघुनाथराव हे सयाजीराव महाराजाचे सख्खे मामा असल्यामुळे ते पुढे त्यांच्या वेळीं जगताप मामा या नांवाने प्रसिद्ध होते. त्यांनीच सयाजीरावांचें लहानपणीं पालनपोषण केलें (थो. स. च. म. च. भा. ४२-४३). भाऊ पुराणीक—हे सयाजीरावांचे एक मंत्री होते. भिमाशंकर—हे प्रसिद्ध गगाधरशास्त्र्यांचे चिरंजीव. हे सयाजीरावांचे मुतालिक होते. हस्तमुखें—हसतमुखें. अर्जीचे—विनतीचे. पर्तीचे—पालनकर्त्यांचे, राजाचे. ठरो—टिको. चंगीन—चंगा—Sound pure शुद्ध. (चंग—एक तंतुवाद्य). कमळवर—उत्कृष्ट कमळ, श्रेष्ठ कमल, ' एकपकज'. झेपती—झेपा घालती. प्रभाकरास नजर हीच करणी धन्यास विज्ञप्ति—प्रभाकराची कृति हीच महाराजांना केलेली नजर होय. या कवितेचा नजराणा देऊन कवि आपलें दारिद्र्यहरण करण्याविषयीं महाराजाना विज्ञाप्ति करितो.

नारायण सुंदर जिच ॥ काही पुढ बाहेर महमदवाडित घर काजिच ॥ (चाल) ॥ किर्ती धम हरीभक्तिचा, होतसे ॥ लक्ष पारस खुपवक्तिचा, दिसतसे ॥ सामळ सांदा नक्तिचा करितसे ॥ (चाल) ॥ दैवशाली गोपाळ राव मैराळ राशिर्ता पती ॥ खुशाल अबईदास रतजी असे कितिक धनपती ॥ ७

महाराजाचे आप्त आधतर धारकरी बरोबर ॥ एकासारखे एक पाढरे करिती डौलडबर ॥ घोरपडे उमराव लक्ष्मणराव कसुन कबर ॥ मार्गे न फिरती रणात पडल्या तुटुनी जरी अंबर ॥ मानसिंगराव शिर्के आणिक रघुनाथराव धायवर ॥ थोर कुळींचे मद राजे मडळींत असे नवर ॥ (चाल) ॥ मामाची मानमान्यता, चागली ॥ करवितील दुर दैन्यता, लागली ॥ ह्या चौघामध्य धन्यता, वागली ॥ (चाल) ॥ भाऊ पुराणिक पूण कृपतिल जे कारण स्थापिती ॥ मान्य पडे ते प्रभूस गुरुवर दया करी गोपती ॥ ८

---

च्या उलट ह्म० सुदर, रम्य हरिभक्ति—"हरि आणि भक्ति हे दोघे बधु विशालाड वाणी जातीचे असून पुण्यास व्यापाराकरिता गल तेथे त्यानी पेशवे दरबारांत प्रवेश करून घेऊन त्यांनीं लवकरच पशव्याचा पोतदारी मिळविली त्यानी पोतदारीचा धदा बरीच वर्षे इमानइतबार के यामुळ पेशव्यानी मौजे कजापूर परगणे डभई हा गांप वशपरपरेने त्यास इनाम दिला नतर त्यानी बडोद्यास सराफी दुकान काढल पहिले सयाजीराव व फत्तेसिंगराव बडोद्यास गादीवर असता त्यास याना मदत केला यांची प्रतिष्ठा व व्यापार वाढला त्यानीं मुबइ, पुण, नागपूर, ग्वाल्हेर, सुरत, पेटलाद, अहमदाबाद इत्यादि अनेक ठिकाणीं आपल्या पेढ्या स्थापिल्या या दोघा बधूच्या नावावरून त्याच्या पेढीस हरिभक्तीची पेढी अस नाव पडलें त्याना पुत्रसतान नव्हत फक्त सामळ,

हस्तमुखें खावंद गादीवर बसून सोपस्कर ॥ रुमाल चौरी वारितात वर भोंवते उभे किंकर ॥ नारायणराव दिवाण, भास्कर विठ्ठल जोडुन कर ॥ सदय हृदय शास्त्रज्ञ मुतालक मुख्य भिमाशंकर ॥ रामचंद्र विश्वनाथ फडणिस येती पुढे लौकर ॥ मुजुमदार ते नारायणराव, माधव करंदीकर ॥ (चाल)॥ विश्वासुक बक्षी, खरे, मर्जिचे ॥ किती शब्द सुचविती बरे, अर्जिचे ॥ गोपाळपंत गुणी पुरे, मर्जिचे ॥ (चाल) कृपावंत सरकार म्हणुन हो श्रम सारे हरपती ॥ चाहती उमाशंकरास वारिक कामकाज सोपती ॥ ९

अशा प्रभूचें उमाकांत कल्याण सदोदित करो । गाई-म्हशी गज-तुरग वहनीं अपार पागा भरो ॥ पुत्रपौत्रीं राज्यलक्ष्मी अशीच अक्षई ठरो ॥ शत्रुपराजय करुन प्रतापे राज्यनीति आचरो ॥ दानदक्षिणा धर्मी निरंतर चित्तवृत्ति अनुसरो ॥ गगु हैबती शीघ्र कवीची प्रपंचचिंता हरो ॥ (चाल) ॥ दहा चौकी काम उठवुन संगिन ॥ हरजिनसी यकवटउन, रंगिन ॥ गातात गुरू आठवुन, चंगिन ॥ (चाल) ॥ महादेवाचे कवन कमळवर भ्रमर गुणी झेपती ॥ प्रभाकराची नजर हीच करी धन्यास विज्ञप्ति ॥ १०

---

मामा—' रघुनाथराव हे सयाजीराव महाराजांचे सख्खे मामा असल्यामुळे ते पुढे त्यांच्या वेळीं जगताप मामा या नांवानें प्रसिद्ध होते. त्यांनींच सयाजीरावांचें लहानपणीं पालनपोषण केलें (थो. स. च. म. च. भा. ८२-४३). भाऊ पुराणिक—हे सयाजीरावांचे एक मंत्री होते. भिमाशंकर—हे प्रसिद्ध गगाधरशास्त्र्यांचे चिरंजीव. हे सयाजीरावांचे मुतालिक होते. हस्तमुखें—हसतमुखें. अर्जीचे—विनंतीचे. पतीचे—पालनकर्त्यांचे, राजाचें. ठरो—टिको. चंगीन—चंगा–Sound pure शुद्ध. (चग–एक तंतुवाद्य). कमळवर—उत्कृष्ट कमळ, श्रेष्ठ कमळ, ' एकपंकज '. झेपती—झेपा घालती. प्रभाकरास नजर हीच करणी धन्यास विज्ञाप्ति—प्रभाकराची कृति हीच महाराजांना केलेली नजर होय. या कवितेचा नजराणा देऊन कवि आपलें दारिद्र्यहरण करण्याविषयीं महाराजांना विज्ञाप्ति करितो.

# दुसरे सयाजीरावांचा दुसरा पोवाडा

## २३

## ( शाहीर प्रभाकर )

दामाजीपंतानीं जगविले ब्राम्हण काहा दुकळात ॥ गायकवाड तर रक्षिति ब्राह्मण लाखो असल्या काळात ॥ ध्रु० ॥

तनिशेंतिसावर वर्से लोटलीं दुर्गादेवीच्या काळाला ॥ फार दिवस पर्जन्यच गेला आन मिळेना बाळाला ॥ दामाजीपंताच्या लागले ब्राह्मण द्वारी लोळायला । रक्ष रक्ष महाराज समर्थ सर्वास आला निदाळा ॥ त्या समइ कोठार खोलुनि पंती जगविले सकळाला ॥ बेदरास कळतांच धुतोंड शिपाई आले आवळाला ॥ चल वे बम्मन म्हणून ओढिता अश्रु लागले गालाला ॥ कैद करून नेताक्षणीं पडल सकट त्रिभुवनपाळाला ॥ चा० ॥ महाराचे सोग विठोबानी स्वत घेउनी ॥ धान्याचे द्रव्य त्या बाच्छायास देउनी ॥ पंताच्या पोथिमध्ये ती रशिद ठेउनी ॥ राहिले विठोबा पंढरीस येउनी ॥ चा० ॥ दामाजी पंताच्या धावण्या असा धावला विपळात ॥ तसा म्हाळसाकांत रक्षितो गायकवाड ह्या भूतळात ॥ १

सतराशचोविसात दगा होळकरानी अति केला । पंचविसामध्ये दरोबस्त अगदिंच पहारे पाउस गेला ॥ दीड शेराचा दुकाळ पडला कहर

---

दुर्गादेवीचा काळ—दुर्गादेवीचा प्रसिद्ध दुष्काळ ह्या दुष्काळ इ स १३९८ च्या सुमारास पडला होता ( म इ सा ख ३ पा १९९ टीप) बाळाला—( शास्त्री कोश बाळा-बाहला-बाहळा-जीववृत्ति ) बाळाला—बाहळाला फार दिवस पाऊस नाहींसा झाल्यामुळे जीव जगण्यापुरत हि अन मिळेनासे झाले ( २ ) बाळाला म्हणजे लहान मुलाला त किता अन्न लागावयाचे पण तेवढेहि मुष्कील झाल निदाळा—नि शेष नाश, सवनाश धुतोंड—मू श दुतोंड किंवा धुतोंड दुतोंडा सावकार किंवा राजा याचा अत्यंत उग्र असा जो दूत तो (शास्त्री कोश) पेशवाईतील ढालाइतप्रमाणे धुतोंडा—दांडगा मनुष्य (आपटे) आवळाला—कैद करावयास गालाला—गळ्याला रशिद—पावती विपळात—पळाच्या $\frac{1}{60}$ हिश्शात भावार्थ-तावडतोब,

माटला दुनियेला ॥ दिवसदिवस बेवरकत जह्याली सुखोत्पत्ति नाहीं उरली ॥ ब्राह्मण गेले उडुन मजलोमजलीं खुब ठेला ॥ बडोद्यांत प्रतिमा ती जगली न पोंचल्या वाटेस मेला ॥ धर्मपुरुष गायकवाड प्रेमें क्षमाशांतिने भरलेला ॥ तेव्हांपासुन प्रारंभ सिध्याला हजारो ब्राह्मणें जपलेला ॥ चा० ॥ चाळीस वर्षे वांटिताता खिचडी सदां ॥ म्हणून न जाती ब्राह्मण देशीं कदा ॥ दिवसांत प्रहरभर पडे मेहनत एकदां ॥ मग सायंकाळ आनद हसती गदगदां ॥ चा० ॥ कुटुंबसुद्धां प्रपंच करिती गर्भिणी होति बाळो ॥ तिहीं महिन्यांच्या मुलास खिचडी मिळत्ये असें आले आढळांत ॥ २

वेदशास्त्रसपन्न पुराणिक योग्य ज्योतिषी हर्दास ॥ टाळ-विणे-करताल-मृदगीं त्यात एखादा सुरदास ॥ सर्व काळ भजनांत घालती कदां न शिवती नंदास ॥ घुगर बांधुन पायीं नाचती ध्याति पुंडलिकवर्दास ॥ चित्रे मूर्ती करण्यांत कुशल जे वैद्य जिंकिति दर्दास ॥ तऱ्हेतऱ्हेच्या करून नकला नकलीं रिझविती मर्दास ॥ ब्रह्मचारि मांत्रीक तपस्वी घेउन सवे शागिर्दास ॥ मोहरा–पुतळ्या–रुपये तयांना देति शालजोड्याफर्दास ॥ चा. ॥ ह्यापरी ब्राह्मणसमुदाय फार जगविला ॥ पुरुषार्थ करुन सकटकाळीं दाविला ॥ वैकुंठीं अचळ हा धर्मध्वज लाविला ॥ यशास वश मार्तंड करून ठेविला ॥ चा. ॥ येवढेच विश्रांतिला राहिले स्थळ पथमच्या रहाळात ॥ कीर्तवान खावद असले नाहीं मराठे मंडळांत ॥ ३

---

त्वरित, लागोलाग. बेवरकत—तोटा, निकृष्ट दशा, विपत्ति, वाईट दिवस, अवनति, हलाखी मजलो मजली खुब ठेला—(?) ठेल (विशेषण)—खूप, रगड. जपलेला—टपून बसलेला. बाळांत—बाळत. करताल—पु. चिपळ्यासारखे एका काशाचें वाद्य (शास्त्री). सुरदास—सयाजी महाराजाच्या पदरीं देविदास नांवाचा एक मथुरावासी बैरागी गाण्यांत व सतार वाजविण्यांत मोठा कुशल होता. (भो. स. च ८३०). पण हा सुरदास कोण कळत नाहीं. नर्द—सोंगटी. दर्द—दुःख, रोग. ब्रह्मचारी मांत्रिक तपस्वी इ.—"जादू, मन, तत्र वगैरे बंगाली व बीरविद्येचाहि सयाजीरावांना बराच नाद होता. आधी या विद्येसंबधाने बडोद्याचा पूर्वीपासून लौकिक होता. त्यांत सयाजीरावांच्या

विश्वकुटुंबी श्रीमत ते तर सूत प्रजेला अतरेला । गायक्वाड आहेत म्हणुन हे समस्त ब्राह्मण सांवरले ॥ तानसेनपथाचे गवय्ये तेहि प्रभूंनीं आवरले ॥ कडीतोडे हातात दुपेटे लाल जरींचे पाघरले ॥ पहिलवान पजाबी ज्याचे दड सदा मुढे फिरले ॥ हरहमेश कुस्त्याच विलोकुन इतर मल्ल जागीच विरले ॥ नायकिणी आणि कसबिणी शाहिर नेहमी बडोद्यामधे ठरले ॥ पावे पगाराशिवाय बक्षिस कसबी लोक ह्याने तरले ॥ चा ॥ कल्याण ईश्वरा असेच याचे असो ॥ आनदभरित चिरकाळ गादीवर बसो ॥ कधीं अलोभ

---

कारकीर्दीत या विद्येस व अनुष्ठानहोमहवनादिक कमास वरेंच उत्तेजन आले" (थो स च ८३१) फर्द—(आरबी पु) एकेरा वस्त्र, विशेषत शाल (आपटे) राहाळ—प्रात, देश पाघरलें—त्याच्या अगावर घातल *अलोभ—अवकृपा, गैरमर्जी*

शाहिराना बडोदा दरबाराकडून ज्या बिदाग्या मिळाल्या त्याची माहिती—

| सवत् | सन | तमासगीर | सगनभाऊ यास | १४८७ ४० |
|---|---|---|---|---|
| १८७८ | १८२१–२२ | बिदागी | तपशील | |
| | | ६७५-०० | नगद (यापैकीं रु २५ पोषाकाचे) | |
| | | २४६ ४० | सोन्याचीं कडी | |
| | | ५६६ ० ० | कापडाबद्दल (सलामीबद्दल १८५ घडोती मशारनिल्हे ४२–४–० बिदागी ३३८-१२-० फडासह) | |
| १८७९ | १८२२–२३ | सगनभाऊ पुणकर | | ९८१ १० ० |
| | | ४७५-०-० नगदी हस्तें खुद्द | | |
| | | १५०-८-० कडी सोन्याची | | |

गर्गुहैबतीवर नसो ॥ महादेव गुणीचे कवन मनामधें टसो ॥ चा. ॥

| | | | |
|---|---|---|---|
| | | २३६-२-० सलामी विदागीसह | |
| | | काषड ( १७० पोपाक | |
| | | ३६-०-० रामा जोडीदारास पोपाक | |
| | | ९७-८-० कृष्णा नाच्यास[1] | |
| | | ३२-१०-० फडकरी यास ) | |
| १८८० | १८२–३–४ | सगनभाऊ | |
| | | १९२-०-० कडीं सोन्याची | |
| | | ३-०-० फरासास | |
| | | १९५-० ० | |
| १८८१ | १८२४–२५ | सगनभाऊ | १०३-०-० |
| १९०६ | १८४९–५० | सगनभाऊ | २५-०-० |
| १८९७ | १८४०–४१ | परशराम वाईकर | १२५-०-० |
| | | ९९-०-० रोख | |
| | | २६-०-० कापड | |
| | | १२५-०-० | |
| १८९५ | १८३८–३९ | श्रीपति सवाई फंदी | १९९–०–० |
| १८९६ | १८३९–४० | ,, | १९९-१५-६ |
| १८९७ | १८४०–४१ | ,, | १९५-१३-६ |
| १८९७ | १८४०–४१ | ,, | ३००–०–० |
| | | १०३–२–० कापड | |
| | | १९६-१४-० रोख | |
| | | ३००–०–० | |

जाऊन प्रथम दारव्हा आणि नंतर भाम येथें आपलें कायमचें ठाणें केलें. कान्होजी १७२० सालच्या बाळापूरच्या लढाईंत हजर होता. बंगाल ओरिसावरील स्वारींचा श्रीगणेशा कान्होजीनेंच प्रथम केला. कान्होजीस मुलगा नव्हता म्हणून त्यानें रघूजीस मुलासारखें जवळ पाळलें. पण नंतर त्याला रायाजी नावाचा मुलगा झाला व कान्होजीची रघुजीवरील मर्जी उडाली. १७२५ सालीं शाहूची कान्होजीवर गैरमर्जी होऊन त्यानें त्यास सातान्यास बोलावून कैद करू पण तो तेथून पळून निजामास जाऊन मिळाला. तेव्हां शाहूनें मुद्दाम त्याला धरण्याकरितां रघूजीस पाठविलें. रघूजीनें कान्होजीचा पराभव करून पकडून कैद केलें व सातान्यास पाठवून दिलें. कान्होजी सातान्यासच पुढें कैदेंत मरण पावला.

कान्होजीचा मुलगा रायाजी यानें पुढें नानासाहेब पेशव्याशीं सख्य करून घेतलें. तेव्हां शाहूनेंही रघूजी व रायाजी यांचा सलोखा करून देऊन रायाजीस रघूजीकडून सरंजाम करून दिला. रायाजी हा भाम येथच मरेपर्यंत राहात असे. रायाजी निपुत्रिकच वारला.

कान्होजी भोसल्यासंबंधीं अलीकडे पेशवे दप्तरांत बरीच नवी माहिती प्रसिद्ध झाली आहे. कान्होजीनें मलकापूरचा छळ केला याचें कारण कान्होजी हा अत्यंत कमठ मराठा होता. महाराच्या नादीं लोक लागतात याचाहि त्याला तत्कालीन धर्मसमजुतीस अनुसरून संताप आला असणें स्वाभाविक आहे. कान्होजी हा "सोवळें" फार करणारा होता. इतका कीं, तो ब्राह्मणाशिवाय इतराच्या हातचें अन्न ग्रहण करीत नसे ! एकदां शाहूमहाराजांनीं त्याला अत्यंत आग्रहानें बोलावून 'मराठ्यांची मेजवानी' घातली. कान्होजीला त्या वेळीं नकार देतां आला नाहीं. पण घरीं येतांच त्यानें मीठमोहऱ्या गरम पाण्यांत घालून

## २४

## ( शाहीर–महादु गोविंदा )

नादगाव प्रगाणा जागा आजती थोर ।। साक्षात खाकीबोआ झाल मलक्या अवतार ।। धृ० ।। देवबा माळी बोवाला प्रसन्न झाले भगवान ।। थोरथोर सागता होते पाण्यावर आसन ।। खाकीसाहेबाच प्रथम अडगावीं ठाण ।। मलकयान गुरु केला आपुल्या सुपनि ।। सद्‌गुरुची कृपा त्याहीवर झाली सपूण ।। बागबगीचा जवळ छाया देवळावर ।। पाटीमार्गे विहिर पाणी पेतो जनसारा ।। १

देवमाळी बोवान मलक्याला लाविल पिस ।। जना ताडा कम्र देइना बोलत भलतीस ।। मलकयाबोआला उपास घडले बहुत ।। देवमाळी बोवाच्या क्ळल होत अतरगात ।। तेव्हा मलकयाचे तीथरूप गले अडगावात ।। म्हणे मी विनती करतो देवा चला आजतींत ।। तेव्हा देवमाळी बावाला घेऊन आल आजतीत ।। मग बसविल पुजीत मलक्या आले शुद्धींत ।। दवमाळी बावान मलकयाशिरीं ठेविला हात ।। नादगाव प्रगणा आजता जागता ज्योत ।। अवतरले खाकीया मलकया थोर झाले भक्त ।। २

गौराइन नवस केला पुत्र दे मजला ।। आभरणाच्या मुद्रा काठी वाहिन देवाला ।। गौराइचा भाव देवाच्या पायरीले जडला ।। गौराइच्या पोटा लेक काशीराव जलमला ।। तिन आभरणाच्या मुद्रा काठी वाहिली देवाला ।। तेव्हा देवमाळी बाबान काठी देली मलकयाला ।। काशीराव बावा तेव्हा देवासी

---

खाकीबोवा—खाकीबोआ हा एक हिंदु अवलिया होऊन गेला, मुसलमानी पद्धतीप्रमाणे दगा असतो परतु आतील देवघ्यान कृष्णाची मूर्ती असते मुसल्मानी अमदानींत अशा पद्धतींची कृष्णाची देवळं बांधलेली वऱ्हाडात हल्लीहि बरींच अस्तित्वांत आहेत ती हिंदूच्याच ताब्यात असून त्याचाच पूजाअचा असत थोरथोर—फार सागता—बोलण्याप्रमाण पेती—पितात (वऱ्हाडी रूप) आजतीत—आजती हा गाव वऱ्हाडांत, ता दारव्हा, जि यवतमाळ येथे आहे पुजीत—पुजत पायरीले—पायराला (वऱ्हाडी रूप) देली—दिली (वऱ्हाडी रूप)

साक्ष पहाता प्रचीत अठरा कुम जोडे कर ॥ साक्ष पहाता प्रचीत अठरा कुम जोडे कर ॥ भक्तीला हाजर ब्राह्मण आणिक फकीर ॥ भावीमधी कान्हुराज दुष्ट दुराचार ॥ कोण लाविती कळ जाऊन त्याच्या दरबारात ॥ आजतीमधिं महार मलक्या देवाचा भक्त ॥ अन भरते मोठी यात्रा अजाब त्याची कीर्त ॥ भरुन विराची विद्या म्हणलेत आहे त्याच्या जवळ ॥ वऱ्हाड राज्य भादून हुजुर कोणी नाही करत ॥ मग झाली त्याची शायना म्हणे रावभक्त जादुखोर ॥ हुकूम केला त्यान सवारी अजतीवर ॥ धरून मलक्या मनगटी अपेष्टा मांडिली फार ॥ अन् दोन उपडले दात बांधे हत्तीच्या पायावर ॥ देव भक्ताचा कैवारी तारे वरच्यावर ॥ करपले अतरी श्राप दिला निरधार ॥ १२

श्राप दिला तेव्हा दोन्ही आपटले कर ॥ राज्यावरून ढळला होता कान्हुजीकुंवर ॥ तेव्हा मग खाया मिळेना अन्न म्हणतो नाही झाल बर ॥ त्या कान्हुजीच्या पोटीं होता लेक रायाजी कुंवर ॥ तो शहाणा होता रायाजी त्यानें सेवा केली फार ॥ दोन्ही कर जोडुनि विनत्या करे वारवार ॥ म्हणे अनाथाचा तारक देवा तू मजला तार ॥ तेव्हा प्रसन्न झाले देव लक्ष्मी देई महापूर ॥ म्हणे आइकरे रायाजी भाग तुझी होइल उजाड ॥ अन् होयाच तें झाल तुझ्या कुळीमध्ये अधार ॥ बोलला शबद परतुन नाही येणार ॥ १३

तेव्हा मलक्यान हाक मारिली मोठ्या लेकाला ॥ म्हणे निंबाजी महादजी तुम्ही जा कारज्याला ॥ निंबाजीच्या पोटामध्यें धडका उठीला ॥ घेऊन पित्याची आज्ञा निंबाजी गेले कारज्याला ॥ घेतल सोयळ निंबाजी माग परतला ॥ तेव्हा मलक्यान हाक मारिली लहान्या लेकाला ॥ लहाना लेक चिंताजी त्याहच्याजवळ धाऊन गेला ॥ म्हणे मागरे चिंत्या प्रसन्न आहो या वेळेला ॥ तो लहाना लेक चिंताजी काहींच नाहीं बोलला ॥ तेव्हा मलक्या बोवा तेव्हां बोले चिंताजीला ॥ जा सातव्या पिढींत भेट देईन तुम्हाला ॥ नेकी धरम ठेव जा तुम्ही ओळखजा मजला ॥ पापबुद्धी धराल तर दगा बसल जीवाला ॥ ऐतवान्या दिवशीं बोवान देह ठेवून दिला । निंबाजी महादजी आले आपल्या गावाला । खबर कळाली तेव्हा अग टाके धरणीवर ॥ १४

---

तिरपत—तृप्त. हुजुर—उजर. शायना—शहानिशा होयाचं—

प्राण गेला तेव्हां सजे ढळले दोन। झाला फार आकांत जैस मोठं पडलं रण। हाय हाय करत जन म्हणत हारपला मोहन। एक पिटे लल्लाट देवा दाखव गा चरण। दर्शनाची आवड आमचे डगमगतील नयन। तेव्हां नहाणल देवाला कपाळी मोहर लाऊन। आंग पुसलं होत देवाच्या अंबाई लेकीनं॥ मांडी देली होती देवाला धाकट्या चिंताजिन॥ आरती घेऊन आली बोवाची गंगाई सून॥ पुंजा केली होती बोवाच्या मोठ्या लेकानं॥ उचलून बोवाला ठिकान्यावर गेले घेऊन॥ बसविल बोवाला आतमधी पाठ भरून॥ बसविलं बोवाला आंतमधी बेल भरून॥ होता एक अवलीया ऐसा नाही होणार॥ १५

चौघे लेक बोवाला दोघी कन्या सत्वर॥ अन् पोटी पिकल्या सुना नातीनातांचा विस्तार॥ फार लागला पैसा दर्गा देवाचा जोर॥ ईटबंदी वाडा बोवाचा आहे चौफेर॥ आहे तीन बुरुज वाड्याला आणिक वाड्यामध्ये विहीर॥ दरवाज्यावर सज्जा बैठक दिसते हवाशीर॥ सत्रा कळस हे सोनेरी आहेत चौफेर॥ जे कोणी खोटं म्हणेल त्यानं पहावं सत्वर॥ १६

शके सतराशे च्यार ख्याल केले तयार॥ नांदगांव प्रगाणा काशीराम जुमेदार॥ घरगत वस्ती आहे आजंती वस्ती गुलजार॥ शामजी चोपड्या रयत नांदवतो जोर॥ झाले तेरा चौक भजनी मुर्कीचं माहेर॥ नथुभटबोवा मागं भक्ती करे फार॥ काय आता सांगूं देवा तुझ्या पायाचा आधार॥ मलकयाचा ख्याल ऐका बसून लहानथोर॥ येडा वाकडा शबद माझा आयका उत्तर॥ ज्यान टाकिली पुजा त्याचं नाहीं झालं बरं॥ ज्यानं केली चेष्टा त्याचं नाही झालं बर॥ महादु गोविंदा ख्याल गातो वस्ती मोझर॥ १७

---

न्हावयाचे. जुमेदार—जमीनदार (देशमुख). मोझर—हे गांव आंजतीच्या पश्चिमेस ३ मैल आहे.

पत्रें पाठविलीं ते समयीं रघूजी भोसले सेनासाहेबसुभा यांच्याकडेही याच प्रकरणीं लिहिलें

फौजेसहित सेनासाहेब व व्यंकोजी भोसले सेनाधुरंधर व चिरंजीव परसोजी भोसले ऊर्फ बाबासाहेब व मातोश्री चिमाबाईसाहेब सुद्धां वन्हाडांत पोंचवून गाविलगडांचा अधिकारी बंदोबस्त राखून मातोश्री चिमाबाईसाहेब व सेनाधुरंधर व बाबासाहेब यांजपाशीं सर्वांनी काढू यांनी ठेवून नागपुरास रवाना केले. आपण सेनासाहेब पुढें पुण्यास चालले. समागमें सरदार मंडळी, विठ्ठल बल्लाळ सुभेदार यांजला जरीपटका देऊन मानकरी मंडळी तमाम याचे तैनातीस केले व कपूसहित वेणीराम सुखराम सुभेदार व सखाराम अवधूत एकांडे मंडळी रिसाला त्याचे जमेस, महंमद अमीरखा छपरीवाले व सावंतखान यांचा जमाव वगैरे; रघुनाथराव बाजी घाटगे हेहि आपले पथकांसहित; याशिवाय पाटणकर, निंबाळकर, राणे, यादव वगैरे जमावासुद्धां पांडुरंग गणेश बक्षी व गंगाधरराव माधव चिटणवीस व आपाजी सखाराम व नारायण यशवंत व बाळाजी नारायण जामदार व सिलेखानेवाले याप्रमाणें समागमें घेऊन सेनासाहेब गंगेपर्यंत गेले. तेथून आपण पुढें होऊन आघाडीस जातेसमयीं लक्ष्मणराव काशी यांजला मोपाळ्यास रवाना करून नंतर दरकूच सडे जाऊन पंतप्रधानाजवळ दाखल झाले. फौजेही

पत्रें पाठविली. ते समयीं रघूजी भोसले सेनासाहेब सुभा यांच्याकडेही याच प्रकरणी लिहिले.

फौजेसहित सेनासाहेब व व्यंकोजी भोसले सेनाधुरंधर व चिरंजीव परसोजी भोसले ऊर्फ बाबासाहेब व मातोश्री चिमाबाईसाहेब मुद्धां पन्हाळ्यांत पोचले. गाविलगडाचा ओंदिकडून बंदोबस्त राखून मातोश्री चिमाबाईसाहेब व सेनाधुरंधर व बाबासाहेब यांजपाशीं सर्वांनी काळू यांना ठेवून नागपुरास रवाना केलें. आपण सेनासाहेब पुढें पुण्यास चालले. समागमें सरदार मंडळी, विठ्ठल बल्लाळ सुभेदार यजिला जरीपटका देऊन मानकरी मंडळी

. . . . . . . . . . . . . . . . . . . .

पथकांसहित, याशिवाय पाटणकर, निंबाळकर, राणे, यादव वगैरे जमावांसुद्धां पांडुरंग गणेश बक्षी व गंगाधरराव माधव चिटणवीस व आपाजी सखाराम व नारायण यशवंत व बाळाजी नारायण जामदार व सिलेखानेवाले येणेंप्रमाणें समागमें घेऊन सेनासाहेब गंगेपर्यंत गेले. तेथून आपण सडे होऊन आघाडीस जाते समयीं लक्ष्मणराव काशी यांजला मोपाळ्यास रवाना करून नंतर दरकूच सडे जाऊन पंतप्रधानांजवळ दाखल झाले. फौजेही

नजीक कडे आष्टी मशारनिल्हेचा पाटिलकीचा गांव तेथे मेजवानीस येणार म्हणून वर्तमान. मागाहून दुसरी बातमी येईल.

१०-२-१७९५ चें बातमीपत्र. "नागपूरकर रघोजी भोसले याचे लष्करचा मुक्काम काल मौजे केळ–पिंपळगांव सीना नदीपासून १४ कोसावर होते. आज कूच करून साता कोसावर येतील. उदईक सीना नदीचे पाण्यावर येणार." "*बाबूराव वैद्य वकील नि ॥ सरकार भोसले यांचे लष्करांतून येऊन मागील तळावर सरकारची भेट घेऊन काली मजलीस* सीना नदीवर आले. त्याजकडील उटे तंबे मागाहून सायकाळी येऊन नदीपार सरकार डेऱ्याचे पिछाडीस रघुनाथराव बळवत नायगांवकर याचे शेजारी उतरले आहेत." (ऐतिहासिक पत्रव्यवहार काव्येतिहाससंग्रह व भारतवर्ष यांत पूर्वी प्रसिद्ध झालेल्या साधनाची पुनरावृत्ति व अवांतर नवीन भर. संपादक सरदेसाई कुळकर्णी व काळे पृ. २८५,२८६, लेखांक ३१०, ३११.)

(४) परशुरामभाऊचें पत्र २१-१-१७९५." *शिंद्याकडील जिउबाबक्षी* कपूसुद्धा पैठणावर आले. देवजी *गौळी* पुढे होता तो नगरच्या सुमारे वामोरीवर मुक्काम करून आहे. भोसले मात्र वाशिमावर आहेत. ... .. भोसल्यास पैठणच्या सुमारे येण्याविषयीं पत्रे गेलीं आहेत येतील."

(खरे पान ४७२२,२३)

१९–२–९५ "जिउबाबक्षी शिंद्याकडील फौज घेऊन आले व भोसलेही आले." (खरे पान ४७२३.)

(५) १९ *नोव्हेंबर* १७९४ तारखेचे *बाळासाहेब मिरजकरांस* विष्णुपंत *यादवाडकर* यांचे पत्र "बाबा फडके इदुवारी काल डेरेदाखल झाले. भोसले अद्यापि नागपुरींच आहेत त्यास लवकर निघण्याविषयीं सरकारांतून पत्रे गेलीं आहेत." (खरे पत्र न ३५८७.)

(६) श्रीमंत महाराज राजश्री सवाई माधवरावसाहेब याची स्वारी मांगलावर खर्ड्यापर्यंत गेली त्याचे मुक्कामाचा तपशील—

"तेथोन पुढे कूच होऊन फकराबाद धानोरे तेथें मु॥ झाला. श्रीमंताची खाशी स्वारी रत्नपुरांत राहिली. मधी खडकत गावावर जिउबादादा भेटले. त्याणीं आपली फौज व पलटणें वगैरे दाखविलीं. तो गांव मौजे

सडक्त, तेथून पुढे दोन कोशावर फकराबाद धानोरे एकूण दोन गावं. दरम्यान मधीं विंचलना नदीवर मु॥ झाला. तेथे मौजे कऊडगांव ( फरडगांव असे पाहिजे ) येथे भोसले येऊन मिळाले. त्यांची भेट होऊन नंतर फकराबाद धानोरेवर मु॥ झाला."

( काव्येतिहास सग्रहांत प्रसिद्ध झालेले ऐतिहासिक लेख, पत्रे यादी वगैरे, संपादक सरदेसाई, काळे-वाकस्कर पृ. ४१० ).

( ७ ) " पुढे कोरेगांवाहून कूच होऊन काही तांदळीच्या मुक्कामी गेले तो तेथें तासगांवकर परशुरामभाऊ पटवर्धन सोळा हजारानिशीं आले. त्यांस सामोरे खासा स्वारी कोसभर जाऊन भेटले. आणि मोठ्या समारंभाने जाऊन आणिले. येऊन उतरले. पुढे तेथून कूच होऊन भिलवाडीच्या मुक्कामी गेले तो नागपूरवाले रघोजी भोसले तीस हजारानिशीं आले. त्याजबरोबर बाणांचा सरजाम बहुत होता त्यास खासा स्वारी तीन कोसावर सामोरे जाऊन मोठ्या इतमामानें येऊन उतरले. "

( काव्येतिहास सग्रह, खर्ड्याच्या स्वारीची बखर. )

( ८ ) २१ जानेवारी १७९५ परशुरामभाऊ पटवर्धन याचे बाळासाहेब मिरजकर यांस पत्र—"भोंसल्यांस पैठणच्या सुमारें येण्याविशीं पत्रे गेलीं आहेत. येतील. निघल्त निघल्त मसलत लांबणीवर पडेल असें वाटते. श्रीमंतांचे पुण्य विचित्र आहे. वसे घडते पहावें. ग्रहणास गंगातीरास जावे असा बेत आहे. ( ३ फेब्रुवारी १७९५ रोजीं ग्रहण होते. )

( खरे पत्र नं. ३६०० )

( ९ ) आम्ही कांही वर्षांपूर्वी सातारा पारसनीस म्युझियममध्ये संशोधनार्थ गेलों होतो तेव्हा खर्ड्याच्या लढाईसंबंधीचा पांचसहाशे अत्यंत महत्वाच्या पत्रांचा एक रुमाल तेथे चाळला व त्यांतील कांही नोंदी तेव्हांच करुन घेतल्या. पुढे दिलेले ऐतिहासिक पत्रांतील उल्लेख त्यापैकीं आहेत. अप्रसिद्ध म्हणूनहि त्याचें महत्व आहेच.

## पत्र अंताजी नानाजी ( सुळे ) यांचे ता. ६ रमजान

२८।३।१७९५

" सेवेसी अंताजी नानाजी विज्ञापना ता. छ ६ रमजान अडीच प्रहर पावेतों स्वामींचे कृपेंकरुन सुखरुप असो विशेष.

नयाम्र कडलाई घाटावर गेले म्हणोन. विठ्ठलपंत यांजपासी बातमी आली. त्यांतर बाबाकडे चिठी पाठविली. बाबांनी चिठीचें उत्तर पाठविलें की, येजमानास चिठी लिहिली आहे. जैसें उत्तर येईल त्याप्रमाणें करूं. कलम १.

रघोजी भोसले याची चिठी विठलपंत यांस आली की श्रीमंतांची व नानांची स्वारी दोन प्रहरी दाखल जाहाली. कलम २.

## पत्र हरी त्रिंबक वर्तक याचें

१४

सेवेसी हरी त्रिंबक वर्तक शिर सा॥ नमस्कार विज्ञापना. आज प्रातःकालचें बारा घटका दिवस आला तेथपर्यंत डाकेच्या राऊताबरोबर पत्र रवाना केलें ते प्र॥ होऊन वर्तमान कळलेच असेल. स्वामीकडून प्यादे कागदाचे उत्तर घेऊन आले ते वाचून पलंगावर बसले आणि चक्रदेव यास बोलावून पत्र पा॥ आणि मुक्काम कोठे करावा हा आज्ञा आली म्हणून बोलले. पत्रांत आज्ञा की उदईक चिंचपुरी तुम्हीं जाणें आणि श्रीमंतांचा मुकाम करंडगांवीस सीनातिरीं जाणू (न) या प्र॥ वाचून फारच खुशाल जाले. दुसरे सकासी जाणार छ ६ रमजान मार्गी नऊ घटका दिवस.

॥ २५ ॥

॥ ( शाहीर निवाजी )

श्रीमत पतप्रधान उभेता भेटी ॥ होताची हर्षली धरा झाली सुखवृष्टी ॥ मुकाम फर्णीदपुराहून महाराजा श्रीमत ॥ सुमुहुर्ते डेरे दिधले सगमावरत ॥ आपण निघाले बाहेर सवे हुजरात ॥ आणि भले सरदार लोक नामांकित ॥ नानासाहेब मातुश्री कुटुंबासहित ॥ बाबासाहेब आणि आबा भवानीपत ॥ ( चाल ) ॥ दरकूच मग उमरावतीवर मुक्काम केला ॥ चौ रोजामध्ये राजे मतलब उगविला ॥ कुल रोजमुजरे झाडून दिधले लोकाला ॥ गाविलची बंदोबस्ती किल्लेदाराला ॥ राजारामपताचे स्वाधीन केला ॥ कुल समुदाय सर्वांशी निरोप दिला ॥ कुल-दैवत मातुश्रींचे पदी घाली मिठी ॥ म्हणे यिजयी होऊन याव अखड दृष्टी ॥ ॥ १

बहु राजनीति सांगोन नानासाहेबा ॥ सहकुटुंबा बिदा केले आत्मजे बाबा ॥ सह मुग्य विचारानि असे भवानि आबा ॥ दर मजल निघाले सेना साहेब सुभा ॥ मुक्काम जाऊनि वाशमीं केला मनसुबा ॥ पलटण वेनी सिंगाचे स्वाधीन अरबा ॥ ( चाल ) ॥ कूल मुखत्यारी महमदअली ॥

मोहऱ्याची डावी बाजू त्यासी नेमिली ॥ विठ्ठल सुभ्यास जलद सांडणी गेली ॥ सैन्यास येऊन भेटला खुशाली झाली ॥ बहु गौरवून दिलभरीचीं वस्त्रें दिलीं ॥ आघाडीस दरकूचाची आज्ञा केली ॥ नाईकवडी गगथडीस धाडी चिठी ॥ तुम्ही वसूल करावे सब कुल बारा हत्ती ॥ २

दररोज हजरी सुरु चालते स्वारी ॥ तेथे पांडुरंगदादाची खबरदारी ॥ कुल गणती फौज साठ सहस्र स्वारी ॥ तेथे कारखाने महाराजाबरोबरी ॥ सवे-नामी लोक सरदार मोठे अधिकारी ॥ त्याहाची नामें म्या सांगावी कोठवरी ॥ ( चाल ) ॥ बरें असो जी ऐकाजी महम्मद अमीरखान ॥ किती खानदान सय्यद मोगल पठाण ॥ यावरी रिसाले नामे कोण कोण ॥ तो गुजर कुशाजी सर्वा बहु सन्मान ॥ रघुपत बक्षी बापु सगीन ॥ सावत खानाचे लोक अति तीक्ष्ण ॥ जरीपटक्या संगे-जमाव झाली दाटी ॥ हुजरात लोक मोठे पागेचे हट्टी ॥ ३

हत्तीवर अबारीमध्ये गुजाबादादा ॥ त्या मागे चालवी शाबुतीने हौदा ॥ सवे गुजर महादजी आप्त लोकासुद्धां ॥ बाणाच्या कैचा पुढे धरुन मर्यादा ॥ मागे स्वारी श्रीमंत चालवी विरदा ॥ पुढे बारेदार जिलबेसी नेमिला हुद्दा ॥

---

दरबारातील फारशी जाणणारा एक मुत्सद्दी. मोहऱ्याची—मोहरप्याची, आघाडीची विठ्ठल सुभा—विठ्ठल बल्लाळ पराजपे सुभेदार. सांडणी—सांडणीस्वार निरोप घेऊन गेला. खुशाली—समाधान. दिलभरीचीं वस्त्रें—संतोष पाऊन वस्त्रे पोषाक दिले नाइकवाडी—गावच्या महाराचा पुढारी. निरोप पाठविण्याचे काम पूर्वी महाराकडून करवीत असत. सबकुल—झाडून सर्व. बारा हत्ती—'बारा बावती' या शब्दांचा तर हा अपभ्रंश नसेल? The twelve shares ( out of the revenue ) which belong to the head Offices ( Mols.) दररोज हजरी सुरू—रोज नवीन नवीन पथक घेऊन पागे पथके सैन्यास येऊन मिळत होते..त्याच्या गणत्या, हजेरीपट सुरू झाले महंमद अमीरखान—शिवणी शपारा येथील सुभेदार ( चट्टे ) यावरी—यानतर. रिसाले—रिसाल्याचे अधिकारी; रिसालदार. सावतखान-लष्करांतील एक अधिकारी सावतखानाचा गोट ही जागा अद्याप नागपुरास आहे ( चट्टे ). तीक्ष्ण—पराक्रमी. शाबुतीने—( १ ) जपून? ( २ ) शहाबुद्दीन असें महाताचें नाव तर नसेल? विरदा—

(चाल) ॥ डाकेवर बातमी पतप्रधानानी ॥ पत्रावर पत्रे येतीं आस भेटीची ॥ मग जलद निघाली स्वारी श्रीमंताची ॥ गंगेवर योग साधिला संधि ग्रहणाची ॥ दर मजल कडेवर आलि नेमिली प्राची ॥ स्वांगे बंदोबस्ती केली फौजेत्री ॥ अरव जरब मोहऱ्यास फलटण मोठी ॥ शुभ तिथि विचारून दिले सुदिन शेवटीं ॥ ४

नाना फडणीस चालून दर्शना आला ॥ श्रीमत करी हो सन्मान गौरवें त्याला ॥ दिले वस्त्रभूषण मग बसुनि विचार केला ॥ शनिवारीं एकादशी नेम भेटीला ॥ सडी स्वारी तयार झाली भले हो लाला ॥ हत्तीवर अबारी बसवी सर्वाला ॥ ( चाल ) ॥ सर्व गुजर महाडीक आणि अहेरराव ॥ साळुंके पालकर शिर्के मुकुटराव ॥ घाडगे पाटणकर नामी उमराव ॥ पत्री पठाण इकडे सिंदे खाडेराव ॥ विठ्ठलासी ताकीद केली तयार व्हाव ॥ कुल मराठ मंडळी स्वारी घेऊन याव ॥ पऱ्ह्यानी फौजा उभ्या दर्सनासाठी ॥ उभंता मिळालीं सैन्यें झाली दाटी ॥ ५

---

निशाणादिक राजचिन्हे बारेदार—बारदार. आस—इच्छा. स्वांगे—स्वतः जातीनें लक्ष घालून. जरब—तोफ, तोफखाना आणि अरवांची पलटण, मोहऱ्यास म्हणजे आघाडीस घातली. कडेवर आली—करड असे मूळ गांवाचे नाव आहे. नेमिली प्राची— ? नानाफडणीस चालून दर्शना आला—पेशवे भोसल्यास भेटण्याच्या आधीं नाना फडणीस भोसल्यास भेटून आले व पेशव्यांची भेट केव्हा कोठे कशी व्हावी हे त्या बैठकीत ठरले. श्रीमंत—रघूजी भोसले. शनिवारी एकादशी नेम भेटिला—२८ फेब्रुवारी १७९५ या दिवशीं फाल्गुन शु. १० येते. जंत्रीवरून ११ स रविवार येतो; परंतु वाराचा उल्लेख केला असता तोच प्रधान धरावयाचा असतो अर्थात् २८ फेब्रुवारीस मुहूर्तानें भोसले यांची भेट झाली. भले हो लाला—भले लोकाला असें तर मुळात नसेल ! सरदार लोकांच्या भेटी होताना पान-दहा जवळचे नामांकित लोक उभयपक्षी आणण्यांत येतात व सीमांतपूजनाच्या वेळच्या व्याहीभेटीप्रमाणे त्याच्या भेटी होतात याबावत हरिवंश बखरींत नानासाहेब पेशव्याने पुरुषोत्तम दादाजी पटवर्धनाची दमाजी गायकवाडाशीं भेट करविली ते वर्णन वाचकांनी वाढून पहावें. पऱ्ह्यानी—रांगेने. औंर्यात ? तऱ्हेदार—

तऱ्हेदार पिवळ्या अबारीमध्य श्रीमत ॥ तिकडे चमके औऱ्यात प्रधानपत ॥ गज उभे सैन्यामार्जी स्थिर मिरवत ॥ हौयासी हौदा भिडे पुढे हुजरात ॥ उतरले दोघे महाराज छत्रिन्यावरत कठाकठ मिळविती आनदभरित ॥ (चाल) ॥ त्या हर्षे सुटल्या सरबत्ती धुद गगना ॥ आनदीं मानकरी देती सन्माना ॥ दक्षिण देशीं मसलती एक फडणीस नाना ॥ तो सेनासाहेब नानास करी प्रार्थना ॥ आज मोगल करावा जेर अशी वासना ॥ उभैता सैन्यासह गेले स्वस्थाना ॥ पुढे युद्ध होइल घनघोर हा भास पोटीं ॥ निंबाजी विनती करी कर जोडुनि पोटीं ॥ ६

---

सुदर, विशेष प्रकारच्या स्थिर मिरवत—उभे केलेले हत्ता जागच्या जागी झुलत होते छत्रिन्यावरत—तळ्यापुढील पाह ऱ्याची चौकी मसलती—मुत्सद्दी एक—अद्वितीय स्वस्थाना—आपापल्या तळावर, मुक्कामास भास पोटीं—असा तर्क होतो कर जोडुनि पोटीं—नम्रतेने वाकून नमस्कार करताना जोडलले हात पोटाशीं येतात भावार्थ नम्रतेने वाकून विनति करतो

# तिसऱ्या रघूजी भोसल्याचा पोवाडा

*हाही पोवाडा नागपूरचे श्री चट्टे यांच्याकडूनच मिळाला*

हा पोवाडा तिसऱ्या रघुजीविषयीं आहे आप्पासाहेब भोसल्यास कैद करून पाठविल्यावर त्याच्या जागीं गादीवर कोणास बसवावें असा प्रश्न आला वास्तविक त्याच वेळीं नागपूरचें राज्य खालसा होण्याचा प्रसंग होता, कारण पहिल्या रघुजी भोसल्याच्या वंशातील कोणीच माणूस शिल्लक राहिलेला नव्हता परंतु गव्हर्नर जनरल हेस्टिंग्ज् यानें आप्पासाहेबास गादी वरून काढण्याचा पूर्वीच, एकदां प्रश्न निघाला होता तेव्हां, दुसऱ्या रघुजीचा मुलगी बनुबाई इचा मुलगा बजाबा ऊर्फ बाजीराव यास दत्तक देऊन राज्य चालवावें असे सुचविलें होतें तेव्हां तीच कल्पना पुन्हा पुढें येऊन २५ जून १८१८ रोजीं परसोजीची बायको दुर्गाबाई हिच्या मांडीवर बाजीबास दत्तक देण्यात आलें व त्याचें नाव तिसरा रघूजी असें ठेविलें

रघूजी गादीवर आला त्या वेळीं अवघा १० वर्षांचा होता यामुळे राजवाड्यातील घराऊ कारभार बांकाबाइने गुजाबादादा गुजर याच्या सल्ल्यानें पहावा आणि मुख्य राज्याचा सर्व कारभार इंग्रज रेसिडेंटानें पहावा असें ठरलें साराश, बाकाबाई नाममात्र रीजंट राणी म्हणून कारभार पहात होता ही रीजन्सी १८२६ सालापर्यंत चालली त्या सालीं रघूजी १८ वर्षांचा सज्ञान झाल्यामुळें त्याच्याकडे राज्यव्यवस्था सोंपविण्यांत आली

१ डिसेंबर १८२६ रोजीं रघूजीशीं इंग्रजांनीं आणखी एक नवीन तह करून त्याला बांधून घेतलें व स्वत चे सर्व मुद्दे उगवून घेतले १८१६ च्या तहान्वयें सबसीडिअरी सैन्य नागपूरकर भोसल्यांना पदरीं बाळगण्याची सक्ती होती व त्यासाठीं दरसाल ७॥ लक्ष रुपये इंग्रजांना द्यावे लागत या नवीन तहान्वयें त्या वार्षिक साडेसात लक्ष रुपयांच्या बदला तितक्या उत्पन्नाचा मुलूखच इंग्रजांनीं तोडून घेतला या नवीन तहान्वयें रघूजीला राज्यकारभार मिळाला, पण अमल सर्वस्वीं इंग्रज रेसिडेन्टाच्या हातीं गेला "राजा राज्य करीत नसून रेसिडेन्टच आपल्या अधिकाऱ्याच्या ऐवजी राजाच्या हातानें राज्य करीत आहे" असें तत्कालीन एका इंग्रज अधिकाऱ्यानेंच लिहून ठेवलें आहे

रघूजीला लिहिण्या वाचण्याचें व राज्यकारभाराचें शिक्षण देण्याची

व्यवस्था इग्रजानी केली, परतु रघूजीचा शिकण्याकडे कल नाही अशाच तक्रारी रेसिडटच्या रिपोर्टांत सापडतात

१८२९ साली फिरून इग्रजानी एक नवा तह रघूजीशीं केला

रघुजीचे लग्न २१ मे १८२७ रोजीं शिर्के याची कन्या गगाबाई इच्याशीं झाल पुढे चार वर्षांनी त्याला मुलगा झाला परतु तो पाचसहा महिन्यांनीं वारला यानतर रघूजीने चारपाच लग्ने केलीं परतु मूल झालें नाही शिवाय दिवसदिवस रघूजी व्यसनाधीन होत गेला त्याच्या ३७ व्या वर्षांत "रघूजी हा वाहिरख्याली पणामुळे व दारूबाजीमुळे इतका पोखरून गेलेला आहे कीं यापुढे त्याला सतती होण्याचा बिलकूल सभव नाहीं" असे १८४५ सालीं रेसिडेन्टान ग जनरलास लिहून कळविल होत रघूजीच्या लग्नाच्या एकदर आठ बायका व नाटकशाळा तर अनेक होत्या त्यांपैकी जानी नावाची एक नाटकशाळ होती तिनेच त्यास दारूचें व्यसन लाविल रोज एका बाटलीपेक्षा जास्त ब्रॅन्डी तो पीत असे १८५० सालच्या रेसिडेन्टाच्या एका आठवड्याच्या डायरीत राजाकरिता कांचेचीं भाडीं व व शांपेनच्या बाटल्या विलायतेहून खरेदी करण्याचे काम नादलेले होते ! ती डायरी गव्हनर जनरलने वाचल्यावर त्यानें रेसिडेन्टास कळविले कीं रेसिडेन्टान राजाकरिता दारू खरेदीचीं कामे करण गैरशिस्त आहे एकदा व्यसनाधीन झाल्यानतर नाच, गाणें, जुवेबाजी आणि पतगबाजी आणि कुस्त्याच्या शर्यती असल्या हलकट करमणुकींतच रघुजाचा सर्व काळ जाऊ लागला अखेर तो वयाच्या ४७ व्या वर्षी ११ डिसेंबर १८५३ रोजीं मरण पावला

---

# तिसऱ्या रघूजी भोसल्याचा पोवाडा

## २६

## ( शाहीर–शिवनाथराय )

आज रघुराज, भले रगिले महाराज, केला वाघोब्याचा साज कोठे नाही असा ॥ भली रगाची बहार बगले केले हो तयार भवते खांब सरू दार पहा खुप तऱ्हा ॥ शोभे रग पिवळा लाल, वर उडलो गुलाल, भाट गर्जति हवाल, पहा शोक बरा ॥ लोक उभे आसपास, म्हणती कारागीर शाबास, धन्य श्रीमती विलास, नाही न्यून जरा ॥ किती वर्णावें तें धाम ॥ होतो पाहता आराम ॥ जसा अयोध्येचा राम रघुराज असा ॥(चाल) ॥ तरुण वयामध्ये अरुण जसे ॥ दिव्य प्रभा फाकली असे ॥ सरदार भोळे राव जसे ॥ केला स्थळोस्थळी थाट उभा मुत्सद्याचा दाट, केला लौकिकी बोभाट पुण्यापावेतो ऐसा ॥ १

आता ऐका सिलेखाना ॥ स्वाधीन गिरमाजीचे जाणा ॥ आणि जामदारखाना ॥ बापूजी जामदार ॥आता हुजरात पागा खाशी ॥ त्यात दाजीबा विलासी ॥ नाहीं उपमा तयासी ॥ पहा मोठे जामदार ॥ आता शिरा महालकोठी ॥ त्यात तात्याची हातोटी ॥ लौकिकाची कीर्ति मोठी ॥ नाही असे कामदार ॥ दुसरा सगीखाना फार ॥ किती वर्णू वारवार ॥ करी विठोबा विचार ॥ पहा पूर्व ग्रामदार ॥ (चाल) ॥ शिकारखाना पहा बरवा ॥ गाडीखान्याची तेजी हवा ॥ बापू दैवरया म्धे मिरवा ॥ आता हवेलीचा जमाव ॥ त्यात शोभे जगदेवराव ॥ काय सागू त्याचें नाव ॥ क्षण एक बसा ॥ २

ऐका मुत्सद्याचा थाट ॥ मोठे मोठे जी आचाट ॥ नजिक सरदाराचा कोट ॥ हातीं ढाल पटा ॥ डावी रमशेर कडक ॥ लाल पोपास भडक ॥

---

रगिले—रसिक अरुण जसे—अरुणाप्रमाणे लालबुंद. लौकिकी—लौकिक असाच मूळ पाठ असावा. बोभाट—कीर्ति सिलेखाना—हत्यारखाना संगीखाना—? पूर्व ग्रामदार—(!) दैवरया—दैवरया असे असावे मिरवा—मिरधा असा मूळ पाठ असावा.

झाला पाहुन सडक ॥ अग्रेन धीट ॥ तिरतीं पाण्यामध्ये नाव काय सागू हाव भाव ॥ ऐसा मुत्सद्याचे नाव ॥ कटी जरीपटा ॥ कला पेटी आणि जाड नाद्दा चहु चहु जोड ॥ केला लौकिकामध्ये जोड ॥ बैठकी ओटा ॥ (चाल) ॥ बसून हवा पाण्याची पद्दा ॥ शिवरावजी मुख्य मद्दा जन म्हणती अद्दा अद्दा ॥ झाला कार्तिचा पसर ॥ काही नाही कसर ॥ सान्या शाईंत नेसर ॥ सागू तरा कसा ॥ ३

आला मुत्सद्याचा मार ॥ आता एक हो सरदार ॥ मुख्य श्रीम ताचा प्यार ॥ बाबाजी गुजर ॥ शोभे समशेर आणि ढाल ॥ सदा रगांत खुशाल ॥ शेला भरजरी दुशाल ॥ करा क्वन हुजुर ॥ बावन पागा बार गार त्यात दादोबा गभार ॥ साऱ्या कामात खबीर ॥ चहूकडे नजर ॥ आता गुजर माहिते जाण ॥ करा सचन्राचा मान ॥ त्याचे तक अनमान ॥ सदा गर्जे गजर ॥ ( चाल ) ॥ अहेरराव नाना पाहुण ॥ दानधम अनुदिन जाणे ॥ पाचपेंच काही न जाणे ॥ आता बागुल ( बागल ? ) पाटणकर ॥ लौकिक घाडग्याचा फार ॥ केली भली हा तलवार ॥ सामने तसा ॥ ४

ऐसे शिवरावजी दिवाण ॥ आता कृष्णराव जाण ॥ ज्यांचा लौकि कात मान ॥ तो जोरासी हिरा ॥ सव मुत्सद्यात सार ॥ दावितसे सारासार ॥ करी बसून विचार ॥ बोले मधुरागीरा ॥ भला लाखावरते रबाब ॥ भला जनात रबाब आणि शिपाइ जबाब ॥ बोला धिरा धिरा ॥ ऐसी झालीसे आवाई ॥ आता फडणीस सवाइ ॥ नाना चिटणीस पाही ॥ शाईमध्य शिरा ॥ (चाल) ॥

---

मिधा म्हणजे सर्वोपदार डावी—डाव्या बाजस, कमेरेस तिरती—तरता तरगत केला पेटी आणि जाड ह — ? हवा—शोभा पसर—प्रसर, विस्तार कसर—बाकी, शिल्क व्यग नेसर—'नइसर म्ह प्रसिद्ध हा शब्द मलकोजीच्या पोवाड्यात आलाच आहे मार—समुदाय, समार प्यार—प्रितीपात्र श्रीमताचा—श्रीमत भोस ल्याचा त्याचे तर्क अनमान सदा गर्जे गजर ? सामने—समारा समोर ? तो जोराशी हिरा—वास्तविक तेजाराशी हिरा असा मूळ पाठ असावा भला—पूण, चागला रबाब—दबाब अस असावे नाना चिटणीस—माधवराव चिटणीस शाई—राज्य शिरा—उत्कृष्ट

कारखाने श्रीमंताचे ।। वर्जिले हो ऐका साचे ।। मुख्य मुख्य मधे लोभाचे ।। आर्धी नारायण काशी ।। झाली माहिती सर्वत्राशीं ।। स्वाधीन कलेक्टरी त्यासी ।। दिसे धर्म जसा ।। ५

मखमलीचे तकिये लोड ।। पडदे किनखापाचे सोड ।। लागे हवायाची झोड ।। रोषणाई बरी ।। वत्त्या मोमबत्या हो फार ।। सुटे बारदीचा मार ।। केला लंकेचा सुमार ।। असा परोपरी ।। अंग्रेजासी बोलावून ।। त्याशी रचना हे दावून ।। क्षण एक पाहून ।। मेजवानी करी ।। ठायी ठायी तक्तपोश ।। बैठका त्या गाव कोस ।। झाला अंग्रेज संतोष ।। म्हणे तऱ्हा वरी ।। (चाल) ।। असा शोक नाही नाही ।। म्हणुन सर्व देती गाही ।। कीर्ति ऐसी दुरवर पाही ।। कांही वर्णावे ते जनांत ।। जसा कुजवनीं कृष्णनाथ ।। तैसे शोभे गोकुळांत ।। अनभाव तसा ।। ६

ऐका बंगल्याचा शोक ।। ठायीं ठायीं तक्तपोस ।। काय सांगु नोक झोक ।। बैठका करून ।। वाजे सारंगी सतार ।। लागे पखवाजाचा ताल ।। भले गवई गाणार ।। सुरताल धरून ।। देतो छायुनीया रंग ।। सारी सभा होय दंग ।। दिले बंगल्यावरते रंग ।। कुल मिना भरुन ।। वरते शोभे काच पाच ।। चित्र विचित्र तैसाच ।। झाड झडुला सिराज ।। ऐसा रंग करून ।। (चाल) ।। लाल बिलोरी आयने खुले ।। सुवर्ण मोती वर डुले तऱ्हेतऱ्हेचे वर्ख खुले ।। केले रंगाचेहि मोर ।। तेहि पाहाति समोर ।। पाहतााति थोर-थोर । आले काम सोडून ।। ७

---

वर्जिले—वर्णिले असे मुळांत असावें. मोमबत्या—मेणबत्या, मोम—मेण. बारुदी—बंदुकीची दारू, बदुकीचा मार म्हणजे आतषबाजी. लंकेचा सुमार—लंकादहनाचा खेळ किंवा लंकादहनासारखी आतषबाजी. अंग्रेजासी—इंग्रेजासी. तक्तपोश—फळयांची भुई, कडिपाट, पटई. गांवकोस—कोसकोस लांबपर्यंत बैठका घातलेल्या. गाही—ग्वाही. साक्ष. अनभाव—प्रचीति. रंग छायणें—रंग भरणे. मिना—एक प्रकारचा हिरवा दगड;त्याचा पातळ रांधा करून चांदीच्या दागिन्यावर बसविणें. झाडझडुला—झाडझाडोरा. सिराज—? आयना—

झाली भोसल्यांची कीर्ति ॥ किती वर्णावी, ते श्रुति ॥ नाही नाही ऐशी द्दति ॥ धुंडियेले त्रिभुवन ॥ कवि शिवनाथराव शिरि वेदुनिया पाय ॥ दृढ झाली कृपा सागु काय ॥ केले राव कवन ॥ आता कवि घरोघर ॥ नाहीं कोणी बोजदार ॥ करु पाहातात जिकर ॥ नाहीं न्यून जरा ॥ ८

---

आरसा. श्रुति—वास्तविक स्तुति असा मूळपाठ पाहिजे द्दति—दृष्टी' भावार्थ त्रिभुवन धुंडिले तरी दुसरीकडे अशी शोभा दृष्टीस पडणार नाही, किंवा अशी कीर्ति ऐकू येणार नाही. बोजदार—बोज असलेला, अब्रूदार, पोक्त, प्रौढ. जिकर—निकर असा मूळपाठ असावा. निकर म्हणजे चढाओढ, निकर्ष, तेढ, द्वेष

## पुरवणी टीपा



पृ. ४५—किंकर दुमाटला—दुमाटणे असा शब्द कोशांत सांपडत नाही. मोडी वाचनांत दु गु उ यांचा घोटाळा होऊं शकेल. उमडणे असा हिंदी शब्द आहे त्याचा अर्थ आवेश चढणे. ' उमडना—आवेश चढणें. ' येथें किंकर उमाडला असा पाठ कदाचित असू शकेल. भावार्थ पोवाडा गाणाऱ्या कवीलाहि आवेश चढला.

पृ. ४७—जवळ शामह सुंदर डोबा वलयंधर पांचसात कुंदर—" जवळ शामसुंदर घोडा । वलयंधर पांचसात कुंदर " ॥ असा मूळ पाठ असावा. 'वलयधर कुंदर' म्हणजे ज्यांच्या दांतांना वळीं किंवा कडीं चढविलीं आहेत असे हत्ती. लढाऊ हत्तीच्या दांतांना अधिक बळकटी आणण्यासाठीं अशा तऱ्हेने वळीं चढविण्याची वहिवाट होती. १८९४ सालीं प्रसिद्ध झालेल्या सापकरकृत बडोदे वर्णनात पृष्ठ १६ वर हत्तीच्या दातांस घालावयाची कडी ' असा उल्लेख आहे.

पृ. ४८—दुजा उदाजी सपूत—उदाजी आंग्रयाचा उल्लेख फक्त एकच ठिकाणीं सांपडला. १७३३ सालीं जुलै महिन्यात थळ-रेवसचे कोट किंवा चौंघुर्ज्या आंग्रयांनी काबीज केल्या. त्या लढाईंत उदाजी आंग्रे होता. सेखोजी आंग्रे त्याचा 'चिरंजीव उदाजी' असा उल्लेख करतो. "तिसरे दिवशीं सद्दा भांडियाची येक रंजक येकसमयाछेदे भडीमार करायाची आज्ञा केली. ते दिवशीं चौबुर्जीवरील गोळ्याने चिरंजीव उदाजी आंगरे व गोलदाज व सिपाई भांडियासमीप होते त्यांस जखम झाली. तिघे.ठार व्हावे, परतु काही तफावत जाहाला म्हणोन जखमी जाहाले." ( पेशवे दप्तर भाग ३३ पत्र नं. ५८.)

पृ. ५२—चेउलाच्या चौवारा—"चेउलच्याच वारा" असेही सुव्यांत असण्याचा संभव आहे. म्हणजे चेउलच्याच किनाऱ्यासमोर.

पृ. ७८—लालबाग—Jaffarkhan, during the first twelve days of the month Rebby-ul-Awual which include the birth of the holy prophet, he feasted people of all conditions, and on those nights, the road from Moheenagar to LOLL BA-

पृ. ८१—अवघा गोपाळकाला—During the Government of महमद तकी, the Raja of Pursotim (पुरुषोत्तम) had carried away the idol of Jaggaunath, across the river of Jelkeh beyond the boundary of Orrissa, and placed it on a mountain, which secession lessend the revenues near nine lacs of rupees, being the amount of the annual collections from the pilgrims. But Rajah Doond Deo, having made his peace through इब्राहिमखान by the payment of a considerable nazarana to the Government, brought back the idol to Pursotim where it was worshipped as before.

The following are some of the ceremonies observed by the Hindoos, during the Pilgrimage to Gagannath at Pursotim. They first shave their heads like the Mussalmans, at the outer gate of the temple, they offer food at the station of Kobeir who was a holy Mussalman dervish, and they eat and drink this offering, which they call terwanee. whilst the Hindoos are Pursotim, they make no scruple to eat with Mussalmans, and other casts, and various kinds of food, ready dressed, are sold in the markets, and eaten indifferently by the Hindoos and Muasalmans. Page 144—145. [वरील पुस्तकाचाच आधार].

पृ. १०८—दिकत—पूर्वी आम्ही 'हिंमत' असा पाठ सुचविला आहे पण कदाचित् दिकत असाच मूळ पाठ असणें शक्य आहे. दिकत करणें म्हणजे हिला हरकत करणे, झगडणें असाही अर्थ होतो.

UGH, which was above three miles was illuminated with lamps. Page 111.

[A Narrative of the transactions in Bengal during the Soobhadaries; translated from original Persian by Francis Gladwin 1788.]

पृ. ७९—कवड्याची चाल—ओरिसा प्रांतांत कवड्यांच्या नाण्यांचा फारच प्रचार होता. त्या नाण्याला ' कवडीकहान ' अशी संज्ञा होती.

(स्टर्लिंग याचा लेख. नागपूर प्रांताचा इतिहास-काळे-पृ. ३५५.)

पृष्ठ ७९ बाराभाटी—In the reign of the Emperor अकबर, काळा पहाड an aumeer from the time of Baber, who was a brave Soldier and reputed to have the power of working miracles, invaded Orrisa, by the road of Jarkheud, at the head of twelve thousand cavalry. The reigning prince of the country at the time was Raja मुकुंददेव, whose custom it was to hold his Court for six months and spend the rest of the year in sleep. During the latter time, whoever presumed to disturb him when asleep was sure to be put to death. When the Raja heard of the approach of काळा पहाड he built the fort of Barabhati and there shut himself up and slept accordiug to custom. काळापहाड having defeated his armies, subdued all the country and took prisoner the Ranee, his wife, with a great booty. He then beseiged Barabhaty, but no one yet dared to awaken the Rajah. Page 146. वरील पुस्तकाचाच आधार].

पृ. ८१—अवघा गोपाळकाला—During the Government of महमद तकी, the Raja of Pursotim (पुरुषोत्तम) had carried away the idol of Jaggaunath, across the river of Jelkeh beyond the boundary of Orrissa, and placed it on a mountain, which secession lessend the revenues near nine lacs of rupees, being the amount of the annual collections from the pilgrims. But Rajah Doond Deo, having made his peace through इबीबुल्लाखान by the payment of a considerable nazarana to the Government, brought back the idol to Pursotim where it was worshipped as before.

The following are some of the ceremonies observed by the Hindoos, *during the Pilgrimage to* Gagannath at Pursotim. They first shave their heads like the Mussalmans, at the outer gate of the temple, they offer food at the station of Kobeir who was a holy Mussalman dervish, and they eat and drink this offering, which they call terwanee. whilst the Hindoos are Pursotim, they make no scruple to eat with Mussalmans, and other casts, and various kinds of food, ready dressed, are sold in the markets, and eaten indifferently by the Hindoos and Muasalmans. Page 144—145. [वरील पुस्तकाचाच आधार].

पृ. १०८—दिकत—पूर्वी आम्ही 'हिंमत' असा पाठ सुचविला आहे पण कदाचित् दिकत असाच मूळ पाठ असणे शक्य आहे. दिकत करणे म्हणजे हिला हरकत करणे, झगडणें असाही अर्थ होतो.

वा गुणेचा आक्षेप करूं नये. रवाना छ. २० जाखर सन सबा अशर बहुत काय लिहिणे हे विनंति." [ पेशवे दप्तर भाग ३१ पृ. १५३. ]

पृष्ठ २४६–मांडवी आणि लहरीपुरा—बडोद्यांतील मांडवी वेशीवर एक शिलालेख अलीकडे १९२४साली प्रथम संशोधकांच्या नजरेस आला.लेख संस्कृत भाषेत नागरी लिपींत आहे. तो सन १७३६ सालांत कोरलेला आहे. दमाजीने १७३४ साली बडोदे परत जिंकून घेतले नंतर मालोजी ऊर्फ मल्हारजी नांवाचा त्याचा चुलता यास शहराचा बंदोबस्त सांगितला. त्याच मल्हारजी गायकवाडाने शहरांत एक अत्यंत उत्तुंग अशी मंडप नांवाची शिल्पाची इमारत होती ( त्याचीच पुढे मांडवी झाली ) ती दुरुस्त केली. इंदुदूत कर्त्यानेहि या 'मंडपाचा' उल्लेख केला आहे तो असा—

मध्येऽस्त्यत्र प्रचुरसुषमो मण्डपोऽत्यत तुग ।
स्तत्र स्थित्वा चतसृषु दिशास्वीक्षणीयं त्वयेन्दो ।
द्रष्टासि द्राक् श्रियमनुपमामस्य विष्वक्पुरस्य ।
रम्यं ह्येतच्छुचिरुचितुद्वारचैत्यानुकारी ।

या श्लोकांत उल्लेखिलेल्या चार वेशी म्हणजेच लहरीपुरा वेस, पानी वेस, चांपानेर वेस व गेंडी वेस या होत. अर्थात् लहरीपुरा वेस हा बडोद्यांतील एक फार जुना भाग होय. ( Important Inscriptions from the Baroda State Vol I by A. S. Gadre ).

पृ. २२५—'ठकाबाई—ठमाबाई असा पाठ असावा असा आम्ही तेथे संशय प्रकट केला आहे. परंतु ठकाबाई असेंच मराठ्यांत नांव असते. दुसऱ्या रघोजी भोसल्याची एक ठकाबाई गुजर नांवाची बहीण होती. ( 'नागपूर प्रांताचा इतिहास' पृ. ३९४. )

पृ. २४५—मांडवींत घडामोडी—" लहरीपूर दरवाजांतून आंत शिरल्याबरोबर मांडवी दृष्टीस पडते. मांडवीं आणि लहरीपूर दरवाजा ह्यांमध्ये मोठी थोरली एक व्यापारानी पेठ आहे. तींत व्यापारी लोकांच्या पेढ्या आणि अमदाबादी व बऱ्हाणपुरी कापडमालांचीं दुकाने आहेत. "

( सापकरकृत बडोद्याचे वर्णन. )

